# ENTERTAINMENT SERIES

OF THE

# POONA NIGHT CLUB.

No. 3.

# श्रीविक्रमादित्य

अथवा

## प्राचीन भरतभूमि.

भाग २ रा.

( A ROMANCE OF INDIAN HISTORY )

BY




The authors of ' MAUNA YAUVANA '
and 'SHRI VIKRAMADITYA' Vol. I.

*Printed at the ' Arya Bhushana ' Press. Poona.*
1891.

*Registered under Act XXV of 1867.*





न यत्र स्थेमानं दधुरतिभयभ्रांत नयना
गलद्दानोद्रेकभ्रमदलिकदंबाः करटिनः ।
लुठन्मुक्ताभारे भवति परलोकं गतवतो
हरेरद्य द्वारे शिव शिव शिवानां कलकलः ॥

भामिनीविलास.

Little did I dream that I should have lived to see such disasters fallen upon her in a nation of gallant men, in a nation of men of honour and of cavaliers. I thought ten thousand swords must have leaped from their scabbards to avenge even a look that threatened her with insult. But the age of chivalry is gone. That of sophisters, economists, and calculators has succeeded.

Edmund Burke.

हा द्वितीय भाग

# दिवाण बहादुर

# खंडेराव चिमणराव बेदरकर,

बी. ए. एल्. एल्. बी. सी. आय. ई.

इंदूर,

यांस

त्यांची महाराष्ट्र भाषेविषयीं अत्यंत कळकळ, विद्यावृद्धीविषयीं उत्कंठा, विद्वत्ता, परोपकारबुद्धि, मनाचा थोरपणा, सौजन्यता, स्वदेशाभिमान व राजनिष्ठा इत्यादि अनेक अमोल्य सद्गुणांस लुब्ध होऊन त्यांच्या परवानगीनें

विनयपूर्वक अत्यादरानें

## अर्पण केला आहे.



ग्रंथकर्ते.





Under the Presidentship of Rao Saheb Dattatraya Balawant Chitnis, B. A. LL. B. Attorney, Bombay High Court, and under the Vice Presidentship of Rao Saheb Krishnaji Sadashiva Riswadkar B. A. LL. B., Sub-Judge, Jalagaon, the Club is making a steady progress, and the Club's glorious future depends upon their further similar connection with the Club.

The Life Members of the Poona Night Club beg leave to take this happy opportunity of tendering their sincere thanks to the **Life Patrons** of the Club, who annually contribute Rupees ten and upwards toward the Funds of the Club, to the **Patrons,** who annually pay Rupees five and upwards in aid of the Club, and to the **Permanent Subscribers**, who for every work of the Club pay Rupee one. The Life Members express their deep thankfulness to the **Honorary and other Members** of the Club, for their sincere good will and kind assistance towards the Club.

The following are the remarks recorded by *The Registrar of Native Publications* in his reports to Government on the books printed in the Bombay Presidency during the years 1889 and 1890.

## Mauna Yauvana or the Mute young Lady.

A love story,———the principal character *Saguna* and other characters are well depicted in a forcible style and pure language, and the book is on the whole a valuable contribution to Marathi Literature.

## Shri Vikramaditya or Prachin Bharatbhumi.

*Entertainment Series of the Poona Night Club, No. 2,* an incomplete tale describing the generous and valorous deeds of *Vikramaditya*, a king of *Oojein*, is the best novel.



**यस्य निश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् ।**
**निर्ममे तमहं वंदे विद्यातीर्थं महेश्वरम् ॥ १ ॥**

सकल विद्यांचें आदिस्थानभूत, कीं ज्याच्या निश्वासमात्रें-करून वेद निर्माण झाले, ज्यानें वेदांपासून सर्व जग उत्पन्न केलें, तसेंच संपूर्ण विश्वाचें सूत्र चालविणारा, ज्याच्या कृपे-शिवाय सर्व मनुष्य प्रयत्न व्यर्थ होत, त्या परमेश्वरास आह्मी मनोभावानें कृतज्ञतापूर्वक नमन करून आमच्या कृत्यास यश येण्याकरितां त्याचा प्रसाद मागतों.

नाइटक्लुब ग्रंथ मालिकेचा प्रस्तुत तृतीय ग्रंथ विद्वज्जन समूहापुढें सादर करितांना आह्मांस अत्यानंद होत आहे. द्वितीय ग्रंथारंभीं नाइटक्लुब संस्थेचा मूळ उद्देश रसिकजनांस सविनय कळविलाच आहे, तेंव्हां त्याची द्विरुक्ति करण्याचें प्रयोजन नाहीं. गतवर्षी गुणग्राहक सद्गृहस्थांकडून संस्थेस जें साहाय्य झालें, त्याबद्दल संस्था चालक मंडळी त्यांची फार ऋणी आहे. दिवसेंदिवस संस्थेचा जो उदय होत आहे, त्याचें सर्व श्रय लोकाश्रयाकडे व श्रेष्ठलोकांकडे आहे. यापुढें मालिकेचा ग्रंथ प्रति सहामाही काढावा, अशी आह्मीं उमेद धरून आहोंत.

पुणें, सदाशिवपेठ,<br>नाइटक्लुब आफीस,<br>ता० ९ नवंबर १८९१

**वासुदेव रंगनाथ शिरवळकर.**<br>**विनायक त्रिंबक मोडक.**<br>ग्रंथकर्ते.

# श्रीविक्रमादित्य
## अथवा
# प्राचीन भरतभूमि.

(भाग दुसरा.)

हर! हर!! ज्या आमच्या पूर्वजांनीं समरांगणामध्यें जाऊन आपल्या राजलक्ष्मीचें व आपल्या जन्मभूमीचें अविंधांचे हातून संरक्षण करण्याकरितां मोठाले पराक्रम केले, ज्यांनीं शत्रूंच्या दंष्ट्रा विदारण करून त्यांस स्वपदनत केलें, ज्यांनीं मोठालीं धर्मकृत्यें करून दिगंत उज्ज्वल कीर्ति संपादन केली, ज्यांनीं अंगावर रोमांच उभे राहतात, असे कष्ट भोगिले, परंतु तिळमात्र सत्व ढळूं दिलें नाहीं, ते स्वर्गांत सुखमग्न असलेले आमचे पूर्वज आमची हीन स्थिति पाहून हाहाकार करून शोकाकुल झाले असतील, व आपल्या श्रेष्ठ कुलांत असे क्लीबाप्रमाणें भीरुजन निर्माण झाले, हें पाहून आपण आपल्या सुखस्थानापासून भ्रष्ट होऊं कीं काय, या दुःखविवंचनेंत पडले असतील. खरोखरच, अशा नरशार्दूलांच्या पोटीं आम्ही कूपमंडूक उत्पन्न होऊन त्यांना लांच्छन मात्र आणीत आहोंत. तेच पुरुष धन्य, कीं जे आपल्या बाहुबलानें शत्रूंच्या शिरांवर पाय ठेवितात, गोब्राह्मण आणि सुहृज्जन यांचें उपजीवन करितात, आपल्या शौर्यबलानें व नीतिशास्त्रपरशासनानें स्वजनांचा सां-

माळ करितात, आणि आपल्या कुलाचारास विपत्प्रसंगींही सोडीत नाहींत.

* * * * * * * * *

## यक्षिणीचा वृत्तांत.

"या भरतखंडाच्या पूर्वेकडेस सृष्टिसौंदर्य ज्या स्थलीं केवळ जागृत आहे, अशा त्या मगध देशांत एक प्रबल राज्य थोडे दिवसांपूर्वीच नष्ट दशेस पावलें. ज्या देशांत मानव जातीनें आपल्या पराक्रमाची पराकाष्ठा करून सोडिली आहे, ज्यांतील नगरें सुंदर स्त्रियांनीं आणि विद्याचारसंपन्न पुरुषांनीं गजबजून गेलीं आहेत, ज्या देशांतील पुरुषांचीं शरीरें भव्य असून जे आपल्या बाहुबलाचा मोठा गर्व मानीत आहेत, ज्यांतील नववधू अप्सरेप्रमाणें रूपसंपन्न आहेत, व जेथील देवालयांचीं शिखरें गगनचुंबित असून ज्यांचे कळस सुवर्णाच्या पत्र्यांनीं वेष्टिलेले आहेत, अशा त्या देशाची राजगृह ( बहारशहर ) नामें मोठी राजधानी होती.

"ज्या राजधानींतील मार्ग विशाल असून जेथें ठायीं ठायीं निरनिराळ्या आकारांचीं कारंजीं केलेलीं होतीं, ज्या ठिकाणीं दारिद्र्याचें वास्तव्य मुळींच नसून जेथील भूमि अत्यंत सुपीक होती, जेथें सर्व प्रकारचीं सुवासिक पुष्पें व मधुर फळें निर्माण होत असत, पृथ्वींतील कोणत्याही नगरीस जिची बरोबरी करितां येत नसे, ज्या नगरींत बदामाचे वृक्ष असंख्य असल्यानें त्यांच्या पुष्पांनीं सर्व नगरींत सुगंध सुटलेला असे, व जेथें उत्तम गाणारे पक्षी निपजतात, अशा त्या राजधानींत चित्ररथराजा राज्य करीत होता.

"भारतीयुद्धाच्या पूर्वी मरण पावलेला जो महापराक्रमी व

गर्विष्ठ राजाजरासंध, ज्यानें शेंकडों राजे कारागृहांत घातले होते, अशा त्या राजाचा पुत्र जो सहदेव त्याच्याच वंशवृक्षाचें हें ( चित्ररथ ) शेवटचें फळ होय. महाराज जाणतच असतील कीं, या मगध देशांत सहदेव, मार्जारी, श्रुतश्रवा, अयुतायु, निरमित्र, सुनक्षत्र, बृहत्सेन, कर्मजित्, सृतंजय, विप्र, शुचि, क्षेम, सुवृत, धर्मसूत्र, शम, द्युमत्सेन, सुमति, सुबल, सुनीथ, पुरंजय अथवा रिपुंजय, वगैरे मोठाले पराक्रमी राजे होऊन गेले. या एकंदर राजांनीं एक सहस्र वर्षें राज्य केलें.

" चित्ररथाचें बालपण अतिक्रांत झाल्यावर त्याच्या पित्यानें मुलाचें चित्त खेळाकडे न लागावें म्हणून, राजगृह नगरीपासून एका कोसावर भागीरथीचे कांठीं एक भव्य विद्यामंदिर करविलें. त्या मंदिरांत मोठाल्या अश्वशाला व व्यायामशाला बांधिल्या होत्या, व बालक्रीडेचा व्यासंग अगदीं नाहींसा होऊन त्याचें मन विद्येकडेसच लागावें, अशी व्यवस्था केली होती. जगामध्यें ज्या असंख्य घडामोडी होतात, त्यांसंबंधीं खरें ज्ञान त्यास प्राप्त होण्यास कांहींच साधन नव्हतें. त्यास तें शिक्षकाचे मुखानें मात्र कळत असे. त्या विद्यामंदिरांत सृष्टिसौंदर्याची शोभा पहाण्यास त्यास कधींच सांपडली नाहीं. अशा प्रकारें चित्ररथाचें वय अठरा वर्षांचें होईपावेतों त्यानें त्या विद्यामंदिरांत सकल विद्यांचें गृहण केलें.

" नंतर ज्याप्रमाणें सिंहाचा छावा सांपळ्यांतून मोकळा सोडावा, त्याप्रमाणें आतां चित्ररथ त्या विद्यामंदिरांतून मुक्त होणार, तोंच एकाएकीं त्याच्या पित्यास देवाज्ञा झाली, व अल्प वयांतच त्याजवर मोठा दुःखाचा प्रसंग ओढवला. प्रधान, मंत्री, सेनाध्यक्ष व कुलगुरु यांनीं येऊन युवराजास राज्याचें सूत्र हातीं घेण्याची विनंति केली, व पुढें थोडेच दिवसांत

त्यास राज्याभिषेक झाला. याप्रमाणें चित्ररथ अल्प वयांतच सिंहासनारूढ झाला.

" चित्ररथानें तारुण्याचे भरांत राज्यकारभाराचा सर्व भार प्रधानादिक मंडळीवर सोंपवून आपण विषयसुखांत निमग्न झाला. आजपर्यंत अज्ञानावस्थेंत परतंत्रतेनें वडिलांचे शिक्षेंत एकांतवासांत जे दिवस गेले, त्या सर्वांचें तो आतां उट्टें काढूं लागला. तुंबलेल्या तडागाचा ज्याप्रमाणें एकाएकीं बांध फुटून उदक सैरावैरा धावूं लागतें, त्याप्रमाणें आजपर्यंत प्रतिबंधांत असलेली त्याची मनोवृत्ति विवेकरूपी बंध फोडून कामवासना तृप्त करण्याकडे धांवली. सांप्रत त्यास असें भासूं लागलें कीं, मी करीन ती पूर्वदिशा. मंत्रीमंडळानें त्यास त्या नीच स्थितींतून उपदेश करून बाहेर काढण्याचा प्रयत्न न करतां त्याचें मन कुकर्मी जास्त प्रवृत्त होण्यास भर दिली. राजाचा कल पाहून त्यांनीं बोलावें. राजा विषयांध झाल्यानें राजकीय कामांचा त्यास त्रास येऊं लागला. त्यानें सर्व प्रकारें प्रधानमंडळावर विश्वास ठेविला. ज्यास या जगाचा तिळमात्र अनुभव नाहीं, ज्यास राजशकट कसा चालवावा, हें मुळींच अवगत नाहीं, अशा त्या चित्ररथराजानें अज्ञानावस्थेंतच कामदेवाची कांस बळकट धरिली.

" सौंदर्यानें तर केवळ तो मदनाचा पुतळाच होता. शरीराचा बांध उंच असून डौलदार होता. अंगावर राजलक्ष्मीचें तेज दैदीप्यमान दिसत असे. मस्तकाचे केश काळे भोर असून तकतकीत होते. नेत्रकमलें विशाल व पाणीदार होतीं. त्याच्या मुखश्रीकडे पाहिलें असतां, तो मोठा पिळदार व आढ्यतेचा राजा आहे असें वाटे. असें सौंदर्य, अशी सतेजता, इतकें ऐश्वर्य, एवढी राजसत्ता, परंतु काय उपयोग !

कामानल महादारुण ! ! तो एकदां पेटल्यावर या सर्वांच्या त्यामध्यें आहुति पडूं लागल्या ! ! !

"अशा रीतीनें दोन वर्षें लोटलीं नाहींत तोंच, राजाचे वर्तनानें प्रजाजन त्रस्त झाल्याचीं चिन्हें राज्यांत दिसूं लागलीं. लोक ह्मणूं लागले, 'प्रस्तुत राज्यामध्यें मंत्रीमंडळाकडून आह्मां प्रजाजनांचा जो मोठा छल होत आहे, त्याचें निवारण चित्ररथ राजाकडून कांहींच होत नाहीं; त्याच्या पित्यानें संपूर्ण प्रजा पुत्रवत पाळिली होती; मासचे मास अतिक्रांत होतात परंतु आह्मांस आमच्या प्रभूचें दर्शन सुद्धां होत नाहीं; आमचे प्रभू मंत्रीजनांचे लाघवी भाषणास मोहून जाऊन सर्व प्रकारें त्यांच्यावर काय ह्मणून भरंवसा ठेवितात ? आमच्या पूर्वींच्या महाराजांचें मन प्रजापालनीं किती दक्ष होतें ! हर हर ! ! आह्मां गरीबांचा हल्लीं फार छल होत आहे ! ! !' परंतु नगरवासी जनांचा हा विलाप राजवाड्याच्या तटाच्या भिंती फोडून अंतःप्रदेशीं जाणार कसा ! मंत्रीमंडळानें वारंवार राजास निवेदन करावें कीं, 'संपूर्ण प्रजाजन व नागरिकजन पूर्वींपेक्षां आनंदानें नांदत आहेत; त्यांना सांप्रत जितकें सुख मिळत आहे, तितकें आपल्या पित्याच्या हातून सुद्धां मिळालें नाहीं.'

"इतक्यांत एक विलक्षण प्रकार घडून आला. वंग ( गौडबंगाल ) देशाचा महापराक्रमी राजा वीरबाहु यास चित्ररथाचा प्रजाजन दुष्ट मंत्रीमंडळाच्या छलानें त्रस्त झाला आहे, अशी वार्ता समजली. अशा संधीची तो मार्गप्रतीक्षाच करीत होता; कारण त्याचा मानस मगध देशाचें राज्य स्वसत्तेखालीं आणावें, ह्मणून फार दिवसांपासून होता, व सांप्रत तर त्यास अनायासेंच राजाच्या दुर्वर्तनानें तसें करण्यास फावलें. त्यानें प्रचंड सेनासमूह जमाकरून मगध देशावर चाल केली, व मा-

गधीजनांस संदेशद्वारें कळविलें कीं, 'मजला केवळ तुमची दया येऊन तुह्मांस क्रूर मंत्रीमंडळाकडून सांप्रत पीडा होत आहे, ती दूर करण्यासच मी येत आहें, व तुमचे दुष्ट राजास पदच्युत करून तुह्मांस सुख प्राप्त व्हावें, अशी माझी इच्छा आहे.' चित्ररथाचा संपूर्ण प्रजाजन त्याच्या वर्तनक्रमास जरी त्रस्त झाला होता, तरी त्यास परतंत्रतेचें जूं स्कंधावर घेण्याची इच्छा नव्हती. शिशुनाग प्रधानानें सैन्याची जमवाजमव करतांच, सहस्त्रशः वीरपुरुष त्याला जाऊन मिळाले. भागीरथीतटाकीं पाटलीपुत्र नगरीचे सन्निध मोठें तुंबळ युद्ध झालें; परंतु शेवटीं विजयश्रीनें वीरबाहूसच माळ घातली. शिशुनाग प्रधानाच्या सर्व सैन्याची दाणादाण झाली, व त्यानें स्वतः सुद्धां समरांगणांतून शत्रूला पाठ दाखवून पलायन केलें ह्मणूनच तो वांचला, नाहींतर प्राणास मुकला असता. क्षत्रियांनीं युद्धांत पाठ देऊन पलायन करणें, ह्मणजे महा लांच्छनास्पद गोष्ट आहे.

"ही अपयशाची दुर्वार्ता पौरजनांस समजतांच त्यांची पांचांवर धारण बसली. आतां लौकरच आपण परकीय राजाच्या स्वाधीन होऊं, हा विचार त्यांच्या मनांत येऊन त्यांच्या काळजाचें पाणी झालें. आतां वीरबाहु राजगृह नगरीस येऊन वेढा घालील अशी बोलवा चोंहोंकडे पसरली. राज्यावर परचक्र आलें ह्मणजे त्यावेळचा प्रसंग अति भयंकर असतो. घायाळ झालेल्या दळासमवेत शिशुनाग प्रधान राजनगरींत येऊन पोंहोंचतांच, त्यानें ही भयोत्पादक गोष्ट राजाच्या कानावर घातली. हा कालपावेतों झालेला वृत्तांत प्रधानमंडळानें चित्ररथ राजास जाणविलाच नाहीं. त्यांचा विचार त्याच्या सुखाचा भंग करण्याचा नव्हता; परंतु आतां जिवाशीं येऊन बेतली,

प्राणसंकट ओढवलें, सर्व राजनगरांत हाहाकार उडाला, चित्ररथराजा विषयसुखनिद्रेंतून एकदम जागृत झाला, त्याचे हृदयांत धस्स झालें, नीट शुद्धीवर येऊन पाहतो तों शत्रूनें आपल्या सैन्याची दाणादाण केलेली आहे, समरभूमीमधून शिशुनाग प्रधान पलायन करून आला आहे, व शत्रु केवळ दोन दिवसांच्या मार्गावर असून आपल्यावर चढाव करून येत आहे, हें त्यास दिसून आलें.

"चित्ररथानें सुंदर पुष्पशय्या पसरलेल्या मंचकावरून धाडकन खालीं उडी घातली. सन्मुख तरुणीजन नानाप्रकारचीं हास्यकारक व विनोदपर भाषणें करून राजाचें मन रंजवीत होता, त्यास एकदम स्वस्थानीं जाण्याची आज्ञा झाली. चित्ररथानें मोठ्या प्रीतीनें त्यांच्या मृदुहस्तांतून पुष्पांचे सुंदर गुच्छ सुवास घेण्याकरितां ग्रहण करावेत, ह्मणून त्यांनीं पुढें केलेलीं आपलीं हस्तकमलें त्यानें या प्रसंगीं झिटकारून टाकलीं. आलेल्या प्रसंगास मोठ्या धैर्यानें तोंड देण्याचा आविर्भाव त्याच्या मुखावर व्यक्त होऊं लागला. गायन, वादन व नृत्य करून रंजविणारा वेश्याजन, वाक्पटुत्व करून आनंद देणारे स्तुतिपाठक, व विषयसमुद्रांत लोटून देणारें नीचतम असें जें मंत्रीमंडळ, या सर्वांचा त्यानें एकदम त्याग करून युद्धास जाण्याचीं वस्त्रें परिधान केलीं. त्यानें आपले मस्तकास शिरस्त्राण घातलें, अंगांत कवच घातलें, कटिवलयांत नानाप्रकारचीं तीव्र शस्त्रें खोंविलीं, हस्तांत धनुष्यबाण धारण केला व आतां रथारूढ होऊन सेनेसमवेत शत्रूच्या अंगावर तुटून पडण्यास जाणार, तों इतक्यांत त्याची क्षत्रियकुलभूषण वृद्ध माता त्यास समरमुख होण्याविषयीं उपदेश करण्यास आली. तिला पाहतांच नम्रतेनें त्यानें आपलें मुख खालीं घातलें. त्या समयीं ती

वीरमाता चित्ररथास मोठ्या त्वेषानें व धिःकारपूर्वक बोलूं लागलीः—

'अरे चित्ररथा, तूं कोणाचा पुत्र आहेस, याचा विचार केलास काय ? तूं असा क्लीबासारखा शत्रूला भिऊन काय बसलास ? समरांत जा. तुझे स्वर्गस्थ पितर शोक करीत असतील, याचा तुला कांहींच खेद वाटत नाहीं काय ? ज्याला वीरश्री नाहीं तो पुरुष कसचा ? शत्रूंनीं तुझ्या राजलक्ष्मीच्या अंगावरचा पदर काढण्यास हस्त पुढें केले आहेत, त्यांच्या हस्तांचें छेदन करण्यास तूं आपला खड्ग उगारीत नाहींस काय ? तूं आमच्या पुण्यक्षात्रकुलाला कालिमा आणलीस ! जरासंध व श्रुतश्रवादि तुझ्या पूर्वजांनीं संग्रामामध्यें जाऊन कसकसे आश्चर्यकारक प्रताप केले, याचें कांहीं तरी स्मरण कर, ह्मणजे तुझ्या अंगांत स्फूर्ति उत्पन्न होईल. त्यांनीं मिळविलेल्या दिगंत उज्ज्वल किर्तीस तूं विषयसुखांत निमग्न होऊन कालिमा मात्र आणलीस, असें जनांचें ह्मणून नकोरे घेऊं. शत्रूशीं दारुण युद्धप्रसंग करून आपल्या पूर्वजांचें प्रखर तेज प्रकट कर. आतां स्त्रीलंपट होऊन हे वेडे वेडे चार करण्याचा त्याग कर, जयापजयाचा तिळमात्र विचार न करतां, व स्वप्राणाची आशा न बाळगितां, वीराप्रमाणें शत्रूच्या छातीवर जाऊन उभा रहा. युद्धांत पतन पावलास तर मोक्षास जाशील, व जयशाली झालास तर संपूर्ण प्रजाजनांचें व राजलक्ष्मीचें संरक्षण करून धन्य धन्य ह्मणून घेशील. जे शत्रूच्या प्रतापाला भिऊन त्यास शरणागत होतात, जे स्वकर्तव्यपराङ्मुख होतात, जे आपल्या प्रजाजनांना, भूवधूला, व बंधुगणाला शत्रूंच्या स्वाधीन करतात त्यांना इहपर लोकीं सद्गति कधींही मिळणार नाहीं, आणि अशा वर्तनानें तूं आपला जीव वांचविलास तर त्यांत काय राम आहे ?

पिंड भक्षण करून काकपक्षी हजारों वर्षे जगतात; त्यांच्या जगण्यांत कांहीं अर्थ आहे काय ! ! शत्रूंना शरण जाऊन आपल्या प्रजाजनांला त्यांच्या स्वाधीन करून मग पुष्कळ दिवस जगून काय कर्तव्य आहे ? यापेक्षां समरांगणांत धारातीर्थी पतन पावणें अत्यंत श्रेष्ठ. अरे पराधीन कोणीं रहावें ? आह्मीं अबलांनीं राहिल्यास चिंता नाहीं, व त्याखेरीज आह्मांस शोभा नाहीं; आह्मीं राहिलेंच पाहिजे. पराधीनता शुद्ध यमयातना आहे. तुझ्या पित्यानें तुला सकलविद्यापारंगत केलेलें आहे; तर मग सांग बरें कीं, राजानें परस्वाधीन रहावें, असें कोणत्या नीतिकारानें सांगितलें आहे ह्मणून ? स्वकुलनाशक असा नीचतम होऊं नकोस.

'आपल्या कुलांत असा तूं कुलांगार कसा निर्माण झालास, हें पाहून तुझ्या पितरांचे वीरात्मे दुःखाकुल झाले असतील. तुझ्या प्रजजनांना आज आपणांस प्रभू असून नसल्याप्रमाणें झाला आहे, याचें मला फार दुःख वाटतें. चित्ररथा पहातोस काय ? ऊठ, ऊठ. आपले गजाश्वरथ सिद्ध करण्यास आज्ञा कर. आपले रथी-महारथी युद्धसंग्रामास पाचारण कर. आपल्या सैनिकांना युद्धास जाण्याकरितां सिद्ध होण्यास आज्ञा कर. त्यांना धीराच्या दोन गोष्टी सांगून त्यांच्याठायीं स्फूर्ति उत्पन्न कर. दळाची सिद्धता करून रणभेरी वाजविण्याची आज्ञा कर, ह्मणजे सेनाजनांच्या अंगांत वीरश्री उत्पन्न होईल. तुझे शत्रू भ्रमित चित्त होतील असें शौर्य तूं प्रगट कर. तूं व तुझे सैनिक सांप्रत मगध देशांत असल्यानें तुह्मांस जसें आपल्या देशाचें, त्यांतील गिरिकंदरांचें, दुर्गांचें, पहाडांचें, नदनद्यांचें, युद्धाच्या मान्याच्या जागेचें ज्ञान आहे, तसें वीरबाहूस नाहीं; आपल्या सेनेच्या साह्यानें आपल्या शत्रूची दाणादाण उडवून

टाक. त्यांना व्यसनग्रस्त कर. अरे माझें जन्म उच्च कुलांत झालें असून, तेथून ज्या कुलांत मी आलें तेंही कुल श्रेष्ठ आहे. ह्याकालपर्यंत पतिसमागमें मीं मोठेपणांत दिवस काढिले, त्या मला तूं माझा पुत्र असून मजला हीन दशेप्रत नेत आहेस! शत्रू पराजित होऊन तूं विजयी व्हावेंस, व तूं राज्यकारभार चालवावास हें तर अत्यंत इष्ट आहे, परंतु जर यदाकदाचित् समरामध्यें तूं मृत्युमुखीं पडलास, तर मी आपल्यास वीरमाता समजून अति धन्य धन्य मानीन; फार काय सांगूं, पण मला वीरमाता ह्मणून घेण्याची जितकी उत्कट इच्छा आहे तितकी दुसरी कशाचीही नाहीं! तुला असें वाटत असेल कीं, मी तुझा एकुलता एक पुत्र असून तूं मला असे कठोर वाग्बाण काय ह्मणून मारतेस? पण मी तुला एकच निर्वाणीची गोष्ट सांगतें कीं, अशा निर्बल,भिरू,स्त्रैण, विषयांध पुत्रास मी आपला पुत्र समजत नाहीं. इतकेंच तर काय, परंतु तूं जर आपल्या प्राणाच्या भीतीनें शरणागत होऊन हा श्रेष्ठ क्षात्रकुलोत्पन्न देह, आपल्या शत्रूच्या स्वाधीन करशील, तर मी आपल्यास निपुत्रिक, वंध्या समजून देहत्याग करीन, व मातृहत्या केल्याचा दोष तुझ्या माथीं येऊन बसेल!!'

"हीं हृदयाला शल्य पाडणारीं भाषणें चित्ररथाचे जिव्हारीं झोंबलीं; त्याचें अंतःकरण दुमांग झालें; आणि वीरमातेचा धिःकारपूर्वक हा सद्बोध ऐकून कोणा पराजित पुरुषास आपल्या शत्रूवर चालून जाण्यास स्फुरण येणार नाहीं? चित्ररथास हे प्रतोदप्रहार आतां असह्य होऊन त्यानें आपल्या मातोश्रीच्या पादकमलावर मस्तक ठेविलें, त्यासमयीं तिनें त्यास "तूं विजयी होशील" असा आशीर्वाद दिला, तीच त्यानें शकुनगांठ बांधिली. ज्याप्रमाणें एखाद्या निद्रिस्त व्याघ्रास डवचून

जागृत करावें, अथवा ज्याप्रमाणें एखाद्या प्रबल विषारी भुजंगाच्या शेंपटीवर पाय पडावा ह्मणजे तो जसा उलटखाऊन कडकडून दंश करण्यास चुकणार नाहीं, अथवा तो व्याघ्र जसा जिवाची अशा सोडून आपल्या शत्रूवर झडप घालील, त्याप्रमाणें चित्ररथाला त्या वीरमातेच्या सणसणीत भाषणानें क्रोध उत्पन्न होऊन, तो अनिवार झाला. त्यास आतां त्या वीरबाहूचे नरडीचा घोंट केव्हां घेईन असें झालें. क्रोधवन्हीच्या धूम्रपटलानें त्याची दृष्टि व्याप्त झाली, व तो आपले नेत्र गरागर फिरवूं लागला. संतापानें कराकर दांत खाऊं लागला. ज्याप्रमाणें मंद झालेल्या अग्निवर घृतसिंचन झालें असतां, तो एकदम प्रज्वलित होऊन त्याचा भडका होतो, त्याप्रमाणें त्या वीरमातेच्या मर्मभेदक भाषणानें चित्ररथाचा क्रोधाग्नि भडकला, व स्यंदनारूढ होऊन तो सर्वांच्या अग्रभागीं जातांच, संपूर्ण दलभार आपआपलीं आयुधें सिद्ध करून, कोणी अश्वारूढ होऊन, कोणी गजारूढ होऊन, व कोणी रथारूढ होऊन आपआपल्या मानाप्रमाणें जाऊं लागला. जिकडे तिकडे रणवाद्यांचा एकच कर्कश ध्वनि होऊं लागला. प्रजाजन राजाची स्तुति गाऊं लागले. समरांगणामध्यें गेल्यावर शरीर गतप्राण होईपावेंतों पाऊलभर भूमीचें सुद्धां परत उल्लंघन करावयाचें नाहीं, अशा सर्व लोक आणा वाहूं लागले. शिशुनाग प्रधानास, त्यानें समरभूमींतून पलायन केलें ह्मणून चित्ररथानें प्रतिबंधांत टाकिलें. अग्रभागीं चित्ररथाचा रथ चालला होता. त्याच्या मागून चातुरंगसेना चालली होती. गजाच्या रथाचे अश्व चपळतेनें चवताळून वायूपेक्षां असह्य वेगानें चालले होते. मेघगर्जनेप्रमाणें मोठा गंभीर असा दुदुंभिध्वनि होऊं लागला. जिकडे तिकडे राजाची स्वारी दिग्विजयार्थ निघाली, असा शब्द

ऐकून त्वरेनें धावणारें जें सैन्य त्याच्या योगानें भूमि कंपायमान दिसूं लागली. त्या समयीं भूतल अश्वमय, गजमय, व ध्वजमय दिसूं लागलें. अश्वांचे व गजांचे कठोर शब्द वारंवार होत, त्याच्या योगानें दशदिशा दणाणून गेल्या. अश्वपंक्तीच्या मागोमाग गजपंक्ति चालल्या होत्या. सैन्याच्या पादाघातानें सर्व दिशांस व्यापणारा जो धुरळा उठला त्यानें आकाशपटल व्याप्त झालें, व सूर्यबिंब क्षणमात्र निष्प्रभ दिसूं लागलें.

"प्रातःकालीं प्रहर घटका दिवसाच्या सुमारास युद्धास प्रारंभ झाला. वीरबाहूचें सैन्यही चित्ररथाच्या सेनेप्रमाणें अनिवार व असंख्य होतें. त्याच्या सैन्यांत रथ, अश्व व मदोन्मत्त गज पुष्कळ होते. उभयतां दळें एकवटून पर्जन्याच्या असंख्य धारांप्रमाणें उभयतांच्या सैन्यांत शरवृष्टि होऊं लागली. उल्हाटयंत्रांचा भडिमार सुरू होऊन सर्वत्र धूम्रमय दिसूं लागलें. आकाशपटलांत चमकणाऱ्या सौदामिनीप्रमाणें त्या भयंकर युद्धांत रविप्रकाशानें वीरांचीं शस्त्रें चमकूं लागलीं. असंख्य वीर घायाळ झाले. कित्येक गतप्राण होऊन भूमितलावर पडले. जिकडे तिकडे रणभूमि रक्तस्रावानें डवरली. गतप्राण झालेल्या वीरांवरून गजाश्वरथ जाऊं लागले. सर्वत्र रक्तमय व मांसमय दिसूं लागलें. प्रेतांचे ढीग पडले. याप्रमाणें माध्यान्हकाल होईपावेतों घनघोर युद्ध झालें, परंतु वीरबाहु अंगुल मात्र भूमि परतला नाहीं.

" मग काय ! चित्ररथाला अनिवार त्वेष येऊन त्यानें आपल्या सारथ्यास वीरबाहूचे रथावर आपला रथ प्रबल मारुतवेगानें नेऊन घालण्याची आज्ञा केली. त्यानें अश्वांस संकेत करतांच विद्युच्चापल्यानें तो रथ शत्रूच्या रथावर जाऊन आदळला. या धडकीनें वीरबाहूच्या रथाच्या ध्वजस्तंभाचा भंग

होऊन त्याजवर धरिलेलें छत्र मोडून पडलें. चित्ररथानें हस्तामध्यें गदा घेऊन ती आपल्या मस्तकाभोंवतीं गरगरा भोंवाडून तिचा वीरबाहूचे मस्तकीं आतां प्रहार करणार, तोंच वीरबाहूनें रथाखालीं उडी घातली. हें अवलोकन करून चित्ररथ रथाखालीं उडी घालणार, इतक्यांत सन्निध अश्वारूढ असलेल्या शरीररक्षकांनीं स्वामीस विनंति केली कीं, 'वीरबाहु विरथ झाला आहे तथापि महाराजांनीं तसें करूं नये.' इतक्यांत पुनरपि वीरबाहु स्यंदनारूढ होऊन बाणांचा वर्षाव करीत चित्ररथावर चालून आला. उभयतां एकमेकांस वक्रतेचीं व दर्पोक्तीचीं भाषणें करूं लागले. चित्ररथाच्या सेनेनें आपल्या स्वामीनें केलेलें धाष्टर्य पाहून असंख्य महारथ्यांनीं शत्रूंचे रथावर आपले रथ घातले. एकमेकांचे रथ एकमेकांच्या रथावर आदळले. गजाश्वांच्या टकरा होऊं लागल्या. अश्वारूढ झालेल्या वीरांनीं भाले पुढें धरून एकमेकांवर चाल केली, व असंख्य पादचारी सेना, एकमेकांशीं द्वंद्वयुद्ध करूं लागली.

वरील वर्णन वाचीत असतांना आमच्या वाचकांस महाभारतांतील युद्धप्रसंगाचें स्मरण होऊन आपल्या लोकप्रिय मयूर कवीच्या कवितेची आठवण झाल्याशिवाय रहाणार नाहीं. द्रोणपर्वांत पंतांनीं ह्मटलें आहेः—

रथ थडकले, भडकले हय, शस्त्रजवन्हि धडकले वरते ॥
अन्योन्य द्व्यंगुलही राहों देती न धड कलेवरतें ॥ १ ॥ "

भीष्मपर्वांत पंत ह्मणतातः—

सूं सणणण सणणणणण, वाजति शर-निकर काय-हानि-कर
वदले सुरमुनि करितों, नररूपें रुद्र काय हा निकर ॥ १ ॥
शरधी जलधी फुटले कीं दैवें-पाश एकदां तुटले ॥
कीं काल व्याल करटि-घोटक-भटभेक खावया सुटले ॥ १ ॥"

" असें तुंबळ युद्ध चाललें असतां, चित्ररथ प्रतिक्षणीं आपल्या सैनिकांना वीरश्री जास्त उत्पन्न व्हावी म्हणून मुखानें " वाहवा ! तुम्हीं मोठा पराक्रम केला ! शत्रूंचा नाश होत चालला आहे, " असें भाषण करून उत्तेजन देत होता. केव्हां केव्हां शत्रूंच्या दळभारावर आपल्या दळभारासह तुटून पडत होता, व केव्हां केव्हां पर्जन्याच्या धारांप्रमाणें वर्षाव होत असणाऱ्या शरवृष्टींत आपण शिरत होता; परंतु वीरबाहु किंचित् मागें सरत आहे नाहीं तोंच, त्यानें झाडींत गुप्तरीत्या ठेविलेल्या निवडक लोकांनीं शलभवृष्टीप्रमाणें एकाकीं चित्ररथाचे सैन्यावर तीव्र बाणांचा वर्षाव केला. मागधीजनांला ती वृष्टि अनिवार झाली, व त्यांच्यांत किंचित् गोंधळ होत आहे नाहीं तोंच, गौडदेशीय लोकांनीं सैन्यांत शिरून शस्त्रांचे प्रहार करण्यास आरंभ केला. भडभडां मागधीजनांचे कोथळे फुटून रक्ताचे पाट वाहूं लागले. एकच आकांत उडाला. चित्ररथाच्या बहुतेक लोकांची वाताहत झाली. उरलेले घायाळ हुंबत जीव घेऊन सैरावरा पलायन करूं लागले. भगवान सहस्ररश्मि दिनकर यासमयीं क्षितिजाखालीं जात चालल्यानें त्या उद्विग्न झालेल्या सैनिकांवर त्याची रक्तवर्ण प्रभा पडली होती. तो भयंकर हृदयद्रावक देखावा पाहून अति कठोर अंतःकरणाच्या पुरुषाचें सुद्धां हृदय विदीर्ण झाल्याशिवाय राहिलें नसतें.

" सूर्यबिंब अस्तास जातांच जिकडे तिकडे भयंकर रात्र पडली. चित्ररथाचे लोक घायाळ होऊन ठिकठिकाणीं बेशुद्ध पडले होते, व कित्येक शत्रूला पाठ दाखवून जीव घेऊन पलायन करीत आहेत, हें पाहून तो गलितधैर्य झाला. आतां असें कृष्णमुख नागरिक जनांस व मातेस दाखविण्यापेक्षां येथेंच आपण मृत्युमुखांत पडावें हें चांगलें, असा मनांत विचा-

र करून त्यानें रथाखालीं उडी घातली. वज्रप्रहारानें हृदयावर ताडलेलाच काय, किंवा मस्तकाच्याठायीं अकस्मात विद्युत्प्रहार झालेलाच काय, असा तो हतभागी चित्ररथ राजा अत्यंत कासावीस होऊन मुखांत धूळ घालून घेऊं लागला. एका प्रचंड वृक्षाच्या मूलप्रदेशीं त्यानें आपलें शरीर धाडकन टाकून दिलें, व कोणी तरी शत्रूकडील येऊन माझा शिरच्छेद करील अशी वाट पाहूं लागला. सन्निध असलेल्या परिमित एकनिष्ठ स्वामिभक्त सेवकजनांनीं, चित्ररथानें त्यांच्या समागमें पलायन करून स्वप्राणांचें रक्षण करावें, म्हणून त्यास विनवणी करून आपली पराकाष्ठा करून पाहिली परंतु सर्व निष्फल झालें. त्यानें त्यांस एकदम निघून जाण्याची आज्ञा केली, व ते शोकाकुल होत्साते त्या समरभूमीपासून निघून गेले.

"जिकडे तिकडे भयंकर काळोख पडला. सर्व रणांगण सहस्रशः प्रेतें पडल्यानें फारच भयंकर दिसूं लागलें. चित्ररथ आपल्या सन्निध कोणी सेवकजन राहिला नाहीं, असें पाहून हीन अबलाजनांप्रमाणें मोठ्यानें आक्रोश करूं लागला. मस्तकाचे केश तडातड उपटूं लागला. हृदयावर व ललाटावर मोठाले मुष्टिप्रहार हाणून घेऊं लागला, व आक्रंदत म्हणूं लागला कीं, 'हायरे देवा! आतां विलाप करून काय होणार? परमेश्वरानें माझ्या अपराधाप्रीत्यर्थ मजला योग्य शासन केलें. अव्याहत दोन संवत्सरपावेतों मी अति निंद्य कर्मास प्रवृत्त होऊन विषयसुखांत मग्न होतों. मातेच्या अमृततुल्य उपदेशाची प्रतिक्षणीं अवहेलना करीत होतों, आणि सांप्रत या सर्व दुष्टकृत्यांचें फल परमेश्वरानें मला एका चार प्रहरांत दिलें. राज्याला मुकलों, कीर्तीला मुकलों, हर! हर!! सर्वतोपरी अति नष्ट व अत्यंत निंद्य दशेला प्राप्त झालों!!! प्रजाजनांची मजवर आतां

केवढी अवरुपा झाली असेल ! आतां हें माझें खालीं आलेलें दुर्दैवाचें पारडें एकदम उंच जाईल काय ? एकदम त्या वीरबाहूचा पराजय होऊन मला माझें राज्यपद मिळेल काय ! हर ! हर ! ! ही व्यर्थ आशा ! असें झालें तर पराजयाचा जय झाला व अपकीर्तीची सुकीर्ति झाली ह्मणावयाची; आणि जगदीशास असें करणें अशक्य आहे काय ? परमेश्वर करील तर एका निमिषमात्राचें काम आहे. ( करुणायुक्त स्वरानें उभय हस्त जोडून ) हे दीनयाळा प्रभो, हे सृष्टिस्थितिलयकर्त्या, जगच्चालका, हे जगन्नाथा, मी अशा नीच स्थितींत जीवित्वाचा अंत करावा, हें तुला उचित वाटतें काय ? संकटीं पडलेल्या भक्तांनीं ज्या ज्या समयीं तुझा धांवा केला, त्या त्या वेळीं तूं धांवण्या धावून त्यांच्या संकटाचें परिमार्जन केलेंस, मग आज या शरणागतावर इतका निष्ठुर कसारे झालास ? अरे अजुनि माझी तुला करुणा येत नाहीं ? तूं तांतडीनें उडी घालून गजेंद्रास सोडविलेंस; प्रल्हादाप्रीत्यर्थ नृसिंहावतार धारण केलास; ध्रुवबाळास अचलपदीं बसविलेंस; उपमन्यूस क्षीरसागर दिलास; हीन अजामेळाचा उद्धार केलास; नखाग्रीं गोवर्धन धरून गोपांचें व वृजवधूंचें संरक्षण केलेंस. हे भक्तवत्सला, दीनदयाळा, परमकृपाळू, हा जो तुझा महिमा व्यासांनीं गाइला आहे, तो सर्व मिथ्या आहे कायरे ? युगायुगीं घडून आलेलीं तुझीं अवतारचरित्रें सर्व मिथ्या झालीं कायरे ! मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंहादि दशावतार भक्तप्रीत्यर्थच धारण केलेस, मग माझीच करुणा तुला कां येत नाहीं ! ( निराश होऊन धरणीवर कपाळ आपटून ) परमेश्वराचा मजवर अत्यंत कोप होऊन त्यानें माझा आतां परित्याग केला. शिव ! शिव ! ! आतां मीं कोणाला शरण जावें ! कोणाची करुणा भाकावी !

( निराश होऊन ) हे वनविहारी यक्षकिन्नरगण हो, हे निशाचरांनों, हे भूतांनों, तुह्मांस तरी माझी करुणा येऊं द्या. '

" अशा प्रकारें शोकानें व्याप्त होत्साता चित्ररथ राजा ज्याची त्याची करुणा भाकूं लागला. इतक्यांत त्यास आपल्या पृष्ठभागीं कोणी उभें असल्याचा भास झाला. मागें वळून पाहतो तों, कृष्णवस्त्र परिधान केलेला भव्य पुरुष वांकून आपल्याकडे पहात आहे, असें त्यास दिसलें. त्याचे नेत्र अति विस्तृत असून देदीप्यमान इतके होते कीं, सूर्यास्त होऊन या समयीं जरी निबिड अंधःकार पडला होता, तरी ते अगदीं स्पष्ट दिसत, व त्यांच्याच तेजानें त्याच्या भयोत्पादक विक्राळ अवयवांचें चांगलें दिग्दर्शन होई. या भयंकर पुरुषास पाहतांच हा प्रत्यक्ष यमच येऊन उभा राहिला, का कोणी यक्षकिन्नरगणांपैकीं आहे, का कोणी पिशाच्च आहे, असा चित्ररथ आपल्या मनाशीं विचार करूं लागला; परंतु इतक्यांत त्यास आपण शेवटीं यक्षकिन्नर-निशाचर इत्यादिकांची करुणा भाकल्याचें स्मरण झालें. मग काय! मनांत चर्र होऊन त्याचीं गात्रें शिथिल पडलीं, मुखास कोरड पडून जिव्हा शुष्क झाली, मुखावाटे शब्द निघेना; मनाची खातरी झाली कीं, वर निर्दिष्ट केलेल्यापैकीं हा कोणी तरी यासमयीं प्राप्त झाला आहे. इतक्यांत, 'अरे, यक्षाची आराधना किमर्थ केलीस?' असा भयंकर शब्द झाला. गिरिकंदरांत प्रतिध्वनि जसा घुमघुमून जातो, तसा हा शब्दध्वनि कांहीं वेळ घुमत होता. 'आणि हा मी यक्षगणांचा अग्रेसर, या रणभूमीवर जयापजयाचा कर्ता करविता, तुझ्या सन्मुख उभा आहें. बोल कशाची अपेक्षा आहे ती! तिळमात्र अवधि करूं नकोस; कारण वीरबाहूचें संपूर्ण सैन्य राजगृहनगरी हस्तगत करून घेण्यास मोठ्या त्वरेनें

चाललें आहे!' चित्ररथानें प्रत्युत्तर केलें 'या भयंकर प्रसंगांतून माझें रक्षण करा, माझे प्राण वांचवा, पराजयाचा जय होऊन मी राजपदभ्रष्ट झालों आहें, त्यास माझी राजपदावर स्थापना होऊं द्या. वीरबाहूच्या हातून माझ्या प्रजाजनांचा छल होऊं देऊं नका. त्याला यश देऊं नका, आणि असें झाल्यास हा जन निरंतर आपलें पूजन करील, संपूर्ण देवालयांत आपल्याच प्रतिमा ठेवील.' यक्ष ह्मणूं लागला 'अरे मानवी प्राण्या, या गोष्टीची मला किमपिही अपेक्षा नाहीं.' चित्ररथ ह्मणाला 'मग महाराजांना काय प्रिय आहे, त्याची या शरणागतास आज्ञा व्हावी. आतां विलंब होऊन उपयोग नाहीं; कारण वीरबाहूचें सैन्य राजनगरीवर त्वरेनें जात आहे.' यक्षानें सिंहनादाप्रमाणें गर्जना करून त्याचे कानाशीं लागून म्हटलें 'अरे मर्त्य, श्रवण कर. तुझें प्रथम झालेलें अपत्य मला अर्पण करण्याची जर तूं शपथ घेशील तर तुझ्या शत्रूंचा नाश एका मुहूर्तमात्रांत करून, वीरबाहूची संपूर्ण सेना माझ्या पराक्रमरूपी वायुवेगानें तृणवत् उडवून टाकितों; विचार करण्यांत किंचित् काल घालविलास कीं, तुझा सर्वस्वीं घात झालाच.'

"यत्किंचित्सुद्धां विचार न करितां दुःखानें पीडित झालेल्या चित्ररथानें एकदम 'मला शपथ मान्य आहे,' ह्मणून प्रत्युत्तर केलें. किंचित् काल गेल्यावर त्यास केलेल्या क्रियेबद्दल अनुताप झाला, परंतु मग काय उपयोग? त्या प्रबल यक्षानें चित्ररथाच्या बाहूस धरून त्यास एकदम उचलिलें, व एका निमिषमात्रांत राजगृह नगरीच्या तटाच्या भव्य द्वारावर नेऊन ठेविलें. तेथें चित्ररथ उभा राहून आसमंतभागीं अवलोकन करूं लागला तों शत्रूंच्या तीव्र शरवृष्टीच्या मार्‍यांतून

उरलेली आपली सेना, भयाभीत होत्साती पळत आहे असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. अन्यजनांला जरी तो यक्ष अदृश्य होता, तरी तो चित्ररथाच्या सन्निध उभा असून त्यास दिसत होता. त्यानें चित्ररथास आज्ञा केली कीं, ' तूं आपल्या पराभूत होऊन पलायन करीत असलेल्या सेनेस मी येथें उभा आहें असें सांगून पाचारण कर. ' चित्ररथानें दीर्घ स्वरानें आवाहन करतांच प्रजाजनांनीं आपल्या स्वामीचा स्वर तात्काळ ओळखिला, व हां हां ह्मणतां तुंबळ सैन्य राजगृह नगरीचे तटासन्निध जमा झालें. निराश झालेल्या त्यांच्या मनास आशेचा अंकुर फुटूं लागला. आपल्या प्रभूस सन्निध पाहून पुनरपि त्यांच्या ठायीं वीरश्री उत्पन्न झाली. एकवार निर्वाणीचें युद्ध करण्याचा त्या हताश झालेल्या लोकांनीं दृढ निश्चय केला. या समयीं तटाच्या पायथ्याशीं अति दारुण युद्ध झालें. चित्ररथाचे सन्निध उभे राहून त्या यक्षानें मोठा चमत्कार दाखविला. वीरबाहूनें आपली पराकाष्टा केली, परंतु त्यास यश आलें नाहीं. धरणीवर रुधिराचे पाट वाहूं लागले. प्रेतांचे ढीग पडले. वीरबाहूचे सैन्यांत एकच आकांत झाला. त्याची वीरश्री नष्ट झाली, व काळोखांत ते अडखळून पडूं लागले. मागधीजनांनीं मोठा पराक्रम केला व यक्षाचे वचनास खरोखरच सत्यता आली; ह्मणजे मुहूर्तमात्रांत वीरबाहूचें सैन्य उद्ध्वस्त होऊन विजयश्रीनें चित्ररथास माळ घातली.

" या समयीं संपूर्ण पौरजनांनीं अत्यंत आनंदित होऊन त्या रात्रीं जिकडे तिकडे मोठा दीपोत्सव केला. चित्ररथाचे रथावर सुवर्णाचीं पुष्पें उधळलीं. राजगृहनगरींतील स्त्रीजन आनंदानें गृहांच्या उच्च उच्च स्थलांवर चढून राजाची स्वारी पाहूं लागला. चित्ररथाचे मस्तकावर श्वेत छत्र धरिलें होतें. स्तुतिपाठकांचे

जयशब्द कर्णी पडत होते. आपणास यश आलें ह्मणून या समयीं चित्ररथास अभिमान उत्पन्न झाला; परंतु आपल्यास कोणामुळें यशप्राप्ति झाली, हें तो लागलीच विसरला. स्वगृहीं आल्यानंतर शय्यास्थानीं त्यानें घडून आलेल्या प्रचंड वादळाचें सिंहावलोकन केलें; त्यासमयीं त्यास असें वाटूं लागलें कीं, ' आपल्यास त्या यक्षाचा उगीच भास झाला आहे; वस्तुतः पराक्रम करणारा, व जय मिळविणारा मजव्यतिरिक्त अन्यजन कोणी नाहीं. '

" चित्ररथाचे राज्यांत जिकडे तिकडे शांतता वास करूं लागली. शत्रूची अपरिमित संपत्ति मिळाली. नगरीचे तटाशीं पराजित झालेल्या शत्रूचे शतशः गजाश्वरथ हस्तगत झाले. शिशुनागप्रभृति प्रधानमंडळास नगरींतून निघून जाण्यास एकदम आज्ञा झाली. दुसरें प्रामाणिक व स्वामिकार्यास दक्ष असें प्रधानमंडळ राजानें स्थापित केलें. प्रजाजन राजाच्या सांप्रतच्या वर्तणुकीनें संतोषित होऊन माना डोलवूं लागला. मगध देशाची मोठी उन्नति झाली. ज्याच्या त्याच्या मुखीं ' चित्ररथासारखा पूर्वी अन्य राजा कोणीच झाला नाहीं,' असे उद्गार निघूं लागले. अशा आनंदांत दोन संवत्सर लोटले; तथापि अजून चित्ररथ राजा आपल्या योग्यतेची वधू पाहून आपला विवाह कां करीत नाहीं, याचें प्रजाजनांला नवल वाटूं लागलें. त्यांना वाटे कीं, आपल्या स्वामीनें आपल्या कुलशीलास भूषणार्ह होईल अशी एखादी लावण्यादि गुणांनीं मंडित भर्तृदारिका पाहून तिचें पाणिग्रहण करावें. त्यांना वाटूं लागलें कीं, आपल्या प्रभूस अपत्य होऊन त्यानें मागधवंश धन्य करावा. प्रधानमंडळानें वारंवार अशा गोष्टी आपल्या प्रभूच्या कर्णी घालून कळवावें कीं, संपूर्ण प्रजेचा मानस स्वामींनीं विवाह

करावा असा आहे; परंतु चित्ररथानें लग्नासंबंधीं गोष्ट निघतांच भाषणाचा ओघ तत्क्षणींच फिरवावा, त्यामुळें त्यांचा उपाय खुंटे. लग्नाचा विचार राजाच्या मनांत नेहमीं घोळत होता, व जरी आपण यक्षास दिलेलें वचन केवळ भ्रम आहे, असें त्याला वाटे तरी त्याच्याविषयीं अंतःकरणांत उद्भवलेल्या भीतीचें समूळ निरसन झालें नव्हतें. एवढ्याकरितांच लग्नाचें धाडस त्याचे हातून होईना. चित्ररथाच्या मातेनेंही पुत्राचा विवाह व्हावा ह्मणून आपली पराकाष्ठा केली, परंतु सर्व व्यर्थ! विवाहाविषयीं नुसतें भाषण काढलें कीं त्यानें टाळाटाळ करावी. शेवटीं मंत्रीमंडळानें एक नवीनच कृप्ति काढिली. त्यांनीं देशोदेशींच्या नामांकित राजांकडेस चित्रकलेंत अत्यंत निपुण असे अनेक चितारी पाठविले, व सुंदर राजकन्यांच्या प्रतिमा जुळविण्यास आरंभ केला. अशा प्रकारें प्रधानानें अनेक रूपसंपन्न राजदुहितांचीं चित्रें जमविलीं. त्यानें आपल्या वाड्यांत एक सुंदर चित्रशाळा बांधून त्या स्थलीं अनेक देशांहून आलेलीं चित्रें ठेविलीं. जागेस शोभा यावी ह्मणून इतर नानाविध चित्रें तेथें ठेविलीं होतीं. अशा प्रकारें व्यवस्था झाल्यावर प्रधानानें राजास विनंति केली कीं, 'महाराजांनीं एकवार स्वगृहीं भोजनास येण्याची कृपा करावी.' राजानें तात्काल रुकार दिला. राजाच्या पंक्तीस शोभा यावी एतदर्थ अन्य शिष्ट गृहस्थ, ज्यांची राजसभेंत मोठी प्रतिष्ठा असे, अशा लोकांना पाचारण केलें होतें. भोजनोत्तर प्रधानानें सहज विनोदानें चित्ररथास विनंति केली कीं, 'स्वामींची मनीषा असल्यास दासाच्या गृहीं कांहीं सुंदर चित्रें, अवलोकन करण्यास योग्य अशीं आहेत.' यावर आणखी एक दोघां श्रेष्ठ संभावितांनीं प्रधानाच्या या भाषणास आपल्या भाषणानें पुष्टि आणिली,

व तत्क्षणींच राजा चित्रें पाहण्याकरितां उठला. हें पाहून बृहत्बल प्रधानास अंतर्यामीं अति आल्हाद होऊन, इष्ट हेतु सिद्धीस जाईल अशी आशा वाटूं लागली. प्रधानाची करांगुळी चित्ररथानें आपल्या हस्तांत धरून तो सोपानपथ चढून वर गेला. तेथें नानाविध जातींचीं चित्रें पाहून राजा अत्यंत संतोषित होत्साता आतां परतणार तोंच, बृहत्बलानें सहज त्यास ज्या स्थलीं सुंदर राजकन्यांच्या प्रतिमा ठेविल्या होत्या तेथें आणिलें. त्या स्थलीं येतांच ती जागा त्यास नारीमय दिसूं लागली, व त्यांच्या मुखकमलसमुदायानें हीं सहस्रशः चंद्रबिंबेंच उगवलीं आहेत, असें वाटूं लागलें. तीं तरुण राजकन्यांचीं चित्रें नानारंगांच्या रत्नालंकारांनीं विभूषित केलेलीं होतीं. इतक्यांत एका राजकन्येच्या प्रतिमेकडे अवलोकन करीत चित्ररथ अगदीं तटस्थ उभा राहिला. तिचीं नेत्रकमलें प्रफुल्लित असून निश्चल होतीं. अंगकांति लावण्यमय दिसत होती. कुटिलकेशपाश नीटनेटका बांधिलेला होता. यौवनावस्था नुकीच प्राप्त झाली असल्याचें स्तनभारावरून दिग्दर्शन होत होतें. अशी तारुण्यलतिकेची प्रतिमा अवलोकन करतांच, मनांत कामाविर्भाव उत्पन्न होऊन चित्ररथानें प्रधानास प्रश्न केला कीं, 'एकूण या वसुंधरेवर अशीं अशीं सुंदर रत्नें भगवंतानें केवळ अलौकिक चातुर्य प्रगट करण्याकरितां निर्माण केलीं आहेत आं! तस्मात् त्याची करणी अगाध आहे! या राजकन्येनें आपल्या जन्मानें कोणता देश धन्य केला आहे? किंवा ही येथीलच कोणा धनिकाची कन्या आहे?

बृह०—ज्या राजकन्येची ही प्रतिमा आहे ती आंध्र देशच्या राजाची कन्या असून, सांप्रत तिचा पिता, त्या देशाची राजधानी जी वारंगूळ नगरी, तेथें राज्य करीत आहे. राजगृह

नगरीपासून त्या नगरीस जाण्यास दोन मास मार्गक्रमण करावें लागतें. या संपूर्ण राजकन्यांच्या प्रतिमा पाहूं जातां, आंध्रदेशीय राजकन्येची साम्यता एकीच्यानेंही होणार नाहीं असें मला वाटतें.

**चित्र०**--आपण ह्मणतां हें सत्य आहे; परंतु या सर्व प्रतिमा कोणकोणत्या देशच्या राजकन्यांच्या आहेत ? ह्याही रूपादि गुणांनीं संपन्न आहेत, परंतु त्या सर्वांत मलाही हीच श्रेष्ट दिसते आहे.

**बृह०**--( हस्त जोडून नम्रतेनें ) महाराज, या सर्व भिन्न भिन्न देशच्या भर्तृदारिका आहेत. ( प्रतिमेकडे बोट दाखवून ) ही भडक भरजरी नेसलेली राजकन्या मद्रदेशच्या ( भूतान ) शाकल नगरीची आहे. ही बारीक जरतारीची कंचुकी घातलेली राजकन्या पांचालदेशच्या ( रोहिलखंड ) राजाची सर्वांत कनिष्ट कन्या आहे. ही भिंगाची चंद्रकळा परिधान केलेली कलिंग देशाची ( ओरिसा ) राजधानी जें विजयपट्टण तेथील राजाच्या कन्येची आहे. ही चिचपानी वस्त्र परिधान केलेली कोसल ( गोंडवणाच्या उत्तरेकडील प्रांत ) देशची राजधानी जें मणिपूर तेथील राजाची आहे. ही शेलारी नेसलेली राजकन्या वैदर्भ ( वऱ्हाड ) देशची आहे. ही नामावळ नेसलेली राजकन्या महाराष्ट्र देशाची आहे. ही सुवर्णाच्या पत्र्याप्रमाणें तकतकीत वस्त्र नेसलेली विराट ( राजपुताना ) देशच्या राजाची कन्या आहे. ही ताडपत्री वस्त्र नेसलेली सौराष्ट्र ( काठियावाड ) देशच्या राजाची कन्या होय. ही मोतिचूर कांठी पातळ नेसलेली व माजबंध घातलेली द्राविड देशची ( त्रावणकोर ) राजधानी जी कांचनपुरी तेथील राजकन्या आहे. ही इकडे दुसरी मालव देशच्या धनिकाची कन्या

आहे. ही प्रतिमा अबीर देशच्या ( तापी नर्मदा यांचे मधील प्रदेश ) राजकन्येची आहे. ही लाट देशच्या राजकन्येची, ही उत्कली व कामरूपदेशच्या राजकन्येची, ही गुर्जर देशच्या राजकन्येची, ही सिंधुदेशची, ही बाल्हिक देशची, ही कांबोज देशची, ही काश्मीर देशची, आणि या सर्व अन्य देशच्या राजकन्यांच्या आहेत.

**चित्र**०–( आंध्र देशच्या राजकन्येची प्रतिमा हस्तांत घेऊन चित्त चंचल होऊन ) अहाहा! काय हें अप्रतिम सौंदर्य!!! हिचें अभिधान काय आहे?

**बृह**०–हिला अंबा म्हणतात. हिच्या पित्याचें नांव क्षेमधर्म. हा मोठा प्रबल राजा आहे.

**चित्र**०–( निराश होत्साता उष्ण श्वास सोडून ) परंतु माझी आशा व्यर्थ आहे ;कारण क्षेमधर्म राजा आपली कन्या मगध देशांत इतक्या दूर देणार नाहीं असें मला वाटतें.

**बृह**०–( आनंदित होऊन ) याजबद्दल स्वामींनीं तिळमात्र चिंता करूं नये. क्षेमधर्म राजाची कन्या अर्पण करण्याची मान्यता मी आणवितों.

"प्रधानाच्या मुखांतून असें भाषण निघतांच राजा चित्ररथ हर्षभरित झाला, व त्यानें आपली कृतज्ञता प्रगट केली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं वारंगूळ नगरीला क्षेमधर्म राजाच्या कन्येची मागणी करण्याकरितां दूत पाठविले. राजगृह नगरींत जिकडे तिकडे चित्ररथ राजाच्या विवाहासंबंधीं भाषणें होऊं लागलीं. लग्नाची वार्ता हां हां म्हणतां सर्व मगध देशांत पसरली. प्रजाजनांना आनंद झाला. चित्ररथ अधीर होऊन आंध्रदेशास पाठविलेल्या दूतांची मार्गप्रतीक्षा करूं लागला. प्रत्येक दिवस त्यास युगाप्रमाणें भासूं लागला. सुखातिशयाचीं रात्र-

दिवस स्वप्नें पडूं लागलीं. अंबेच्या मूर्तीनें त्यास इतकें वेडावून सोडिलें कीं, यक्षास दिलेलें अभिवचन तो समूळ विसरून गेला.

" चातुर्मास अतिक्रांत झाला नाहीं तोंच, एके दिवशीं प्रभातकालीं आंध्र देशीं पाठविलेले दूत आनंदाची वार्ता घेऊन परत आले. त्यांच्यासमागमें चित्ररथानें आपली प्रतिमा राजकन्या अंबा इजला दाखविण्यास पाठविली होती. क्षेमधर्माच्या राजसभेंत चित्ररथाच्या सौंदर्यादिगुणांची विशेष प्रशंसा झाली, व राजकन्येस सुद्धां वर मानवला. चित्ररथासारखा महापराक्रमी राजा, आपलें करग्रहण करणार, हें पाहून राजकन्या अंबा इजला अति धन्यधन्य वाटलें, असें त्या दूतांच्या सांगण्यांत आलें. वारंगूळ नगरीहून आलेली ही शुभवार्ता, क्षणांत जिकडे तिकडे पसरली. चित्ररथानें अनेक गजाश्वरथ समागमें देऊन बृहत्वल प्रधानास वधूकडील मंडळीस आणण्याकरितां वारंगूळ नगरीस पाठविलें. वधूस व तिचे मातापित्यांस नानाविध उंची वस्त्रें व भूषणें प्रधानासमवेत पाठविलीं होतीं. पुनरपि राजा चित्ररथ आपल्या अभिनव नववधूची उत्कंठित होत्साता मार्गप्रतीक्षा करूं लागला. जिवास कांहीं चैन पडेनासें होऊन सुखोपभोग तुच्छ वाटूं लागले. म्हणतातच कीं, यौवनावस्थेंत चित्तवृत्ति स्थिर राहणें दुर्घट आहे. लवकरच पुढें वार्ता येऊन पोंहोंचली कीं, मोठ्या संभ्रमानें राजा क्षेमधर्म कन्येसह राजगृह नगरीस येत असून थोड्याच अंतरावर त्याच्या सैन्यानें तळ दिला आहे. असा निरोप येतांच चित्ररथानें आपली चातुरंग सेना सिद्ध करून, त्याचा आदर करण्यास त्यास सामोरें जाण्याचा विचार केला. संपूर्ण नगरी शृंगारण्यास आज्ञा केली.

जिकडे तिकडे कुंकुमाचे सडे घालून पौरजनांनीं गुढ्या तोरणें उभारलीं. प्रजाजनांचीं मुखकमलें सुप्रसन्न दिसूं लागलीं. अस्तमानचे समयीं क्षेमधर्म राजा भावी जामातास व प्रिय कन्येस सांगातीं घेऊन राजनगरींत प्रवेश करिता झाला. त्या समयीं जिकडे तिकडे मंगलवाद्यें वाजत होतीं, व जयशब्द ऐकूं येत होते. दुसरे दिवसापासून विवाहयाज्ञिकास आरंभ होऊन एक मास पावेतों सोहळा चालला होता. उभयतां वधूवरास एकमेकांस अवलोकन करून, प्रतिमेंत पाहिल्यापेक्षां शतपट आनंद झाला. याप्रमाणें कार्यभाग समाप्त होतांच क्षेमधर्म राजा, कन्येस तिच्या पतिगृहीं ठेवून, आपण आपल्या नगरीस निघून गेला.

"यासमयीं चित्ररथाचा आनंद गगनांत मावेनासा झाला. त्यास वाटलें कीं, आपण सांप्रत प्रीतिरसाच्या समुद्रांतच क्रीडत आहों, किंवा आनंदपर्वताच्या शिखरावरच बसलों आहों. अशा प्रकारें एक संवत्सर पावेतों देवी अंबेच्या संगतिसुखाचा सुखोपभोग घेतल्यावर, चित्ररथास असें दिसून आलें कीं, आपली पत्नी अंबा गर्भभारानें मंद मंद चालूं लागली आहे. तिचे नेत्र जड दिसूं लागले आहेत. अन्नसेवनाची तिची रुचि नाहींशी होऊन, तिचें शरीर गर्भाच्या योगानें केतकी पुष्पाप्रमाणें पांढरें दिसूं लागलें आहे. अशीं चिन्हें पाहून प्रथमतः त्यास पराकाष्ठेचा हर्ष झाला, परंतु लागलींच त्यास यक्षास दिलेल्या वचनाचें स्मरण होऊन, त्याच्या काळजांत चरारलें. थोर पुरुषांचें धैर्य हेंच धन आहे, परंतु यासमयीं त्याचें तें नष्ट झालें. नेत्रांतून अश्रुप्रवाह वाहूं लागला. आपलें मुख म्लान पाहून देवी अंबा आपणास शोकाचें कारण काय आहे, असें कदाचित् आग्रहपूर्वक विचारील, ह्मणून चित्ररथ सन्निध

असलेल्या एका उपवनांत जाऊन तेथें गुप्तरीत्या वृक्षराजींत सचिंत होत्साता बसला. क्षणेक त्या निबिड छायेंत चिंतेनें व्याप्त होऊन तो बसला नाहीं तोंच, कृष्णवर्णाची एक भव्य आकृति आपणासन्मुख उभी आहे, असें त्यास दिसलें. ही आकृति पहातांच त्याचें देहभान नष्ट होत चाललें. त्याच्या नेत्रांस अंधारी आली. संपूर्ण शरीर कंपायमान झालें, व हृद्यांतरीं त्यानें पक्कें जाणलें कीं, ज्यानें आपल्यास युद्धप्रसंगीं साहाय्य केलें, त्याच यक्षाची मूर्ति आपणापुढें उभी आहे. त्यास आतां पक्कें कळून चुकलें कीं, आपण दिलेलें वचन हें असत्य नसून सत्य आहे. त्यास पूर्वीं वाटलेला भ्रम आतां दूर झाला, व घडून आलेला संपूर्ण प्रसंग सत्य आहे, मिथ्या नाहीं, अशी त्याच्या मनाची आतां पूर्ण खातरी झाली.

"नेत्रांचीं आसवें करतलानें पुसून क्षणमात्र तो त्या भयोत्पादक मुखाकडे निरखून पाहूं लागला. त्यासमयीं त्यास असें दिसून आलें कीं, तो यक्ष आपणाकडे क्रुद्ध होत्साता टवकारून पहात आहे. इतक्यांत त्यानें त्याच्या दंडास एकदम धरून त्यास हिसडलें. त्यासरसा तो त्याच्या पायांवर निशक्त होऊन पडला, व अधोमुख करून दीनाप्रमाणें त्याच्या पायांकडे पाहूं लागला.

**यक्ष**०---( गिरिकंदरीं ज्याप्रमाणें सिंहाची प्रचंड गर्जना कर्णीं पडते, तसा भयंकर शब्द करून ) अरे मृत्पिंडा, अल्प काळांतच तुजकडे आतां पितृत्वाचें नातें येणार आहे. मला दिलेलें वचन आतां तुला पूर्ण करावें लागेल.

**चित्रा**०---( शोकाकुल होऊन त्याच्या चरणीं लोळण घेऊन दीन स्वरानें ) महाराज दासाला क्षमा असावी.

**यक्ष**०---( करकरा दांत खाऊन मोठ्या आश्चर्यानें व आ-

वेशयुक्त ) काय क्षमा ? आणि ती माझ्या हातून ? ( धिःकार-पूर्वक ) हां ! ! कृष्ण सर्पाच्या मुखीं पडलेल्या मंडुकानें एक प्रकारें जिवाची आशा धरावी, किंवा पर्वतप्राय उंच उसळणाऱ्या सागराच्या लाटांमध्यें सांपडलेल्या क्षुद्रमानव जातीनें जिवाची आशा धरावी अथवा व्याघ्रमुखीं सांपडलेल्या धेनूनें जिवाची आशा धरावी, किंवा चितेवर निजविलेल्या प्रेतानें अग्नि शांत होण्याची प्रार्थना करावी; या सर्व गोष्टी एकवार घडून येतील, परंतु क्षमा हा शब्द मी श्रवणसुद्धां करणार नाहीं. अरे मानवा, तूं वचनांत गुंतलेला आहेस, त्यास आतां पराङ्मुख कसा होतोस ? श्रेष्ठ लोक आपल्या वाणीला सत्यता आणण्यासाठीं आपल्या जीविताचीसुद्धां चाड धरीत नाहींत.

**चित्र०**—( भ्रमितचित्त होऊन ) हें सर्व सत्य आहे काय ? किंवा हें स्वप्न आहे ! हर ! हर ! एकूण जगन्नियंत्यानें या मंदभाग्याचे कपाळीं अशा यातना ठेविल्या आहेत अं ? ( निश्चयात्मक ) अरे स्वप्नच आहे, मी स्वप्नांत भीत आहें. काय हें परम भयंकर स्वप्न ! !

**यक्ष०**—(प्रळय काळच्या विजेच्या गडगडाटाप्रमाणें गर्जना करून त्याच्या कर्णेंद्रियीं इतकी कर्कश किंकाळी फोडिली कीं, त्यासरसा चित्ररथ गर्भगलित होऊन नेत्र मिटून भूमीवर निचेष्ट पडला. त्याच्या बाहूस धरून त्यास हिसके देत ) मूर्खा, तुला अजून स्वप्नच भासत आहे काय ? तुझ्या निदर्शनास घडून आलेला सत्यप्रकार आणूं काय ? आपणा उभयतांत झालेली आणभाक ही एकदांच काय परंतु त्रिवार सत्य आहे, म्हणून मी तुला सांगतों. युद्धप्रसंगाचा समय ध्यानांत आण, तें तर स्वप्न नाहींना ?

" असें भाषण झाल्यावर त्या भयंकर यक्षानें चित्ररथाचें

मणगट आपल्या सव्यकरानें क्षणमात्र गच्च धरिलें; त्यासमयीं तो अर्धमृत झालेला निर्बलराजा किंचित् शुद्धीवर येऊन त्यानें मोठ्या निकरानें दुःखाची आरोळी मारली. त्यास वाटलें कीं, तप्तलोहाच्या कैचीनें आपल्या मणगटास कोणीं धरिलें आहे, व आतां आपले पंचप्राण जाऊं पहात आहेत. इतक्यांत त्यास खो--खो--खो हास्यकारक ध्वनि झाल्याचा भास होऊन ती यक्षाची प्रचंड आकृति अदृश्य झाली, असें वाटलें; आणि तत्क्षणींच पुनरपि तो भूमीवर निचेष्ट पडला.

## यक्षिणीचा वृत्तांत ( पुढें चालू )

" चित्ररथ ज्या समयीं पुनरपि शुद्धीवर आला त्यासमयीं तो भयभीत होत्साता सभोंवार अवलोकन करूं लागला. त्यास वाटलें कीं, आपले सान्निध मोठी भयंकर आकृति उभी असेल; परंतु ही त्याची कल्पना मिथ्या झाली. भीतीचें निरसन झालें; कारण यासमयीं देवी अंबेनें भ्रताराचें मस्तक आपले अंकावर घेतलें असून ती स्वपल्लवानें त्यास वारा घालीत होती. वारंवार ललाटप्रदेशीं आलेला घर्म वस्त्रानें पुसून त्यावर मुखानें फुंकर घालीत होती. आपला प्रियपति मूर्च्छेनें निचेष्ट पडलेला पाहून तिचें कोमल अंतःकरण शोकाकुल होऊन, नेत्रावाटे घळघळ अश्रुधारा वहात होत्या. एकाग्रचित्तानें ती जलभरित नेत्रांनीं आपल्या प्रियपतीच्या वदनाकडे पाहूं लागली. चित्ररथानें आपलीं विशाल नेत्रकमलें उघडतांच त्या सुंदरीचे चित्तास समाधान होऊन, तिची मुद्रा परमसंतोषित दिसूं लागली. तिनें भ्रताराच्या तप्त झालेल्या ललाटप्रदेशीं आपला पल्लवाप्रमाणें कोमल व शीतल हस्त दाबून धरून त्यास 'असें कशानें झालें,' ह्मणून साविनय पुसलें. अशाप्रकारची

देवी अंबेची आपणावर निष्कलंक प्रीति आहे, हें पाहून प्रेमानें राजाचें अंतःकरण उचंबळून आलें, व आपणास हें केवळ त्रैलोक्याचें निधानच सांपडलें आहे असें मनांत आणून त्यानें आपल्या प्रियतमेच्या कंठास मिठी मारिली. पुनरपि त्यास यक्षाबरोबर केलेल्या भाषणाचें स्वप्न भासूं लागलें, व आतां सर्व झालेला प्रकार तो आपल्या प्रिय भार्येस सांगूं लागला.

चित्र०–सुमारें तीन संवत्सर लोटून गेले. वंगदेशाचा अतिदुष्ट राजा जो वीरबाहु यानें मजला पादाक्रांत करून माझें राज्य हरण करण्याचा विचार केला होता. माझ्या शिशुनाग प्रधानानें कांहीं सेनाजन समागमें घेऊन त्यास मार्गावर गांठलें. उभयतांचें तुंबळ युद्ध होऊन, त्यांत प्रधानास अपयश आलें. वीरबाहूनें राजगृह नगरीवर चाल केली, हें पाहून अवशिष्ट राहिलेलें सैन्य सांगातीं घेऊन मी त्याजवर धावलों. प्रातःकालपासून तों अस्तमानपावेतों घोर संग्राम होऊन, अस्तमानीं पाहतों तों, माझे सेनाजन भीतिग्रस्त होऊन पळत आहेत. हें अवलोकितांच माझी निराशा झाली. मी सैनिकांना चुकवून एका वृक्षाखालीं बसून मुखांत धूळ घालून आक्रोश करूं लागलों. मला वाटलें कीं, क्षत्रिय कुलाला मीं कलंक लाविला. असें होतां होतां मला अश्रांत श्रम होऊन त्या वृक्षाच्या मूलप्रदेशीं मीं किंचित् मूर्च्छित होऊन पडलों, व मजला अतिभयंकर स्वप्न पडलें. ( अंगावर शहारे येऊन नेत्र गरगर फिरवीत ) खरोखर अत्यंत भयंकर–तुला विलक्षण आश्चर्य वाटेल–कीं, त्याच भयंकर स्वप्नाचा परिणाम मी अद्याप भोगीत आहें–( मंदस्वरानें कावऱ्याबावऱ्या पहात ) मला असा भास झाला कीं, मजपुढें एक भयंकर यक्षाची आकृति उभी राहिली, व, मजला

माझें राज्य परत करण्याचें आमिष दाखवून मजपासून एक अत्यंत भयंकर क्रिया करून घेण्याची शपथ करून घेतली आहे–काय सांगू हे देवी–ती तुजला कथन करण्यास माझ्या जिव्हेचे शतशः तुकडे होत आहेत.

**अंबा**०—माझे हस्तानें जर या दुःखाचा परिहार होण्यासारखा असेल तर महाराजांनीं मजला सांगावें, ही दासी—

**चित्र**०—( मध्येंच ) मजला असें वाटलें कीं–तो असें बोलला कीं–( कंपित स्वरानें ) अरे मर्त्य, तुझें प्रथम झालेलें अपत्य–मला अर्पण करण्याची–जर तूं शपथ घेशील–तर तुझ्या शत्रूंचा नाश एका मुहूर्तमात्रांत करून वीरबाहूची संपूर्ण सेना माझ्या पराक्रमरूपी वायुवेगानें तृणवत् उडवून टाकितों.

**अंबा**०—( कर्णेंद्रिय हस्तांनीं गच्च दाबून धरून अधिक श्रवण करवत नाहीं असें दर्शवीत ) हाय! हाय!! हें काय भाषण होत आहे? ( किंचित् धीर येऊन ) पण महाराजांची पक्की खातरी आहे कीं, हें वृत्त सारें स्वप्नवत आहे ना?

**चित्र**०—( तिच्या मनाची भीति नाहींशी व्हावी ह्मणून निश्चयपूर्वक ) यांत तर तिलमात्र संदेह नाहीं. आणखी मला असें वाटूं लागलें कीं, जाणो मीं त्या यक्षाच्या निंद्य भाषणास अनुकूल मतानें संमति दिली–परंतु हा सारा माझा भ्रम असून त्या भ्रमांतून मी तत्क्षणींच जागृत झालों. माझे अंगांत घायाळ झालेल्या व्याघ्राप्रमाणें एकाएकीं वीरश्री चढली, व मी आपल्या पराजित होऊन पलायन करणाऱ्या सैनिकांना, त्यांच्या स्त्रीपुत्रांच्या व मातापित्यांचा आणा घालून दीर्घ स्वरानें पाचारूं लागलों. मीं त्यांच्या अंगीं निर्वाण युद्ध करण्याचें धैर्य आणिलें. एकाक्षणांत ते माझ्या सन्निध जमा झाले. मोठें घोर रणकंदन माजलें, आणि मुहूर्तमात्रांत 'शत्रूस दे माय धरणी

ठाय ' करून सोडिलें. या सर्व गोष्टी तर सहज क्रमानें घडून येत गेल्या; परंतु आज तीन संवत्सर होत आले. मजला क्षणोक्षणीं असें वाटतें कीं, त्या यक्षाला मीं जें वचन दिलें—

**अंबा**०—( सर्वांगास सर्पानें विळखा घातल्याप्रमाणें होऊन तिचे अवयव ठिकच्या ठिकाणीं गलित होऊन मंद स्वरानें ) अशा प्रकारानें बळी अर्पण करण्याची ईश्वर आपणास कधींही दुष्ट बुद्धि देणार नाहीं. हें स्वप्न आहे, अशी जी महाराजांची कल्पना झाली आहे, तीच सत्य आहे, व हा झालेला भ्रम खराच आहे, असें महाराजांस निरर्थक वाटत आहे.

**विक्र**०—तुझें ह्मणणें सत्य आहे; परंतु आज कसा प्रसंग ओढवला, हें तूं जाणिलें नाहींस. मीं आज तुला विनोदानें " कन्येची अपेक्षा आहे, किंवा पुत्राची आहे," असें विचारलें होतें. प्रथमतः आपणा उभयतांस अशा प्रेमाच्या गोष्टीपासून परमानंद झाला, परंतु तत्क्षणींच मजला त्या भयंकर स्वप्नाची स्मृति होऊन माझी कंबर बसली. महालांतून मी तुझी दृष्टि चुकवून निघालों, व या आपल्यासन्निध असलेल्या उपवनांत सचिंत अंतःकरणानें कांहीं वेळ बसलों. फिरून माझ्या मनोवृत्तींत पालट होत चालला, व माझी शुद्धि नष्ट होऊन मजला असें भासलें कीं, जणूं काय तो भयंकर यक्ष पुनरपि माझ्यासन्निध उभा आहे—दिलेल्या वचनाचें तो मजला स्मरण देत आहे—मी मजदीनावर दया करावी एतदर्थ त्याची बद्धांजुलीनें प्रार्थना करीत आहें—परंतु माझ्या विनवणीस न जुमानतां तो क्रोधयुक्त होत्साता, मजला निष्ठुरतेनें छळीत आहे.—

**अंबा**०—( प्रिय पतीच्या कंठास मिठी मारून, अश्रु ढाळीत ) आणि महाराज अशा भयंकर स्वप्नांतच निचेष्ट पडले असें मला वाटतें !

**चित्र०**---( घडून आलेला सत्य प्रकार जरी नेत्रासमोर मूर्तिमंत उभा होता तरी स्वप्रियेला सुख वाटावें ह्मणून ) होय मजला मूर्च्छा आली. ( मस्तकास हस्त लावून ) हाय ! हाय ! माझ्या मस्तकांत तीव्र वेदना कशानें उत्पन्न झाल्या आहेत--त्या यक्षाच्या भाषणाचा ध्वनि माझ्या मस्तकांत भरून गेला आहे. त्यानें मजला मी हा सर्वप्रकार मिथ्या भ्रम आहे, हें स्वप्न आहे, असें मानितों ह्मणून केवढें दूषण दिलें? तें मी विसरलों काय ? हाय ! हाय ! ! परमेश्वरा, हें कशाचें स्वप्न आलें आहे--हें खरोखर सर्व सत्य आहे---आणि त्या यक्षानें, मजला स्मरण राहावें ह्मणून, तीव्र शासन केलें आहे; आणि मजला त्याचें चांगलें स्मरण राहिलें आहे--त्यानें माझें मणगट एक क्षणमात्र आपल्या हस्तांत धरिलें होतें, त्यावेळीं मजला असें वाटलें कीं, तें जणूं काय तप्त लोहाच्या कैचीनेंच धरिलें आहे---भयंकर कृत्य---निभ्रांत---खरोखर स्वप्न नाहीं.

" असें भाषण करून तो हतभागी राजा स्वस्त्रीच्या पदतळीं निचेष्ट होऊन पडला. भ्रतार एकाकीं निचेष्ट पडतांच देवी अंबेनें मोठ्यानें किंकाळीं फोडिली; कारण मनगटाचें नांव काढतांच तिची दृष्टि त्यावर जाऊन पाहते तों, खरोखरच त्याजवर कंकणाकृति कृष्णवर्णाचा कंगोरा भाजल्याप्रमाणें उमटला होता. तो जणूं काय तप्त लोहानें डाग देऊन आंतील मांस जळेपर्यंत अंग भाजलेलें आहे, असा दिसत होता. हा डाग पहातांच राणीची खातरी झाली कीं, हा कांहीं मिथ्या भ्रम नाहीं, अथवा स्वप्न नाहीं; परंतु हा सर्व प्रकार खराच आहे, असें निभ्रांत समजण्याकरतांच त्या यक्षानें प्रथम ही शिक्षा केली आहे. उभयतांच्या दुःखास पारावार नाहींसा झाला, त्याचें वर्णन करितां येत नाहीं. त्या सुंदरीची दशा काय

झाली असेल याची कल्पना महाराजांनींच करावी. त्यांचे ह-स्तपादादि अवयव जड झाले. उभयतांच्या मुखांतून शब्दो-च्चार स्पष्ट होईनासा झाला. कपाळावर घर्मबिंदु दिसूं लागले. श्वासोच्छ्वास मंद वाहूं लागला. जिकडे तिकडे भयंकर स्तब्ध-ता दिसूं लागली. इतक्यांत चित्ररथानें नेत्र उघडिले. उभय-तांची दृष्टादृष्ट होतांच कडकडून एकमेकांच्या गळ्यांस मिठ्या घालून उभयतां उभयतांच्या आंसवांनीं न्हालीं.

"मी आतां हा दुःखकारक प्रसंग वर्णन करण्याचें पुरे क-रितें. अशा रीतीनें दुःखानें व्याप्त झालेलें तें जोडपें त्या उपव-नांतील एका पुष्पवाटिकेंत पुष्कळ वेळ पावेतों बसलें होतें. उभयतांच्या मुखांतून चकारशब्द निघाला नाहीं. शेवटीं अस्त-मान होतांच अधोमुख करून, उभयतांनीं एकमेकांच्या हस्तांचें अवलंबन करून गुप्त मार्गानें राजवाड्यांत प्रवेश केला. एका निवांत स्थळीं कांहीं वेळ बसून, विचार करून, नंतर त्यांनीं आपले गुरु जे दयानंद त्यांस पाचारण केलें. गुरुमहाराजांचें आगमन होतांच उभयतांनीं उत्थापन देऊन स्वामिचरणीं मस्तकें ठेविलीं. त्यांना तो भयंकर वृत्तांत उभयतांनीं निवेदन केला. त्या वृद्ध स्वामीनें ही सर्व गोष्ट श्रवण करून, त्या उभयतांस धीर येईल असें भाषण केलें, त्यामुळें त्यांची भीति किंचित् कमी झाली.

**चित्र०**—हा कालपावेतों गुरुजनापासून म्यां ही निंद्य गोष्ट गुप्त ठेविली, याचा सांप्रत मला मोठा पश्चात्ताप होत आहे. महाराजांनीं या दासाला आतां या संकटापासून मुक्त करून सुखी करावें.

**दया०**—संकटांतून मुक्त करणार भगवान् समर्थ आहे.

आह्मीं मानवांनीं काय करावयाचें आहे! परमेश्वरास शरण गेलें ह्मणजे सर्व संकटांचा परिहार होतो.

" नंतर उभयतांनीं स्वामीचें पादपूजन करून तीर्थ प्राशन केलें, व निश्चल नेत्र करून गुरुमुखांतून आतां काय आज्ञा होत आहे याची तीं उभयतां मार्गप्रतीक्षा करूं लागलीं.

**दया०**–( मोठ्या गंभीर मुद्रेनें व गंभीर स्वरानें ) बाळांनों, तुमची ही दुःखावस्था पाहून माझें अंतःकरण विव्हळ झालें आहे. तुमची मला फार दया येत आहे. आतां मी काय सांगतों याजकडे तुमचें अवधान असूं द्या. प्रथम झालेलें अपत्य यक्षाला अर्पण करण्याचें तुह्मीं वचन दिलें आहे, आणि हें निश्चयात्मक समजा कीं, असें झाल्याविना तो यक्ष तुह्मांला आणि तुमच्या राज्याला अगदीं चैन पडूं देणार नाहीं. ( राजाकडेस वळून ) या अघोर अर्पणाविधीनें या तुझ्या सुकुमार प्रिय पत्नीची अवस्था काय होईल ? ती क्षणभर तरी वांचेल काय ? यास्तव मजला या गोष्टीस केवळ एकच मार्ग दिसत आहे. ( मंदस्वरानें ) प्रथम झालेलें अपत्य जें तुह्मी यक्षाला अर्पण करणार, तें तुह्मीं देवाला अर्पण करा ह्मणजे झालें; कारण देवापेक्षां कांहीं यक्षकिन्नर गंधर्व वगैरे अंतरिक्षांत वास करणाऱ्या जाति अधिक श्रेष्ठ मानल्या नाहींत. मला वाटतें कीं, असें झालें असतां बालकाचे प्राण वांचून आपला कार्यभाग होईल, व त्या यक्षास स्वस्थ बसावें लागेल. माझें भाषण तुम्ही मान्य करा. जर तुम्हांस पुत्र झाला तर तुम्ही त्यास उपनयनादि विधि झाल्यावर केवळ ब्रम्हचर्यव्रतानें ईश्वरभक्तींत काळ घालवूं द्या. त्यास सन्यास दीक्षा देऊन हिमाचलावर तपश्चर्या करण्यास जाऊं द्या; आणि तुम्हांस कन्या झाली तर तिजला जगदंबेस

अर्पण करूं, म्हणजे तिनें शेवटपर्यंत श्रीची सेवा करण्याकडेसच आपल्या आयुष्याचा व्यय करावा.

**चित्र०**--परंतु गुरुवर्य असें झालें असतां प्रजाजन असंतुष्ट होऊन पुत्रास युवराज केला नाहीं, त्याचा विवाह केला नाहीं, व अल्पवयांत त्यास आपणांपासून दूर टाकिलें, म्हणून माझा द्वेष करतील, आणि मग या राज्यास धनी कोण राहणार आहे?

**दया०**--पण प्रजाजनांच्या दोषाकडे प्रस्तुत आपणांस लक्ष देणेंच नाहीं; कारण आपण त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वर्तन केलें, म्हणजे तें पुत्ररत्न यक्षाच्या भक्ष्यस्थानीं पडलें म्हणून समजा, व असें करणें मजला इष्ट दिसत नाहीं.

**अंबा०**—( पतीकडे वळून दीन स्वरानें नेत्रास अश्रु आणून ) गुरुवर्य जी आज्ञा करितात, ती महाराजांनीं मान्य करावी, हेंच या प्रसंगीं उचित आहे. असें होऊन तरी माझ्या बाळाचे प्राण वांचोत.

**चित्र०**—आपल्या आज्ञेस व देवीच्या म्हणण्यास माझा रुकार आहे; परंतु कोणतेही रीतीनें राज्यास मात्र विघ्न येऊं नये येवढें माझें गुरुपदीं मागणें आहे. मीं राज्यपदभ्रष्ट होऊं नये.

**दया०**--राज्यपदभ्रष्ट झालास तरी काय चिंता आहे ! परंतु ( गंभीर स्वरानें ) प्रथम झालेल्या पुत्ररत्नास क्रूरतेनें स्वहस्तानें बळी देणें ही अत्यंत नीचपणाची व अधमपणाची गोष्ट आहे.

" या भाषणावर चित्ररथानें प्रत्युत्तर केलें नाहीं. नंतर त्रिवर्गांनीं देवघरांत प्रवेश करून, तेथें त्यांनीं गुरुवर्य दयानंद सरस्वती यांच्या साक्षीनें आपलें प्रथम अपत्य देवास अर्पण करण्याचा नवस केला. अर्पणविधिसंबंधानें त्यांच्या मुखांतून शेवटचें अक्षर बाहेर पडतें आहे नाहीं तोंच, ते बसले होते त्या स्थळीं प्रचंड वादळाप्रमाणें एकदम

सोंसाट्याचा वारा आला. सर्व द्वारें खडाखडा वाजूं लागलीं. नंतर त्या स्थलीं पराकाष्ठेचा उष्मा होऊं लागला. जीव अगदीं गुद्मरून जाऊं लागला. दीपकाचें तेज मंद दिसूं लागलें, व कोणी मोठ्यानें धिःकारपूर्वक हास्य केल्याचा ध्वनि त्या त्रिवर्गांच्या कर्णीं पडला, परंतु त्यांस तेथें कोणी दिसलें नाहीं.

## यक्षिणीचा वृत्तांत (पुढें चालू.)

या गोष्टीस कांहीं मास लोटले. पुढें देवी अंबेचे मातृपद प्राप्त होण्याचे दिवस अगदीं समीप येऊन पोहोंचले. यासमयीं राजगृह नगरींत जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला होता. संपूर्ण प्रजाजनांचीं मुखकमलें आतां आपल्या स्वामींस पुत्ररत्न होईल ह्मणून सुप्रसन्न झालीं होतीं. राजास पुत्र झाल्याचें वर्तमान जो अगोदर सांगेल त्यास विपुल धन व वस्त्रें प्राप्त होतील, ह्मणून ज्यानें त्यानें मोठ्या धूर्ततेनें आपलें वर्तन ठेविलें होतें. यासमयीं देवी अंबेची वृत्ति आनंदी, शांत व उल्हासित दिसत होती. दयानंदसरस्वतीच्या भाषणावर तिचा पूर्णपणें विश्वास होता, परंतु चित्ररथाच्या अंतर्यामींची भीति व चिंता समूळ नष्ट झाली नव्हती. अशा मंगळसमयीं त्यानें आनंदी वृत्ति धारण केली होती; कारण तो असें न करता तर त्याच्या प्रिय पत्नीस व वृद्ध मातोश्रीस मोठी खिन्नता प्राप्त झाली असती. प्रथम झालेलें अपत्य कोणास अर्पण करावयाचें यासंबंधानें झालेला निश्चय त्रिवर्गांसच मात्र अवगत होता.

" मग नवमास पूर्ण झाल्यावर एके दिवशीं सुप्रभातीं राजवाड्यांत जिकडे तिकडे गडबड उडाली आहे, असें दिसलें. देवी अंबेचा प्रसूतकाल अगदीं जवळ आला होता. ज्योतिषी मंडळी घटका घालून बसली होती. नगरींतील व्यापाराची घ-

डामोंड बंद झाली होती. सर्वांचें लक्ष राजाच्या अंतःपुरांतून काय वार्ता येत आहे, याजकडे लागलें होतें. जिकडे तिकडे दुंदुभीचा गंभीर ध्वनि ऐकूं येऊं लागला. श्रीशंकरावर लघुरुद्राचीं आवर्त्तनें चाललीं होतीं. चित्ररथाची निश्चयात्मक खातरी होती कीं, यासमयीं आपणास पुत्ररत्नच होणार ; ह्मणून राजवाड्यांत अगोदरच जिकडे तिकडे मृदंग, शंख, नगारे, कर्णे इत्यादि वाद्यांचा ध्वनि होऊन मंगलकारक वाद्यें वाजत होतीं. इतक्यांत राजसभेंत चित्ररथास एकानें येऊन कानांत निरोप सांगितला कीं, ' महाराजास दोन कन्यारत्नें झालीं. '

" हर ! हर ! ! हा काय विपरीत प्रकार झाला ! ! ! त्याचें मुखकमल अगदीं निस्तेज झालें. प्रजाजनांला व राजसभेंतील प्रत्येकास आनंद झाला, व त्यांस राजाची सुप्रसन्न मुद्रा नसण्याचें कारण असें वाटलें कीं, त्यास पुत्र झाला नाहीं, ह्मणून खेद वाटला असेल. बाह्यदृष्ट्या राजा चित्ररथ आनंद दर्शवूं लागला. राजसभा विसर्जन झाल्यावर राजा गुरुमहाराज दयानंद सरस्वती यांच्या समवेत एकांत स्थलीं गेला व ह्मणूं लागला कीं, ' गुरुवर्य, हाय ! हाय ! आतां काय कर्तव्य आहे ! ! यक्षास दिलेल्या वचनाचें आतां कसें काय करावें ? ' यावर त्या सुशील वृद्ध मनुष्यानें सद्गदित अंतःकरणानें प्रत्युत्तर केलें कीं, ' यासमयीं माझी मति अगदीं कुंठित झाली आहे. यासमयीं दुसरें कांहींएक न करितां जगन्नियंत्या परमेश्वरास अनन्यभावें शरण जावें, हाच सुगम आणि उत्तम उपाय आहे. ' हें भाषण ऐकून चित्ररथाची मनोवृत्ति प्रसन्न न होतां उदासच राहिली. त्याच्या नेत्रांतून यासमयीं सारख्या अश्रुधारा वहात होत्या. अशा वेळीं गुरुमहाराजांनीं मोठ्या कष्टानें त्या स्थलापासून ईश्वराची एकाग्र चित्तानें राजास संकटांतून मुक्त करण्याकरि-

तां जपजाप्य करून प्रार्थना करण्यास्तव निवांत स्थलीं गमन केलें.

"क्षणमात्र राजा एकटा राहिला नाहीं तोंच, त्यास आपल्या स्कंधावर कोणी हात टाकला आहे असा भास झाला. त्यानें लागलेंच अंतर्यामीं जाणलेंच. काळजांत धस्स झालें. उपाय नाहीं. बिचारा अगदीं दीन निराश्रित झाला. त्याच्यानें वर दृष्टि करून त्या यक्षाच्या आरक्त नेत्रांकडेस नुसतें अवलोकन करण्याचें सुद्धां धाष्ट्य होईना. एवढें मात्र त्यानें जाणलें कीं, वृक्षाच्या मूलप्रदेशीं आपण हताश होऊन पडलों असतां, ज्यानें आपलें साहाय्य करून, आपणास पुनरपि राज्यदान करून, शत्रूंच्या हांतून सोडवून आपणावर अपरिमित उपकार केले, अशा त्या यक्षाच्या जड हस्ताचा मजला स्पर्श होत आहे.

**यक्ष०**—( कर्कश स्वरानें अत्यंत कोपायमान होऊन ) अरे नीचा, ज्या समयीं अत्यंत हीनस्थितीला येऊन, क्लीबाप्रमाणें शत्रूला पाठ दाखवून पलायन केलें होतेंस, ज्यासमयीं तूं राज्यपदच्युत होण्याचा समय आला होता, अशावेळीं मजकडून सेवा करून घेतलीस, आणि त्यावेळीं दिलेलें अभिवचन सांप्रत टाळण्यास पाहतोस काय ? त्या नीच दयानंद सरस्वतीचे भाषणास मोहून, त्याजवर विश्वास ठेऊन प्रथम झालेलें अपत्य मजला अर्पण करण्याचें सोडून देवास अर्पण करतोस काय ? त्या लुब्रया वृद्ध ब्राह्मणाला आतांच मी मोक्षास पाठवितों. देवी अंबेला आतां दोन कन्या रत्नें झालीं आहेत. मूर्खा, याचें कारण काय असावें, हें अजून तूं उमजत नाहींस ? एक कन्या देवास अर्पण करावी, व दुसरी मजला अर्पण केली पाहिजे. असो, आतां प्रस्तुतच तें कोमल अर्भक मी तुझ्या-

पासून हिसकावून नेण्याची इच्छा करीत नाहीं. तें तर माझेंच आहे. तें कोमल अर्भक घेण्याचा माझा मनोदय नाहीं. माझे हेतु आतां ज्याअर्थी कन्याच झाली आहे त्याअर्थी, आतां मी अन्यतऱ्हेनें साध्य करून घेणार आहें. तूर्त मी तें हेतु गुप्त ठेवितों.

**चित्र०**—( मनांत आशा उत्पन्न होऊन नेत्र वर करून त्या भयंकर मुखाकडे कंपायमान होत्साता पहात पहात ) तर मग मला किंचित् आशा आहे ह्मणावयाची ?

**यक्ष०**—( धिःकारयुक्त हास्य करून ) अरे मृत्पिंडा, आशा! आशा ! ! असा वारंवार निरर्थक किती शब्दोच्चार करितोस ? याविषयीं तुला पूर्वींच कथन केलें आहे. आतां व्यर्थ भ्रमांत कशाला पडतोस ? परंतु मजला जें कांहीं तुला बोलावयाचें आहे, तेंच जर तुजला आशातंतु वाटल्यास तू खुशाल तसें समजून स्वस्थ बैस. माझा कांहीं प्रतिबंध नाहीं ( हे शब्द राजाच्या कोमल अंतःकरणास शस्त्रघाताप्रमाणें लागत होते ). सांप्रत तीं उभय अर्भकें तुजपाशींच असूं दे. त्वरितच तुझ्या दृष्टोत्पत्तीस येईल कीं, कोणतें मजला अर्पण करावयाचें, आणि देवीस कोणतें अर्पण करावयाचें आहे. उभयतां सौंदर्यादि गुणांनीं शोभायमान होतील. देवीस अर्पण केलेली कन्या केतकीप्रमाणें गौरवर्णाची होईल, व मजला अर्पण केलेली कन्या इंद्रनीलमण्याच्या पुतलिकेप्रमाणें कृष्णवर्णा अत्यंत देदीप्यमान होईल. या माझ्या बलीस तूं 'यक्षिणी' असें अभिधान दे, ह्मणजे जन्मापासून तें माझेंच भक्ष्य आहे असें सर्व लोकांस समजेल. याप्रमाणें माझी आज्ञा पाळलीस तर तीं उभय अर्भकें मी त्यांच्या मातेसन्निधच राहूं देईन. पण जर करितां माझ्या आज्ञेचें उल्लंघन केलेंस, तर एका क्षणमात्रांत

मी आपला भक्ष्य प्रसूत झालेल्या देवीच्या मंचकावरून कंसाप्रमाणें बलात्कारानें हिसकावून नेईन, हें पक्कें समज.

**चित्र०**—( अशा क्रूरपणाच्या आचरणानें आपली प्रियसखी प्राण टाकील, यामुळें अत्यंत भयाभीत होत्साता ) नका, नका, हा जन आपल्या आज्ञेस मान्य आहे ; परंतु आपण तें कोमल अर्भक अशा क्रूरतेनें नेऊं नका. आपल्या आज्ञेप्रमाणें तिचें अभिधान 'यक्षिणी' असेंच ठेऊं.

**यक्ष०**—( आनंदित मुद्रा होऊन ) असें केल्यानें मजला ती पुढें अत्यंत उपयोगीं पडणार आहे. अनेक तरुण त्या तरुणीच्या लोकोत्तर सौंदर्यास मोहित होऊन तिच्या नादीं लागतील. असें झालें असतां ती आपली मुक्तता करून घेण्याकरितां त्या पुरुषांना मजला बळी देईल.

यक्षाच्या या वरील भाषणाचा चांगलासा अर्थ चित्ररथाच्या लक्षांत न आल्यानें तो मनाचा मोठा धडा करून त्या यक्षाच्या मुखाकडेसच पहात उभा राहिला. मात्र भीतीनें या समयीं त्याचा अगदीं कंठशोष झाला होता. आपल्या भाषणाचा चांगलासा अर्थ चित्ररथाच्या ध्यानांत आला नाहीं ह्मणून यक्षानें पुनरपि भाषण करण्यास आरंभ केला.

**यक्ष०**—मी काय भाषण करतों आहे, तें एकाग्रचित्तानें श्रवण कर. मजला अर्पण केलेली कन्या अत्यंत रूपवती दिसावी असें मी करीन. जरी ती कृष्णवर्णाची आहे, तथापि अशी देदीप्यमान पुतलिका आजपावेतों या भूतलावर निर्माणच झाली नाहीं, असें तिच्या अंगीं सौंदर्य आणीन. अशा तिच्या त्या अनुपम सौंदर्याला यौवनावस्था प्राप्त झाल्यावर अनेक बलवान् व रूपसंपन्न राजपुत्र तिजवर लुब्ध होऊन, तिच्या मुखांतून काय आज्ञा निघते आहे, याची मार्गप्रतीक्षा कर-

तील. तिजला तोषित करण्याकारितां जिवापाड साहसांचीं अघोर कृत्यें करण्यास सिद्ध होतील, आणि अशा रीतीनें ते आपलें प्रेम प्रगट करावयास लागतील. असें झाल्यावर को-णा तरी राजपुत्रावर तिचें मन सुप्रसन्न होणारच. नंतर ती त्याला विनंति करील कीं, 'ज्याला माझें करग्रहण करणें असे-ल त्यानें प्रथम यक्षाबरोबर निर्वाणीचें युद्ध करून, त्याच्या बंधांतून त्याचा पराभव करून मजला मुक्त करावें.' अशी जरी भयंकर प्रतिज्ञा आहे, तरी कामातुर मनुष्य कधींही परिणा-मावर दृष्टि देणारा नसतो. पुष्कळ रणधुरंधर योद्धे असें भयं-कर कृत्य करावयास मागें पुढें पाहणार नाहींत, व अर्थात त्याजला जय ह्मणून कधींहि मिळणारच नाहीं. अनायासेंच ते माझे भक्ष्य होतील. अशा रीतीनें त्या सुंदर कन्येच्या योगानें एकामागून एक मजला बळी मिळणार आहेत. सुंदर स्त्रि-यांच्या नेत्रकटाक्षांच्या योगानें कामिजनांचें अंतःकरण व्य-थित होऊन जिवाची सुद्धां आशा धरीत नाहींत, यास्तव मी तिचीं नेत्रकमलें अत्यंत देदीप्यमान, भव्य व तेजोमय करणार आहें.

**चित्रा०**—हर! हर! परमेश्वरा, काय घोर पातक हें माझ्या शिरावर!! तुझी तृप्ति होण्यास याशिवाय अन्यमार्गच नाहीं काय? अशा रीतीनें तूं माझ्या सुकुमार कन्येचा उपयोग क-रणार काय? अरेरे!!!

**यक्ष**—( दीर्घस्वरानें ) 'माझ्या सुकुमार कन्येचा' असें भा-षण मुखांतून काढूं नकोस. ती माझा भक्ष्य आहे. हवा त्या मार्गानें मी तिचा उपयोग करून घेईन.

**चित्रा०**—आणि आतां तिची या यातनांतून मुक्तता कर-ण्यास अन्य साधनच राहिलें नाहीं काय? अथवा जसजसें

तिचें सौंदर्य तारुण्यानें विकास पावत जाईल, तसतसें तूं तिच्या हस्तें तिच्यावर मोहित झालेल्या तरुणांचा नाश करणार काय ? हरहर !! ( नेत्रांस अश्रू आणतो. )

**यक्ष**—सामान्यतः प्रत्येक संकटास निवारण करण्यास कांहींना कांहीं तरी उपाय असतोच. त्या मानानें या संकटाचें सुद्धां निवारण होईल. तें कसें करितां येईल तें मी सांगतों. अवधान असूं दे.

**चित्र०**—( चित्तांत आशेचा अंकुर उत्पन्न होऊन किंचित् आनंदानें ) काय तिची मुक्तता होण्यास उपाय ? आणि तो या मुखांतून ! !

**यक्ष**—अरे मृत्पिंडा, तुझा स्वभाव किती उच्छृंखल आहे ? हा उपाय कांहीं सांप्रतचा नव्हे. परंतु या गोष्टीस दिनावधि लागणार आहे. तुझ्या कन्येस तारुण्य प्राप्त झालें, आणि ती यौवनाच्या भरांत परम रमणीय दिसूं लागली, म्हणजे एक क्षत्रिय योद्धा तिच्याशीं निष्पापबुद्धीनें मित्रत्व जोडण्याचा प्रयत्न करील. नंतर तो तिच्या मुक्ततेप्रीत्यर्थ मजसमागमें दारुण युद्धप्रसंग करील. त्यामध्यें जयापजय येणें हें त्याच्या कृतीवर अवलंबून आहे. यक्षिणीशीं त्यानें ठेविलेल्या वर्तनांत जर लेशमात्र पापबुद्धि वसेल, तर तो विजयशाली होणार नाहीं; असें घडून न आलें, आणि जर तिच्या वयास चतुर्दश वर्षें अतिक्रांत झालीं, तर मग मात्र कोणाचें कांहीं चालावयाचें नाहीं. जो जो राजपुत्र, अथवा रणयोद्धा, तिच्या प्रीतिपाशांत बद्ध होईल, त्यास मजसमागमें युद्ध करून मोक्षसदनासच जावें लागेल. चतुर्दश वर्षांचा शेवटचा दिवस अतिक्रांत झाला कीं, यक्षिणी आपल्या सर्वस्वाला मुकली म्हणून समज. त्या दिवसापावेतों

जर करतां तुझ्या कन्येच्या वतीनें कोणी रणयोद्धा माझ्याशीं संग्राम करण्यासच मुळीं आला नाहीं, तर मग ती सर्वस्वी माझी आहे. नंतर सर्वस्वी माझी आज्ञा तिला प्रमाण आहे. ती आपल्या तेजोमय नेत्रकटाक्षांनीं अनेक जनांस मोहित करून त्यांचे जीव माझ्या भक्ष्यस्थानीं पाडील.

"पुढें बराच वेळपावेतों तो यक्ष चित्ररथाबरोबर भाषण करीत होता, परंतु महाराजांस निवेदन करण्यासारखें त्यांत कांहीं सार नाहीं. हा अनर्थकारक व हृदयविदारण करणारा वृत्तांत विशेष लांबत चालला आहे, व अजून बराच वृत्तांत कथन करावयाचा आहे. नंतर तो यक्ष माझ्या पित्यापासून एकाएकीं अदृश्य झाला. सन्निध कोणी परिजन अथवा आप्तवर्ग नाहीं, असें पाहून माझ्या पित्यास क्षणमात्र असें वाटूं लागलें कीं, प्रस्तुत घडलेला प्रकार मिथ्या आहे कीं काय ? परंतु शिव ! शिव ! ! अजून सुद्धां भ्रम ह्मणून मानणें ह्मणजे केवढी चूक आहे ? त्या यक्षाचा दुंदुभीप्रमाणें प्रचंड ध्वनि कर्णरंध्रांत अजून चांगला घुमत होता, व याशिवाय हा जरी मिथ्या प्रकार समजला, तथापि मणगटाचें घायाकडे एकवार अवलोकन केलें ह्मणजे तात्काळ मनाची खातरी होत असे कीं, घडलेला प्रकार अक्षरशः सत्य सत्य आहे. जरी या मणगटावरचे घायास या कालीं सुमारें पांच मास झाले होते, तरी तो घाय अगदीं नवीनच झाला आहे असें वाटे.

"स्वतःला दुःख, स्वतःच्या संगतीनें आपल्या प्रिय भार्येस दुःख, इतकेंच नाहीं, परंतु उभयतांबरोबर नूतन जन्मास आलेल्या अर्भकांनाही अवर्णनीय यातना भोगाव्या लागत आहेत, हें पाहून माझ्या पित्यानें या समयीं आपले प्राण मोठ्या कष्टानें धरिले होते. तसाच रुदन करीत

झालेला वृत्तांत गुरुवर्य दयानंद सरस्वती यांजला निवेदन करावा, ह्मणून जेथें ते नेहमीं बसत असत, त्या एकांतस्थलीं त्यानें प्रवेश केला. परंतु राम ! राम ! ! केवढी ही आकाशाची कुऱ्हाड माझ्या पित्यावर कोसळली ! ! ! भयंकर प्रकार ! अति भयंकर ! ! (अंगावर शहारे येऊन) गुरुवर्य दयानंद यांचा कोणी दुष्टानें प्राणघात करून त्यांचे सर्व अवयव छिन्नभिन्न करून कांहीं या स्थलीं, कांहीं त्या स्थलीं, असे अस्ताव्यस्त पसरून ठेविले होते. हें पहातांच माझ्या पित्यास नेत्रापुढें अंधारी येऊन मूर्च्छा आली. त्यास आपण पाताळांत चाललों आहों, असें वाटलें. त्या भयंकर समयीं मी कोठें आहे, काय करितों, काय बोलतों, हें कांहींच त्यानें जाणिलें नाहीं. त्याचे प्राण तत्क्षणींच जावे, पण हृदयाच्या कठोरत्वामुळें ह्मणा, अथवा शरीराला दुःखें भोगावयाचीं होतीं ह्मणून ह्मणा, अथवा जन्मांतरीं केलेलें पाप भोगण्याचें अजून संपलें नाहीं ह्मणून ह्मणा, त्याचे प्राण निघून गेले नाहींत. तो परिचारकांस पाचारण करण्याच्या अगदीं विचारांत होता, इतक्यांत त्याच्या ध्यानांत आलें कीं, हें भयंकर कृत्य त्या यक्षानेंच केलेलें आहे. कारण तो नुकाच मी असें करणार आहें, ह्मणून त्वेषानें बोलून गेला होता.

## यक्षिणीच्या वृत्तांताची परिसमाप्ति.

" भिन्न भिन्न तरंगांनीं मस्तक अगदीं भणाणून गेलें. दोन विचार मूर्तिमंत पुढें उभे राहिले. एकपक्षीं असें वाटूं लागलें कीं, हें सर्व भयंकर कृत्य या क्षणींच, प्रधानादिक मंडळींच्या कानांवर घालावें, व सर्व पौरजनांला श्रुत करावें कीं, गुरुवर्य दयानंद सरस्वती यांचा अशा प्रकारें अंत झाला. दुसरे पक्षीं

मनाची कल्पना अशी धांवली कीं, हें सकल वृत्त गुप्त ठेवावें, हेंच या प्रसंगीं पोक्तपणाचें, व समंजसपणाचें वर्तन होईल. स्वतःच्या जिवाचें जर संरक्षण करणें इष्ट असेल, आणि राजकुलास जर कालिमा लावून घेणें नसेल, तर त्यास असें केल्याविना अन्य उपाय नाहीं; नाहीं तर राजानेंच गुरुहत्या केली असावी, असा नगरांत बोभाट होण्याचा संभव आहे. असें झाल्यानें राजावर ब्रह्महत्या व गुरुहत्या केल्याचा दोषारोप होऊन, सकल प्रजाजन राजाच्या निंद्य आचरणासाठीं त्याचा द्वेष करतील. शिवाय आतां ही शोककारक वार्ता देवी अंबेच्या कानांवर अशा प्रसंगीं जातां कामानये. असें झाल्यानें कदाचित् तिच्या प्रकृतीस अपाय होईल. तात्पर्य, या प्रसंगीं त्यानें असा निश्चय केला कीं, आपल्या प्रिय पत्नीस, गुरुमहाराज दयानंद यांच्या एकाएकीं अदृश्य होण्याच्या संबंधानें कांहीं तरी कृत्रिम गोष्ट सांगावी, व छिन्नभिन्न झालेलें हें शव कोठें तरी भूमींत पुरून टाकावें.

“ अशा प्रसंगीं प्रसन्नवदन करून राणीच्या महालांत जावें कसें ? मुखाकडे किंचित् कोणीं निरखून पाहिलें कीं, धारण केलेली शांतता तत्क्षणींच ढांसळून जाणार हें चित्ररथराजा पक्कें जाणत होता; तथापि त्यानें ज्या स्थळीं तें शव पडलें होतें, तेथील द्वार ओढून घेऊन बंद केलें, व मुखकमल हर्षयुक्त करून कांतेच्या महालांत कन्यारत्नें अवलोकन करण्यास्तव तो आला. तेथें आल्यानंतर स्वप्रियेच्या समजुतीसाठीं त्यानें चार समाधानाच्या गोष्टी सांगून बराच वेळ तिच्या समागमें घालविला.

“ मध्यरात्र उलटून गेली. जिकडेतिकडे भयंकर काळोख पडला होता. अशा समयीं राजा चित्ररथ ज्या स्थळीं

दयानंदसरस्वतीचा वध झाला होता तेथें आला. त्यानें ते छिन्नभिन्न झालेले सर्व अवयव एकत्रकरून तें एका पेटींत घातले, व एका गुप्तमार्गानें ती घेऊन तो बागेंत गेला. त्याचा हेतु असा होता कीं, बागेमध्यें कोठें तरी खांच खणून ती भूमींत पुरून टाकावी. नंतर तो स्वतः भूमि खणूं लागला; परंतु असें श्रमातिशयाचें काम करण्याची त्यास कधीं संवय नसल्यानें, अल्प काम झालें नाहीं तोंच तो दमून गेला. इतक्यांत अंधःकारास ग्रासीत, सर्व दिशांना स्वच्छ करीत, व आपली कांति पसरीत भगवान् रोहिणीकांत उदय पावला. चंद्रोदय झाल्यानें माझ्या पित्याची भीति दुणावली. क्षणोक्षणीं त्यास भास व्हावा कीं, आपलें हें निंद्य कर्म कोणी पहात असेल. या भीतीनें आरंभिलेल्या कृत्यास त्याचा हात चांगलासा चालेना. शेवटीं त्यानें तें काम अर्धवटच सोडून दिलें, व एकवार तें शव स्कंधावर घेऊन तो बागेंतून एका गुप्त द्वारानें बाहेर पडला. या समयीं त्यानें नदीचा मार्ग धरिला होता. असें करण्यांत त्याचा हेतु असा होता कीं, तें सर्वच पाषाण घालून नदीच्या डोहांत मध्यभागीं फेंकून द्यावें.

"आतां तो तें शव मोठ्या जोरानें फेंकणार, तोंच सन्निध असलेल्या वृक्षराजींतून आपणाकडेस कोणी तरी येत आहे, असें त्याला दिसलें. ती पेटी तेथेंच टाकून पलायन करण्याच्या विचारांत तो होता, इतक्यांत त्या मनुष्यानें त्याच्या दंडास धरिलें, तेव्हां त्यास चंद्रप्रकाशानें स्पष्ट दिसून आलें कीं, हा शिशुनाग प्रधान—ज्याला आपण मगध देशांतून वीरबाहूनें केलेल्या युद्धप्रसंगीं घालवून दिलें होतें, तोच हा आहे. चित्ररथाच्या मनांत प्रथमतः तर असें आलें कीं, त्याजवर शस्त्रप्रहा-

र करावा, व त्याप्रमाणें करण्याकरितां त्यानें आपल्या खड्गास हात घातला; परंतु इतक्यांत मनदेवता अशा क्रूरपणानें प्राण घेण्यास प्रवृत्त होईना, व शिवाय त्यास असेंही दिसून आलें कीं, हा प्रसंग अगदीं हातघाईवर येणार आहे; कारण शिशुनाग स्वतः निःशस्त्र नसून, युद्धकलेंत तो माझ्या पित्याप्रमाणेंच चांगला प्रवीण होता.

**चित्रा०**—( आपल्यास प्रधानानें ओळखिलें असें जाणून दंडास हिसका देऊन ) अरे नीचा, माझ्या अंगास हात लावूं नको.

**शिशु०**—महाराजांची आज्ञा शिरसा मान्य आहे, परंतु महाराजांनीं हें लक्षांत आणलें नाहीं कीं, महाराज मजशीं कित्ती उद्दामपणाचें वर्तन ठेवीत आहेत. आपण पृथ्वीपति आहांत, हें मजला अवगत आहे; परंतु सांप्रत असा बिकट प्रसंग येऊन गुदरला आहे कीं, मी आपला तरी प्राण घेईन, किंवा मी स्वतः तरी प्राणास मुकेन.

**चित्रा०**—( चित्तांत गोंधळ उत्पन्न होऊन अशा प्रसंगीं कसें वर्तन करावें हें अगदीं सुचेना; करितां साम करावें हाच उत्तम मार्ग आहे, असें जाणून ) आपणा उभयतांमध्यें आतां वैरभाव नसावा. पुनरपि माझ्या राज्यांत तुला येण्याचें काय कारण झालें ? अशा भयंकर रात्रीं निशाचराप्रमाणें तूं या स्थलीं भटकत कां हिंडत आहेस ?

**शिशु०**—माझा मनोदय असा होता कीं, राजगृह नगरींत गुप्तरीत्या प्रवेश करून, चार शिष्ट लोक—कीं, ज्यांनीं महाराजांची कृपा संपादन केली आहे,—अशांबरोबर स्नेह करून, पुनरपि आपल्यास प्रधानकीचीं वस्त्रें प्राप्त करून घ्यावींत. परंतु आतां या हेतूचें निरसन झालें. ( भाषणांत किंचित् वक्रता आणून )

हें सर्व कार्य करण्याचा प्रसंग आतां मजवरच आला आहे. आतां सर्व माझ्या हातची गोष्ट आहे.

**चित्र**०--( नखशिखांत सर्व शरीर संतापानें व भीतीनें कंपित होऊन ) भाषणाचा हेतु काय आहे हें मीं जाणलें नाहीं. तुझें वर्तन या समयीं फार उन्मत्तपणाचें होत आहे, हें तूं समजत नाहींस काय ? तूं कोणापुढें उभा राहिला आहेस ? मी कसा झालों तरी राजा आहें.

**शिशु**०--( [illegible] कावरेबावरे करून भिवया वर चढवून हृदयमर्मक भाषणानें ) पण राजाचे प्राण, राज्याची उन्नति, आणि राजाची सुकिर्ति; हीं सांप्रत सर्व माझ्या स्वाधीन आहेत. ( पदतलासन्निध पडलेल्या शवाकडे बोट करून ) हें भयंकर कृत्य आपण होऊन * * * करीत आहे. आपल्या हातांतून तें भूमीवर पतन पावलें, त्यासमयीं त्यामध्यें असलेल्या पदार्थांचा ध्वनि कानांवर पडतांच, तो काय पदार्थ असावा हें मीं जाणलें. हर ! हर ! ! निश्चयात्मक सांगतों कीं, तें शव आहे. अरे चित्ररथा, या निर्मल स्फटिकाप्रमाणें वाहत असलेल्या फल्गु नदीमध्यें, तूं कोणाचे तरी प्राण हरण करून, शव टाकून देण्याचे हेतूनें या समयीं आलेला आहेस.

**चित्र**०--( हृदयांत धडकी भरून;काळीज उडूं लागतें, व नेत्र गरगरां फिरूं लागतात ) तुझें भाषण सत्य आहे, परंतु हा प्राणघात--ही हत्या--माझ्या हातानें झाली नाहीं हें मी ईश्वरसाक्ष--

**शिशु**०--मग अशा गुप्तरीतीनें त्याचें विसर्जन करण्यास महाराज स्वतः काय ह्मणून आले ? कोणी निरपराधी मनुष्य तर प्राणास मुकला नाहींना ? अथवा हें शव एखाद्या पुण्यशील ब्राह्मणाचें तर नसेलना ? अथवा राजहत्या, अथवा स्त्रीहत्या तर झाली नसेलना ?--तें कांहीं असो, महाराजांचा आणि

मजशी आतां वैरभाव नसावा, असा महाराजांचा मानस आहे, मजला ही गोष्ट मान्य आहे; पण माझें ह्मणणें स्वामींनीं मान्य केलें पाहिजे. आज रात्रीं पाहिलेल्या या भयंकर कृत्याची परिस्फुटता या माझ्या मुखांतून कधींही होणार नाहीं. महाराजांनीं स्वस्थ असावें. या माझ्या सद्वर्तनाप्रीत्यर्थ महाराजांनीं मला प्रधानकीचीं वस्त्रें पुनश्च एकवार अर्पण करून, मजला तत्पदारूढ करावें. पूर्वीच्या माझ्या सर्व अपराधांची मजला क्षमा असावी. मी काय भाषण करीत आहें, हें स्वामींनीं लक्षपूर्वक श्रवण करावें. असें करणें महाराजांना तिळमात्र जड जाणार नाहीं. उद्यींक राजनगरींत अशी द्वाही फिरवावी कीं, ' कारागृहांतून संपूर्ण बंदिजनांस सोडून देणें; त्यांना मुक्तता दिली आहे. ' राजानें आपल्यास कन्यारत्नें झालीं, त्यासंबंधें प्रजेला अशा रीतीनें आनंद प्रदर्शित करून दाखविणें, हें राजाचें कर्तव्यच आहे. शिवाय ' परराज्यांत गेलेल्या बंदिजनानीं सुद्धां वाटल्यास राजगृहनगरींत परत यावें, अशी महाराजांनीं द्वाही फिरवावी. असें झालें असतां, मी मोठ्या आनंदानें स्वामींच्या दर्शनास येऊन, मी आपला मस्तक स्वामींच्या पदकमलीं ठेवीन, व शरणागत होऊन मी आपल्या अपराधाप्रीत्यर्थ क्षमा करण्याविषयीं विनवणी करीन. नंतर महाराजांनीं या माझ्या विज्ञप्तीस मान द्यावा, व सुप्रसन्नता प्रकट करून मजला माझें पूर्वपद द्यावें.

**चित्र०**—असें होणें दुरापस्त आहे. बृहत्बलानें सर्व प्रजाजनांचीं मनें आपलीशीं करून घेतलीं आहेत. त्याला पदभ्रष्ट करून तें पद तुजला अर्पण केल्यास, प्रजेचा रोष होऊन, प्रजा कदाचित् राज्यामध्यें विघ्नें उत्पन्न करील.

**शिशु०**—( दांत चावून वक्रदृष्टीनें ) प्रजेला जरकरितां

असें समजलें कीं, आपल्या स्वामीनें कोणाचा तरी प्राणघात केला आहे, तर मग ती राज्याला जास्त विघ्नें आणणार नाहीं काय ?

**चित्र**०—( निकरावर येऊन ) इतकें धिःकारपूर्वक नीच विचाराचें भाषण काय ह्मणून मुखांतून काढीत आहेस ?

**शिशु**०—यासमयीं मी मनसोक्त भाषण करणार. तिळप्राय भिणार नाहीं. ( पेटीकडे बोट दाखवून ) माझ्या भाषणाच्या सत्यतेची साक्ष या पेटींतील वस्तु चांगली देत आहे.

" त्या हतभागी राजाचा सर्वतोपरी निरुपाय होऊन, शिशुनाग प्रधानाचें भाषण सर्वथैव त्यास मान्य करावें लागलें. एकमेकांस उभयतांनीं वचनें दिलीं, व राजानें आपल्या वचनास असत्यता आणणार नाहीं, अशी त्याची खातरी करण्याकरितां आपल्या करांगुलींतून आपली रत्नजडित मुद्रिका काढून त्याचे स्वाधीन केली. नंतर त्या शवास फल्गु नदीमध्यें जोरानें फेंकून दिलें. माझा पिता घरीं आल्यावर ज्या स्थळीं हें भयंकर कृत्य घडून आलें होतें, त्या स्थळीं मोठमोठे रुधिराचे डाग पडलेले होते ते त्यानें सर्व धुऊन काढिले, व भूमि अगदीं पूर्वीप्रमाणें स्वच्छ केली. नंतर तो दुःखित अंतःकरणानें शयनगृहांत गेला, व तेथें गतगोष्टींचा विचार करित त्यानें मोठ्या दुःखानें रात्र घालविली.

" दुसरे दिवशीं तीन प्रहर दिवसाचे सुमारास माझ्या पित्यानें मोठी राजसभा भरविली, व सर्व राजगृहनगरींत अशी द्वाही फिरविली कीं, ' सर्व अपराधी जनांस कारागृहांतून मुक्त केलें आहे व त्याचप्रमाणें ज्यांना परराज्यांत घालवून दिलें, त्यांना वाटल्यास त्यांनीं आतां स्वराज्यांत यावें. ' ही सुवार्ता

नागरिक जनांच्या कानांवर पडतांच त्यांना मोठा आल्हाद झाला; परंतु इतक्यांत त्यांचे ऐकण्यांत असें आलें कीं राजानें बहुमानानें शिशुनागप्रधानाचें स्वागत केलें. या राजाचे करण्यानें संपूर्ण पौरजनांना अत्यंत त्वेष येत चालला. शिशुनागप्रधानाची पूर्वीची सकल संपत्ति, जी माझ्या पित्यानें बलात्कारानें घेतली होती, ती संपूर्ण त्याची त्यास परत केली. इतकेंच नाहीं, परंतु संपूर्ण राजगृहनगरींत अशी वदंता उठली कीं, त्यास माझा पिता प्रधानकीचीं वस्त्रें देणार आहे. या समयीं राजानें आनंद प्रदर्शित करण्याकरितां द्रव्याचीं भांडारें ब्राह्मणांस दानें केलीं, व हत्तीवरून शर्करा वांटल्या. थोडेच दिवस या गोष्टीस झाले नाहींत तोंच, बृहत्बलादि मंडळीस कामावरून दूर करून, चित्ररथानें शिशुनागास आपल्या मित्रासह त्यांच्या स्थानीं नेमिलें, अशी सर्वत्र वार्ता पसरली. जिकडे तिकडे राजगृहनगरींत यासंबंधानें चर्चा होऊं लागली. परंतु राजानें सेनेच्या बळानें सर्व लोकांना धाकांत ठेविलें होतें. येणेंप्रमाणें पुनरपि राज्यांत लोकांचीं मनें क्षोभित झालीं.

"देवी अंबेच्या मनास राजानें सत्यासत्य भाषणें करून किंचित् समाधान उत्पन्न केलें. त्यानें तिला कळविलें कीं, जेव्हां तूं प्रसूत झालीस, व जेव्हां तुला दोन कन्यारत्नें झालीं, तेव्हां तो दुष्ट यक्ष येथें आपलें भक्ष मागण्याकरितां आला होता; परंतु मीं त्याची प्रार्थना करून कालावधीवर गोष्ट घालविली आहे. गुरुवर्य दयानंद सरस्वती यांच्याविषयीं त्यानें असें कळविलें कीं, ते हिमाचलावर आपली सर्वत्रांची त्या यक्षाच्या जाचांतून मुक्तता व्हावी, एतदर्थ तपश्चर्येकरितां गेले आहेत. अशा मोहक भाषणांनीं त्यानें राणीच्या मनास समाधान उत्पन्न केलें. ती आपल्या बालकांना जीव कीं प्राण करूं लागली. ति-

चें सर्व लक्ष आपल्या बाळकांकडे लागलें व राज्यांत झालेल्या उलाढाली तिच्या कानांवर फारशा जात नसत.

"अशा रीतीनें तीन संवत्सर अतिक्रांत झाले. यक्षाच्या आज्ञेप्रमाणें माझें अभिधान यक्षिणी असें ठेविलें, व माझ्या भगिनीचें देवांगना असें ठेविलें; कारण ती गर्भांत असतांनाच तिजला देवीस अर्पण केलेली होती. दिवसानुदिवस यक्षाच्या भाषणास सत्यता येत चालली. आह्मी उभयतां परम रमणीय दिसूं लागलों. त्यामध्येंही देवांगनेचे मुखावर अत्यंत दैदीप्यमान सतेजता दृग्गोचर होऊं लागली, आणि माझ्या मुखावर कृष्णवर्णाची दिव्य प्रभा दिसूं लागली; त्याच्या योगानें मजमध्यें देवांगनेपेक्षां सौंदर्यांत तिळमात्र सुद्धां कमीपणा दिसत नसे. या माझ्या भाषणानें महाराजांस वाटेल कीं, मी वारंवार आत्मस्वरूपाची दर्पोक्ति प्रकट करीत आहें; परंतु असें समजूं नये. कथानकाचा जसजसा ओघ येत चालला आहे, तसें तसें मी भाषण करीत आहें. यामध्यें आत्मस्तुतीचा लेश नाहीं. मी कदाचित् अन्य सुस्वरूप तरुणींच्या मानानें स्वरूपवान असलें, ह्मणजे तो मजमध्यें मोठा सद्गुण झाला, असें नाहीं. सुंदर रूप असणें, ही परमेश्वराची देणगी आहे. त्याविषयीं निरभिमानता असावी. या माझ्या सौंदर्यरूपी मोहजाळांत यक्षाच्या भाषणाप्रमाणें पुष्कळ तरुणजन गुंतून जाऊन त्यांच्या प्राणांचे बळी पडणार आहेत. दीपकज्योतीवर पतंग झडप घालून जसा सर्वस्वी आपला प्राणनाश करून घेतो, तसेंच आतां होणार आहे; (कंठ दाटून) तस्मात् मी फार दुष्ट आहें. मनुष्यांच्या अमोल्य जीवित्वाचा नाश करणारी आहें. सौंदर्य हा एक मला शाप आहे. यापासून मजला अभिमान अथवा आनंद वाटण्या-

च्या ठिकाणीं मी जनांमध्यें दोषास मात्र पात्र होत चाल-लें आहें.

"आपणास समकालीन दोन कन्यारत्नें झालीं, व उभय-तांमध्यें पराकाष्ठेची साम्यता आहे, हें अवलोकन करून माझ्या मातेस फार आनंद होत असे. रात्रंदिवस ती आह्मांस प्रेम-पूर्वक निरखून पहात असे. केशकलापांमध्यें आणि वर्णांमध्यें मात्र भेद दिसून येई. वरकड आह्मां उभयतां भगिनींमध्यें पराकाष्ठेची साम्यता दिसे. तथापि आमच्या मातापित्यांनीं एकमेकांमध्यें आमच्या नेत्रांविषयीं नेहमीं वादविवाद करावा. त्यांचें ह्मणणें असें पडे कीं, देवांगनेचे नेत्र देवलोकींच्या रंभे-प्रमाणें आहेत, व माझेही नेत्र तसेच आहेत, परंतु किंचित् भयोत्पादक दिसतात.- तिचा केशकलाप कज्जलाप्रमाणें कृ-ष्णवर्ण आहे; माझा घनदाट मेघाप्रमाणें नीलवर्ण आहे. देवांगना अगदीं प्रत्यक्ष इंद्रलोकींची अप्सरा दिसते, व मी एखाद्या ऋषिवर्यानें शापिलेल्या देवलोकींच्या तरुणी-प्रमाणें, या मृत्युलोकांत वास करण्यास आलें आहें, अ-शी दिसतें. माझ्या नेत्रांत जी एका प्रकारची तेजाची दीप्ति दिसते, त्यावरून त्यांनीं अशी कल्पना बांधिली कीं, यक्षाची बाधा असल्यानेंच माझे नेत्र असे विलक्षण देदीप्य-मान दिसत आहेत.

"असो. अशा रीतीनें तीन संवत्सर अतिक्रांत झाले ह्मणून मीं आतांच महाराजांस निवेदन केलें. या तीन संवत्सरांत शिशुनाग प्रधानानें पूर्वीप्रमाणें आपलें वर्चस्व चांगलें स्थापित केलें. या तीन संवत्सरांतच स्वराज्यांत नानाप्रकारचीं विघ्नें उत्पन्न होऊन राज्यास अपाय झाला असता, परंतु तो केवळ सेनेच्या दक्षतेनें स्थिरावला होता. जिकडे तिकडे अन्याय,

छल, घातपात व निंद्य कर्में चाललीं होतीं. प्रजाजनांचीं मनें अत्यंत क्षोभित झालेलीं होतीं. लवकरच राज्य रसातळास जाईल, अशीं चिन्हें स्पष्ट दिसत होतीं. माझ्या पित्याचें मन उद्विग्न होऊन तो राज्यप्रकरणांत तिळमात्र लक्ष पोंहोचवीत नसे. प्रधान जाणें, आणि प्रजा जाणें. त्याला कायतें समाधान वाटण्यास जागा ह्मटली ह्मणजे देवी अंबेची संगति, व आह्मी दोन मुली. रात्रंदिवस त्याचें चित्त अस्थिर असल्यानें त्याचें सर्व लक्ष आह्मां त्रिवर्गावर असे. प्रजाजन जरी त्याला या समयीं दुष्ट राजा, कृतघ्न राजा, अशीं निंदात्मक विशेषणें देत असे, तरी तो पति आणि पिता या नात्यानें माझ्या मातेस व आम्हां उभय भगिनींस फारच ममतेनें वागवीत असे. शेवटीं प्रजाजनांचीं मनें क्षुब्ध होऊन अनिवार होत चाललीं. ते ह्मणूं लागले कीं, 'आमच्या स्वामीला फिरून आणखी कशाची तरी बाधा झाली. पूर्वीं मदनबाधा होऊन दोन संवत्सरें स्वामीनें ऐषआरामांत घालविलीं. परचक्र आल्यानें एकदम नेत्रपटलांवरची धुंदी दूर झाली, व कांहीं नियमित काल पावेतों त्यानें राज्य चांगलें केलें; परंतु फिरून आतां त्यास आकाबाईनें सर्वस्वी घेरलें आहे, व आतां पूर्वीप्रमाणें जरी तो विषयांध नाहीं, तरी पण लोककल्याणाकडे त्याचें यत्किंचित् सुद्धां चित्त नाहीं. दोन कन्या झाल्या त्यांत एक त्यानें देवीसच अर्पण केली, व एक यक्षास अर्पण केलेली आहे.—या सर्व गोष्टी प्रजाजनांच्या कानांवर गेलेल्या होत्या. अशा रीतीनें जिकडे तिकडे चळवळ सुरू झाली होती. सकल प्रजाजनांचीं मनें यासंबंधानें अत्यंत क्षोभायमान होऊन सर्वच लोक प्रधानाच्या नाशाची व राज्यांत घडामोड करण्याची बकाप्रमाणें संधी पहात होते. इतक्यांत समयास उचित् असा एक विल-

क्षणं प्रकार घडून आला, व धुमसत असलेल्या अग्नीनें एकद्-म पेट घेऊन वन्हिज्वाला अंतराळीं जाऊं लागल्या.

" एके दिवशीं सायंकाळचे समयीं फल्गु नदीमध्यें कितीएक धीवरांनीं मत्स्य धरण्याकरितां जाळीं पसरलीं होतीं. त्यासमयीं एका जाळ्यांत एक मोठा मत्स्य गुंतून आला, असें त्यांस वाटून बाहेर काढून अवलोकन करतात तों, मत्स्य नसून ती एक मोठी थोरली पेटी होती. त्या पेटींत पाहिलें तों छिन्नभिन्न झालेले मनुष्याचे शरीराचे अवयव दिसले, व त्यास दुर्गंध येत होता. फल्गु नदीला हें शव अर्पण केल्यास जरी तीन संवत्सर होऊन गेले होते, तथापि त्या शवाचें अस्तित्व बरेंच कायम राहून त्याचा जितका नाश व्हावा तितका झाला नव्हता. धीवरांनीं तें अस्थियुक्त शव उचलून राजनगरींत आणिलें. शतशः लोक तें प्रेत पाहण्यासाठीं जमले, व सर्वांची अशी खातरी झाली कीं, हें भयंकर कृत्य नुकेंच घडून आलें असावें व त्यांनीं यासंबंधानें शिशुनाग प्रधानावर दोषारोपण केलें. त्यांचा क्रोध अनिवार झाला, व सर्वांनीं तें प्रेत उचलून राजवाड्यांत आणिलें, तेव्हां हजारों लोकांची राजवाड्यासभोंवतीं एकच गर्दी झाली.

" यासमयीं माझा पिता, देवी अंबेस बरोबर घेऊन राजवाड्यासन्निध असलेल्या पुष्पवाटिकेंत स्वच्छंदानें बसला होता. आह्मीं उभयतां भगिनी त्यांच्या सन्निध क्रीडा करीत होतों. सहस्रशः लोकांनीं एकाएकीं केलेला कोलाहलध्वनि मेघगर्जनेप्रमाणें आमच्या कर्णीं पडला, व पुष्कळ सेवकजन अति त्वरेनें राजाकडेस येऊन सांगूं लागले कीं, नगरवासीजनांनीं मोठा आकांत मांडिला आहे; त्यांनीं राजवाडा वेष्टिलेला

आहे. सेवकजन असें हें भयोत्पादक वृत्त निवेदन करीत आहेत नाहींत तोंच, दुसरे परिचारक येऊन भयग्रस्तहोत्साते सांगूं लागले कीं, राजवाड्यांत सतत शांतता ठेविण्याकरितां ठेविलेले संपूर्ण सैनिक लोक या दंग्यांत जाऊन मिळाले. माझ्या पित्यानें या प्रसंगीं धैर्य सोडलें नाहीं. तो तसाच आह्मांस व आमचे मातेस सांगातीं घेऊन, ज्यांचीं मनें या-समयीं अत्यंत खवळून गेलीं होतीं, अशा त्या लोकांकडे ये-ण्याकरितां निघाला. माझी माता जरी यासमयीं भीतीनें अगदीं गर्भगलित झाली होती, तरी आपल्या पतीवर व आपल्या बालकांवर कोणतेंही अरिष्ट आल्यास त्याचें निरसन करण्यास्तव जिवापाड संकटें भोगण्यास ती अगदीं तत्पर होती. देवांगनेची करांगुली तिनें आपल्या हातांत धरिली व माझी माझ्या पित्यानें आपल्या हातांत धरिली आहे, असे आह्मी चौघेजण राजवाड्यांत येऊन पाहतों तों राजवाड्याच्या सभामंडपाच्या पटांगणांत सहस्त्रावधि लोकांनीं एकच कल्होळ मांडिला आहे. चित्ररथास राणी अंबेच्या समवेत व आह्मा उभयतां अर्भकांसहित पाहतांच, क्षुब्ध झाले-लीं त्यांचीं मनें किंचित् शांत झालीं. इतक्यांत त्यांच्यापैकीं जे कित्येक धुरीण होते त्यांनीं त्या पेटींत असलेल्या शवाचे तुकडे आणून माझ्या पित्याच्या पायांपाशीं ओतले, व मो-ठ्यानें गर्जना करून 'हें नीच कृत्य शिशुनाग प्रधानानें केलें असावें, व याकरितां त्यास देहांत प्रायःश्चित्त देण्याची आह्मांस आज्ञा द्या,' असें ते प्रमुख ह्मणूं लागले. ते छिन्न-भिन्न झालेले प्रेताचे तुकडे पाहून, मी व देवांगना इतक्या भयाभीत झालों कीं, आम्हीं आपल्या मातेच्या कुशींत आपलीं मुखें घातलीं. मी त्यासमयीं जरी केवळ तीन वर्षांचीच होतें

तथापि तो भयंकर प्रकार अजून माझे हृदयांत पूर्णपणें जागृत आहे. त्याचप्रमाणें माझ्या पित्याचें मुखकमल त्या समयीं कसें निस्तेज दिसत होतें, त्याची पूर्ण प्रतिमा माझ्या हृदयांतून अजून तिळमात्र नष्ट झाली नाहीं. मजला अद्याप असें भासतें कीं, जणूं काय हा सर्व प्रकार नुकाच घडून आलेला आहे ते छिन्नभिन्न झालेले अवयव पाहून माझ्या पित्यानें भीतिग्रस्त होऊन एकाएकीं मोठ्यानें किंकाळी फोडली. हें पाहून माझ्या मातेनें आपल्या भ्रताराच्या कंठास मिठी मारिली, व आह्मीं उभयभगिनींनीं तिचेंच अनुकरण केलें. भीति, शोक आणि निराशा, हीं सर्व यासमयीं जागृतावस्थेंत दृग्गोचर होऊं लागलीं.

" हा भयोत्पादक आणि हृदयद्रावक देखावा फार काल टिकला नाहीं. माझ्या पित्याच्या मनाची शुद्धि नष्ट झाली, व तो एकाएकींच सत्य प्रकार काय आहे, तें सांगूं लागला. ' हर । हर ! परमेश्वरा, माझ्या अपराधांचें तूं मला योग्य शासन दिलेंस. हें, गुरुवर्य दयानंदसरस्वतीचें शव आहे. त्या सद्गुणी वृद्ध मनुष्याचा घात '— त्याच्या मुखांतून आतां सत्य प्रकार बाहेर पडणार तोंच माझ्या मातेनें दीर्घस्वरानें चित्ररथाच्या नांवानें हाक फोडून ती भूमीवर निचेष्ट पडली.

" आतां अधिक वर्णन करण्यास माझी जिव्हा वळत नाहीं. एकामागून एक काय गोष्टी घडून आल्या व मनामध्यें भिन्न भिन्न तरंग कसे उद्भवत गेले, याचें मला चांगलेसें स्मरणही नाहीं. गुरुवर्य दयानंदसरस्वतीचा प्राणघात यक्षानें केला, व यक्षाला मी काय वचन दिलें होतें, यासंबंधें साकल्य वर्तमान दुःखित अंतःकरणानें तो प्रजाजनांना निवेदन करणार होता, परंतु माझ्या मातेच्या मूर्च्छेनें हें सर्व कृत्य जेथल्या तेथेंच रा-

हिलें. चित्ररथानें गुरुहत्या केली, ब्रह्महत्या केली, असा सर्वांचा ग्रह झाला. पुढें काय झालें तें मला स्मरत नाहीं. एवढें मात्र स्मरतें कीं एक मुहूर्तांत माझ्या पित्याला राज्यपदच्युत करून गुरुहत्या केल्याचा त्याच्या माथीं आरोप ठेवून, त्यास प्रजाजनांनीं राज्यांतून काढून दिलें.

" ज्याची एकनिष्ट स्वामिभक्ति आहे, असें कांहीं परिमित परिचारक समागमें घेऊन, माझा पिता अतित्वरेनें आंध्र देशाच्या मार्गानें ह्मणजे माझ्या मातेच्या पित्याच्या राज्यांत जाऊं लागला. आह्मी सर्वांनीं वेषांतर केलेलें होतें, अशाकरितां कीं, कदाचित् वीरबाहूचे लोक आपणास मार्गावर गांठून धरून नेतील; परंतु हें आमचें वेषांतर दीर्घकाल टिकलें नाहीं. माझ्या पित्याचा परमद्वेष्टा अधिकारगर्वानें मत्त झालेला, वंगदेशाधिपति जो वीरबाहु त्याच्या निवडक लोकांनीं आह्मांस लवकरच गांठलें. त्यांनीं माझ्या पित्यास बंदिजनाप्रमाणें आपल्या स्वामीकडे धरून नेलें. माझ्या मातेनें पतिसमागमें जाऊन दुःखाची वांटेकरीण होण्याविषयीं आपली अगदीं पराकाष्टा केली, परंतु त्या दुष्ट राजाच्या अधम लोकांनीं तिला त्याच्या समागमें जाऊं दिलें नाहीं. वंगदेशास नेल्यावर माझ्या पित्यास कारागृहांत टाकलें. माझ्या मातेनें आपल्या पित्याच्या राज्याचा मार्ग धरिला. देवांगना व मी हाच कायतो आतां सुखाचा ठेवा, असें जरी ती आपल्या मनांत समजत असे, तरी पतिवियोगजन्य दुःख तिला अगदीं अनिवार झालें. तिला वाटे कीं, आपलें कुटुंब नष्ट दशेस पावलें, आपल्या नांवास कालिमा लागली, व ह्या ज्या प्रचंड उलाढाली होत आहेत, हीं सर्व कृत्यें त्या यक्षाचीं आहेत व आह्मी फार हतभागी मुलें आहोंत. देवांगना ही जरी देवीस अर्पण केली होती, तथापि

तिला सुद्धां त्या यक्षाची बाधा आहे, असें तिला वाटे. या सर्व विचारांनीं तिचें मन उद्विग्न होऊन ती भ्रांतिष्ट होत चालली. अशा स्थितींत आंध्र देशास ती आपल्या पित्याच्या घरीं येऊन पोहोंचली. तेथें पोहोंचल्यानंतर आमच्या जिवांत जीव आला, व वंगदेशाला चित्ररथाची मुक्तता द्रव्यार्पण करून व्हावी ह्मणून, दूत पाठविले. माझी माता मोठी आशा धरून त्या दूतांची, ते मोठें आनंदाचें वर्तमान आणतील, म्हणून मार्गप्रतीक्षा करीत होती. तिच्या मुखावर जी खिन्नता प्राप्त झाली होती, ती कांहीं केल्या नष्ट होईना. हा तिच्या मनास मोठा हृद्रोग उत्पन्न झाला, कीं, ज्याच्या योगानें ती दिवसेंदिवस क्षीण होत चालली.

“ बराच काल अतिक्रांत झाल्यावर एके दिवशीं ते दूत आनंदाचें वर्तमान घेऊन परत आले. पाठविलेल्या सुवर्णमुद्रांचा वीरबाहूनें स्वीकार करून, माझ्या पित्याची कारागृहांतून मुक्तता केली. माझा पिता दूतांच्या समागमें येऊन त्यानें देवी अंबेस प्रेमालिंगन दिलें, व नेत्रांस अश्रु आणून मोठ्या ममतेनें आह्मां उभयतांचीं मुखें कुरवाळून, त्यानें आमचीं चुंबनें घेतलीं. या गोष्टीस एक संवत्सर लोटलें. माझ्या मातेची प्रकृति दिवसेंदिवस घसरत चालली. चित्ररथ चिंतेनें अगदीं ग्रस्त होत चालला. आंध्रदेशाधिपतीनें या उभयतांची अशी स्थिति पाहून, त्याचें अंतःकरण पितृवात्सल्यानें व दयेनें अगदीं आर्द्र झालें. यासमयीं त्याचा वृद्धापकाल झाला होता. त्यास आपली कन्या अंबा अगदीं जिवापाड आवडत असे. गुप्त रीतीनें त्यानें एक प्रचंड सेना तयार केली, व एकेसमयीं चित्ररथास समागमें घेऊन, त्याला ती दाखवून मोठें आश्चर्यभरीत केलें.

यासमयीं त्यानें आपल्या लाडक्या कन्येसही समागमें नेलें होतें. तो प्रचंड सेनासमूह दाखवून तो ह्मणाला 'चित्ररथा ही संपूर्ण सेना तुझी आहे. तूं यांचा स्वामी हो. यांना घेऊन तूं मगधदेशास त्वरित जा, व आपलें राज्य पुनः हस्तगत करून घे.' उभयतां पतिपत्नींच्या अंतःकरणांत हें ऐकून आशेचे अंकुर उद्भवले. त्यांचीं तेजहीन मुखकमलें आतां प्रफुल्लित दिसूं लागलीं. नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले, आणि दिवसानुदिवस माझीं मातापितरें चांगलीं सतेज व सशक्त होत चाललीं.

"या गोष्टीस मासपक्ष लोटला नाहीं तोंच, माझे पित्यास फिरून सर्व सैन्य घेऊन मगध देशावर जाण्याची शक्ति आली. आह्मां उभयतां भगिनींस त्यानें सप्रेमांतःकरणानें पोटाशीं धरिलें, व आपल्या कांतेची नानाप्रकारें समजावणी करून तिला त्यानें आणखी कांहीं दिवस तेथेंच आपल्या पित्याच्या गृहीं काढण्यास सांगितलें, व आपण सकल सेना घेऊन मगधदेशावर चालता झाला. यासमयीं मगध देशांत दोन तट झाले होते; एक पक्ष शिशुनागादिक प्रधान मंडळाचा, व दुसरा जे देशाभिमानी होते त्यांचा. या उभय पक्षांत कलह माजलेला पाहून वीरबाहूनें हा चांगला प्रसंग आहे असें मनांत आणून, प्रचंड सेना समागमें घेऊन, मगधदेश हस्तगत करून घेतला, व सर्वत्र आपली सत्ता बसवून टाकिली. या धांदलींत शिशुनाग प्रधान प्राणास मुकला. आतां चित्ररथास वीरबाहूबरोबर पुनरपि युद्ध करण्याचा प्रसंग आला. दोन संवत्सरपावेतों उभय पक्षांचें युद्ध झालें, अनेक वेळां उभयतां एकमेकांशीं निकरानें लढले, राजगृह नगरीला षण्मास वेढा पडला होता, परंतु अखेर जय आला नाहीं, संपूर्ण सेना त्रस्त झाली. सहस्रशः लोक

प्राणास मुकले, हें पाहून चित्ररथाचें धैर्य सुटलें, व तो शत्रूच्या हातून मोठ्या प्रयासानें आपली सुटका करून घेऊन निराश व हताश होऊन पुनरपि आंध्र देशाला श्वशुरगृहीं आला; आपला पराजय कसकसा होत गेला, हें दुःखकारक वृत्त कथन करण्याचा प्रसंग त्या हतभागी राजावर आला, व पुढें लवकरच तो सर्वतोपरी निराश होऊन, त्यानें हाय! हाय! करून प्राण सोडिला.

"माझ्या मातेस वैधव्य प्राप्त झालें. या अरिष्ट प्रसंगाचें माझ्यानें वर्णन करवत नाहीं. यावेळीं देवांगनेस व मजला चांगलें कळूं लागलें होतें. आमच्या मातोश्रीनें नेहमीं अश्रु ढाळीत बसावें, हें पाहून आह्मी दोघींनीं दीर्घ स्वरानें रुदन करून एकच आकांत करावा. अजून आमच्या दुःखाची परमावधि होणें राहिली होती. आह्मांस अजून चांगली दैन्य दशा प्राप्त होऊन, आह्मी अन्नोदकास महाग झालों नव्हतों. तो प्रसंग आमच्यावर लवकरच येऊन गुदरला. द्रवीड देशाचा राजा हा आंध्र देशाच्या राजाचा प्रथमपासून हाडवैरी होता. त्यानें जेव्हां असें पाहिलें कीं, याची संपूर्ण सेना समागमें घेऊन याचा जामात मगध देशास गेला, व तेथें सकल सेनेचा विध्वंस झाला, आतां आंध्र देशाची राजधानी जी वारंगूळ नगरी, तेथें सेनेची सर्व अव्यवस्था आहे, तेव्हां त्यानें वारंगुळास वेढा घातला. माझ्या मातेचा पिता जो क्षेमधर्म, त्यानें आपली उरलेली सेना बरोबर घेऊन युद्धाची सिद्धता केली; परंतु त्यास अपयश येऊन, तो शत्रूच्या स्वाधीन झाला. त्याची वृद्धावस्था असल्यानें तो लवकरच प्राणास मुकला. वारंगूळ नगरीच्या तटानें बराच कालपावेतों टिकाव धरिला होता; परंतु अनिवार शत्रूंपुढें नाइलाज होऊन, तेथील नागरिक जनांनीं

पळ काढिला. जिकडे तिकडे एकच आकांत झाला. अतोनात रक्तस्राव झाला; रुधिराचे पूर वाहूं लागले; माझ्या मातेचे बंधुवर्ग व त्यांच्या कित्येक तरुण स्त्रिया शत्रूंच्या हातीं सांपडल्या. त्यांचा त्यांनीं फार छल केला. अशा बिकट प्रसंगीं आह्मी त्रिवर्ग आपला जीव घेऊन केवळ एकच विश्वासू परिचारकासह वारंगूळ नगरींतून बाहेर पडलों.

"नंतर आह्मीं सह्याद्री पर्वताचें उल्लंघन करून, महाराष्ट्र देशांत आलों. याच देशांत माझी मातोश्री कां आली व राहिलेलें आयुष्य येथेंच घालविण्यांत तिचा काय हेतु असेल, तें मजला कळत नाहीं. येथें जवळच सुदामी ह्मणून एक खेडेगांव आहे, त्या गांवीं माझी माता गुप्तपणें येऊन राहिली. तिनें आपल्याबरोबर विपुल संपत्ति आणिली होती, त्यापैकीं कांहीं खर्च करून चरितार्थ चालविला होता; परंतु याप्रमाणें सुद्धां आमची स्थिति फार काल राहिली नाहीं. माझी माता दुःखित होत्साती लवकरच स्वर्गवासी झाली, व आह्मी उभयतां अज्ञान मुलीं मागें राहिलों. यावेळीं आमचीं वयें अष्टवर्षांचीं होतीं. आह्मांस या अवाढव्य जगांत ममतेचें ह्मणून कोणी राहिलें नाहीं. ईश्वराची लीला अगाध आहे. आमच्या सांगातीं आलेला तो स्वामिभक्त वृद्ध परिचारक, यानें आह्मांस बरेच दिवस सोबत दिली. आह्मीं द्वादशवर्षांच्या झालों नाहीं तोंच, तोही काळाच्या दाढेंत जाऊन पडला. मरणकाळीं त्यानें आह्मांस आपल्या सन्निध पाचारण करून हें सर्व भयंकर कृत्य निवेदन केलें. माझ्या मातेनें मरणकाळीं त्याला तसें करण्यास सांगितलें होतें. आमच्या पित्यानें मजला यक्षास अर्पण केलें आहे, व देवांगनेस देवीस अर्पण केलें आहे, हें जेव्हां आह्मीं श्रवण केलें, त्यावेळीं आमच्या कोमल मनाची स्थिति काय

झाली असेल, याची महाराजांनींच कल्पना करावी. या अर्पणविधीच्या योगानें माझी मातापितरें आपल्या विमल कीर्तीस, आपल्या राजवैभवास, व शेवटीं आपल्या अमोल्य अशा प्राणांसही मुकलीं. त्याच परिचारकाच्या मुखांतून आह्मां उभयतांच्या वर्णांमध्यें इतका भेद कां आहे, याचें कारण समजलें, व त्याच्याच मुखांतून मला यक्षिणी हें अभिधान कां मिळालें, हेंही समजलें.

" रात्रंदिवस मी चिंतेंत निमग्न झालें. माझी या संकटांतून कोण मुक्तता करील, ह्मणून मीं नेहमीं मनांत झुरत असावें. माझ्याविषयीं माझ्या भगिनीलाही परम चिंता प्राप्त झाली. नंतर मला असा कोणी तरी कैवारी मिळावा, ह्मणून त्याच्या शोधार्थ मी लागलें; कारण महाराजांना त्या यक्षानें केलेलें भाषण स्मरतच असेल. ' तुझ्या कन्येला तारुण्य प्राप्त झालें, आणि ती यौवनाच्या भरांत परम रमणीय दिसूं लागली, ह्मणजे एक क्षत्रिय योद्धा तिच्याशीं निष्पाप बुद्धीनें मित्रत्व जोडण्याचा प्रयत्न करील. नंतर तो तिच्या मुक्ततेप्रीत्यर्थ मजसमागमें दारुण युद्धप्रसंग करील. त्यामध्यें जयापजय येणें हें त्याच्या कृतीवर आहे. यक्षिणीशीं त्यानें ठेविलेल्या वर्तनांत जर लेशमात्र पापबुद्धि असेल, तर तो विजयशाली होणार नाहीं. असें घडून न आलें, आणि जरकरितां तिच्या वयास चतुर्दश वर्षें अतिक्रांत झालीं, तर मग मात्र कोणाचें कांहीं चालावयाचें नाहीं. जो जो राजपुत्र अथवा रणयोद्धा तिच्या प्रीतिपाशांत गुंतला जाईल, त्यास मजसमागमें युद्ध करून मोक्षसदनासच जावें लागेल. चतुर्दश वर्षांचा शेवटचा दिवस संपला कीं, यक्षिणी आपल्या सर्वस्वाला मुकली ह्मणून समज. चतुर्दश वर्षें अतिक्रांत होईपावेतों जर करितां तुझ्या कन्येच्या वतीनें

कोणीच रणयोद्धा माझ्याशीं संग्राम करण्यासच आला नाहीं, तर मग ती सर्वस्वीच माझी आहे. नंतर ती आपल्या तेजोमय नेत्रकटाक्षानें अनेक जनांस मोहित करून त्यांचे जीव माझ्या स्वाधीन करील.'

"याप्रमाणें भीषणध्वनि करून त्या यक्षानें भविष्य कथन केलें आहे. येवढ्याकरितांच आम्हीं उभय भगिनींनीं महाराज वज्रदंष्ट्र यांची कृपा संपादन केलेली आहे. अशासाठीं कीं, त्यांच्या सेनाजनांमध्यें कोणी तरी असा योद्धा असेल. सुमारें दोन संवत्सर होत आले, आम्हीं या शोधांत आहोंत. आजपावेतों माझें करग्रहण करण्यास पुष्कळ तरुण पुरुष आले, परंतु त्यांना मी कोण आहें हें समजलें कीं, त्यांचें धैर्य ढांसळून जाई. अशा रीतीनें मासचे मास लोटत आहेत. शेवटचा दिवस सन्निध येत चालला आहे. यक्षाच्या आज्ञेप्रमाणें अजून क्षत्रिय योद्धा—केवळ माझा मित्र—असा माझा कैवार घेऊन यक्षाबरोबर झुंझण्यास मजला मिळाला नाहीं. वज्रदंष्ट्र महाराजांचें आह्मांवर पित्याप्रमाणें प्रेम आहे. ही भयंकर शोकपर्यवसायी कथा त्यांना अवगत आहे. मींच त्यांना ती निवेदन केली. आमच्या कल्याणाप्रीत्यर्थ ते रात्रंदिवस झटत आहेत. आमचा कैवार घेऊन त्यांना स्वतः समर करितां येत नाहीं; कारण मजशीं जें मित्रत्व करावयाचें तें अशाच वीर पुरुषाचे हातून घडलें पाहिजे कीं, मित्रत्व करण्याचे पूर्वीं ज्याला मजसंबंधीं यत्किंचित्सुद्धां वृत्त श्रुत नाहीं, व ज्यानें स्वसंतोषानें आपण होऊन निष्पाप बुद्धीनें मजशीं मित्रत्व जोडण्याचा प्रयत्न केला आहे. महाराज वज्रदंष्ट्र यांचे सेनेंतील लोक माझी मोठी मानमान्यता ठेवितात. अशा तऱ्हेनें चिंतातुर अंतःकरणानें मी आयुष्य क्रमीत आहें. येत्या वैशाख कृष्ण अमावस्येस माझ्या वयाचीं चतुर्दश वर्षें पुरीं होत आहेत.

" अशी मी चिंतेनें अगदीं व्याप्त असतां, एकाएकीं एक वीरपिंड क्षत्रिय योद्धा माझ्या अवलोकनांत आला. ( विनोदानें त्याच्या मुखाकडे अवलोकन करीत ) माझी तर समूळ निराशा होत चालली होती, परंतु इतक्यांत जगन्नियंत्या परमेश्वरास माझी करुणा येऊन त्यानें त्याला पाठविलें. एकेसमयीं सायंकाळीं तो योद्धा महाराज वज्रदंष्ट्र यांच्या सैनागारांत पाहुणचार घेण्यास आला, व तो लागलीच दुसऱ्या दिवशीं आपल्या मार्गानें निघून गेला. निघण्यापूर्वी कांहीं वेळ तो व मी अशीं उभयतां तेथील आम्रराजींत संभाषण करीत उभीं होतों. त्यानें मला 'तुह्मी सुखी आहांतना ?' असा प्रश्न केला. मीं त्यास प्रत्युत्तर केलें कीं, 'महाराज, या जगीं सर्व प्रकारें सुखी असा कोण आहे ?' त्यानें उत्तर केलें, 'हें भाषण ऐकून माझें मन द्विधा होतें.' हें त्याचें भाषण श्रवण करून माझ्या आशेचा अंकुर दृढावत चालला. आमचें संभाषण तसेंच कांहीं वेळ चाललें होतें. इतक्यांत भाषणाच्या सरणींत 'मी आपला केवळ मित्र अथवा परिजन आहें, असें समजावें.' असें मधुर भाषण त्याच्या मुखांतून, त्याला माझी करुणा येऊन, निघालें. माझ्या आनंदास पारावार नाहींसा झाला, व मनांत गांठ बांधिली कीं, माझी मुक्तता झाल्यास याच नरवीरश्रेष्ठाच्या हातून होईल. तथापि त्यानें माझा कैवार घेऊन त्या यक्षासमागमें घोर रणकंदन करण्याची प्रतिज्ञा केली नाहीं. माझे मनांत जो कांहीं गुप्त हेतु होता, तो त्यानें आपले मुखावाटे व्यक्त करून दाखविला. त्यायोगें मी अत्यंत हर्षयुक्त झालें. ज्या रणशूर क्षत्रिय वीरनरवरास परमेश्वरानें मजला साहाय्य करण्यास पाठविलें आहे, जो रणरंगधीर समरभूमीवर निकराचें

युद्ध करून माझी त्या यक्षरूपी कृतांताच्या दाढेंतून मुक्तता करणार---तो वीर अन्यजन नसून आपणच---महाराज सुभटवीर्य, या अभिधानानें माझे सन्निधच बसलेले आहांत."

## घोर प्रतिज्ञा.

यासमयीं मध्यरात्र होण्याचा समय आला होता. पूर्वदिशारूप दरीच्या गर्भांत शयन करणारा चंद्ररूपी सिंह आकाशरूप अरण्यांत प्रवेश करीत बराच वर आलेला होता. यक्षिणीच्या मुखांतून शेवटचे शब्द निघतांच, तिचा कंठ भरून आला, व ती नेत्रावाटे टपटप आनंदाश्रु गाळूं लागली. यासमयीं तिच्या मुखकमलाची शोभा खरोखरीच अवर्णनीय दिसत होती. तुटलेल्या हारांतून मोत्येंच गळत आहेत कीं काय असें ते अश्रुबिंदु तिच्या गालांवरून वस्त्रानें आच्छादिलेल्या स्तनावर पडून त्यांनीं सर्व वस्त्र भिजविलें. चंद्रप्रकाशानें ते अश्रु गालांवर चमकूं लागले. मुखावाटे एक शब्दही न काढितां एखाद्या दैदीप्यमान इंद्रनील मण्याच्या पुतळीप्रमाणें ती सुभटवीर्याच्या मुखांतून आतां काय भाषण निघतें, याची एकाग्रचित्तानें मार्गप्रतीक्षा करीत आहे असें दिसलें. त्यानेंही या मनोरमेकडे पाहून भाषण करण्यास किंचित् विलंब लाविला, अथवा त्यास त्या मनमोहिनीची करुणा येऊन कारुण्यानें हृदय आर्द्र झाल्यानें त्याच्यानें शब्दच काढवेना, असें ह्मटलें असतांही चालेल. एका मागून एक कल्पनातरंगांनीं त्याच्या अंतःकरणांत प्रवेश करून, यक्षाविषयीं मनांत भीति न उत्पन्न होतां तो आपल्या चित्ताचे ठायीं असें ह्मणूं लागला कीं, 'काय त्या यक्षाचा प्रताप आहे कीं, त्यानें हें सौंदर्यरूपी जाळें तरुणजनांना मोह पाडण्यास पसरून ठेविलें आहे ! ! '

**यक्षिणी**०--( कांहीं वेळ गेल्या नंतर नेत्र पुसून ) आज काय महाराजांनीं मौनव्रत धारण केलें आहे काय ? महाराजांचें आणि माझें मित्रत्वाचें नातें जडलें होतें ना ? महाराजांनीं मोठ्या धारिष्टानें भाषण केलें होतें कीं, ' फारतर काय सांगूं, प्रत्यक्ष भूताधिपति जो वेताळ, तोही जरी मज सन्निध येऊन उभा राहिला, तरी त्याच्याबरोबरही युद्ध करण्यास हा सुभटवीर्य सिद्ध आहे.' महाराजांस या भाषणाची विस्मृति पडली काय ? किंवा तें भाषण केवळ आवेशांतच होऊन गेलें, व आतां तें बोलणें फोल झालें ? महाराजांस आपल्या भाषणाचा पश्चात्ताप वाटत आहे काय ? असें जर असेल तर महाराजांनीं मला तसें सांगावें; यांत काळजी करण्याचें प्रयोजन नाहीं. मला आपण दिलेल्या वचनांतून मी आपली मुक्तता करीन. प्रथम ज्या मधुर आणि आवेशयुक्त भाषणानें माझ्या हृदयांतील आशातंतूस दृढता आणिली, तें भाषण महाराजांनीं आपलें परत घ्यावें. आतां पुनरपि आपण उभयतां भेटणारच नाहीं ह्मणजे झालें ( त्याच्या मुखाकडे लक्ष लावून तिर्वक दृष्टीनें पहात )

**सुभट**०--( एकदम अंगांत आवेश येऊन उभा राहून ) स्वाभाविक रीतीनें जरी या माझ्या मुखांतून सत्कार्य करण्यास वचन गेलें असलें, तरी त्या वचनाचा सुद्धां या सुभट वीर्याच्या हातून भंग होणार नाहीं. मग हें तर काय पूर्ण विचार करून दिलेलें. ( तिच्या विशाल तेजोमय नेत्रांकडे सारखें अवलोकन करीत गंभीरपणानें ) यक्षिणी, मी अभिमानभारानें जल्पना करणारा मनुष्य नव्हे. मीं आपल्या मनांत एक मार्ग धरिला आहे, आणि त्याप्रमाणेंच मी आपलें वर्तन ठेविणार. पूर्वीं जरी मीं तुला वचन दिलें नसतें, तरीही त्याच-

प्रमाणें माझें वर्तन तुजबरोबर झालें असतें. असो; आतां इतकेंच सांगतों कीं, पूर्वी जरी वचन दिलेलें नसलें, तरी तें आतां तुझें तें भयंकर कथानक श्रवण केल्यावर देतों. ( तिचा आरक्त पुष्पाप्रमाणें कोमल हस्त हातांत धरून ) होय, प्रथम मित्रत्व करण्याची इच्छा मींच प्रदर्शित केली, व अशा दुःखित तरुण कुमारिकेबरोबर स्नेह असणें, ही मी भूषणास्पद व अभिमानाची गोष्ट समजतों. मी तुझ्या दुःखानें दुःखित झालों, इतकेंच नाहीं, तर तुह्मांस या संकटांतून मुक्त करण्यास्तव या माझ्या जिवाचा मी व्यय करीन. पूर्वीही मीं याचप्रमाणें भाषण केलेलें आहे, व सांप्रतही मी तसेंच करीत आहें. यास हा ( चंद्राकडे बोट दाखवून ) श्रीशंकराच्या शिरावरील प्रत्यक्ष चूडामणि, अथवा तारकारूप मौक्तिकहाराचा श्रेष्ठ भगवान रोहिणीपति चंद्रमा, साक्षिभूत आहे. ( तिच्या कोमल हस्तावर वचन देऊन) हा क्षत्रिय सुभटवीर्य अशी घोर प्रतिज्ञा करण्यास तिळप्राय सुद्धां भीति पावत नाहीं, हें तूं निश्चयात्मक समज. याच्या हातून वचनभंग झाल्यास याचे संपूर्ण पितृगण रौरव नरकास जातील. ( मुखावर वीरश्री उत्पन्न होऊन) त्या यक्षाबरोबर युद्ध करण्यास या जगतीतलावर तुला आजपावेतों कोणी मिळालें नाहीं, त्यास निरुपाय आहे, परंतु आतां तूं ही चिंता सोडून दे. मी तुझा कैवारी आहें. या सकल विश्वाचा प्रतिपाल करणारा, या संपूर्ण भूमंडलाचा उत्पत्तिस्थितिलयकर्ता जो परमेश्वर, त्याच्यावर भरंवसा ठेऊन हा सुभटवीर्य सर्वांगांत कवच धारण करून शस्त्रास्त्रानें सिद्ध होत्साता त्या यक्षाबरोबर समर करण्यास आज्ञा करशील तेव्हां जाईल. ( चंद्राकडे मुख करून ) हे रात्रिनाथा, या माझ्या वचनास सत्यता आणण्यास तूंच समर्थ आहेस.

**यक्षिणी**०—माझे मनाचा ग्रह होऊन चुकला कीं, महाराज वायुपुत्राप्रमाणें बलवान आहेत, परंतु महाराजांना या लीन दासीची सविनय प्रार्थना आहे कीं, महाराजांनीं मजप्रीत्यर्थ आपला जीव संकटांत घालण्यापूर्वी पूर्णपणें विचार करावा, व कोणत्याही रीतीनें, हें मोठें अविचाराचें कृत्य झालें, असें महाराजांना पुढें मागें वाटूं नये.

**सुभट**०—( वीरश्रीयुक्त ) मीं केलेली घोर प्रतिज्ञा स्वर्गांत माझ्या सर्व पितृगणांनीं श्रवण केलेली आहे, आणि यक्षिणी, तूं जरी मला काकुळती येऊन सहस्र वेळां विनवणी केलीस, तरी मी ती मान्य करणार नाहीं. आतां मला पुढें काय कर्तव्य करावयाचें त्याची आज्ञा व्हावी. कोणत्या स्थलीं जाऊन मीं शत्रूची गांठ घ्यावी. ज्या शत्रूनें तुझ्या संपूर्ण कुलाचा व तुझ्या पित्याच्या राजवैभवाचा विध्वंस केला आहे, त्याच्याबरोबर मीं कोणत्या वेळीं समर करण्यास जावें त्याची आज्ञा होणें.

**यक्षिणी**०—आतां ज्याअर्थी महाराजांचा या कामांत दृढनिश्चय होऊन त्यांनीं घोर प्रतिज्ञाच केली आहे, त्याअर्थी येथून पुढें महाराजांचें वर्तन कसकसें असावें, हें मी सांगतें. ( मुखावर कृतज्ञता, आश्चर्य व प्रेमाविर्भाव पूर्णपणें होऊन ) हें कृत्य अतिभयंकर असून यांत पंचप्राण संकटांत पडणार आहेत. मीं आपला वृत्तांत निवेदन करीत असतां महाराजांस सांगितलेंच आहे कीं, शेवटीं जेव्हां माझ्या पित्याची व यक्षाची भेट झाली त्यावेळीं तो यक्ष पुष्कळ वेळपावेतों चित्ररथाबरोबर भाषण करीत होता. तें भाषण किंनिमित्त होतें, यासंबंधें मीं महाराजांस कांहींच कळविलें नाहीं. तें सर्व भाषण आतां निवेदन करण्याचा समय आहे; कारण यक्षानेंच

सांगितलें आहे कीं, जेव्हां एक क्षात्रिय योद्धा तुझ्या कन्येवर मित्रत्वाचें प्रेम करून मजशीं युद्ध करण्यास सिद्ध होईल, त्या-वेळीं त्या वीरानें आपलें वर्तन कसें ठेवावें, यासंबंधाची साग्र माहिती तूं आपल्या कन्येस ती उपवर झाली म्हणजे कथन कर. सांप्रत तो समय येऊन पोंहोंचला आहे. सुदैवें-करून ( किंचित् हास्य करून ) क्षत्रिय रणधुरंधर, मजला साहाय्य करण्यास सिद्ध झाला आहे. आतां मी काय सांगतें याकडे महाराजांचें अवधान असावें. सर्वांगीं कवच धारण करून मस्तकास शिरस्त्राण घालावें. उत्तम प्रकारचीं वस्त्रें व भाला बरोबर घ्यावा. इतकी सिद्धता झाल्यावर येत्या वैशाख वद्य अमावास्येच्या दिवशीं निशीथ समयीं एक प्रहर रात्र अ-तिक्रांत झाल्यावर महाराजांनीं, कोणत्याही स्थलीं आपलें नि-वासगृह केलेलें असो, त्या स्थलापासून प्रयाण करून पूर्व दिशेकडे जावें. समागमें कोणी परिचारक नसला पाहिजे. हा भयंकर युद्धप्रसंग होणार आहे, यासंबंधाची परिस्फुटता महा-राजांनीं कोणापाशीं करूं नये. अशा रीतीनें पूर्व दिशेला मंद मंद गतीनें अश्वाला गति देऊन मध्यरात्र होण्यास एक घ-टका अवधि होण्याचा समय आला म्हणजे, महाराजांनीं ते-थेंच स्थित व्हावें. त्या स्थलीं महाराजांनीं आपलें मन शांत करून एकाग्रचित्तानें, आपणास यशप्राप्ति व्हावी ह्मणून, पर-मेश्वराची आराधना करावी. असें केल्यानें अश्वा-लाही विश्रांति मिळेल. नंतर सभोंवार पसरलेल्या निबिड अंध-कारांतून शत्रु मौन्यावस्थेंत गुप्तपणानें एकाएकीं प्रचंड वेगानें अश्वारोहण केलेला असा येईल. आतां अधिक निवेदन काय करावयाचें ? परंतु मग त्या समयीं परमेश्वर आपणास विजयी करो ! परंतु—( त्याच्या कर्णाशीं लागून अगदीं मंद

स्वरानें) जरकरितां महाराजांना या प्रसंगीं अपयश आलें, आणि त्या यक्षास विजयश्री प्राप्त झाली–मग–परंतु–मी पुढें कथन करीतच नाहीं–पुढें अति भयंकर परिणाम–हर-हर-( त्याच्या स्कंधप्रदेशीं उभय हस्तांवर आपलें मस्तक ठेऊन स्फुंदस्फुंदून रुदुन करूं लागते )

**सुभट०**—–( तिचे उभय कर आपल्या सव्यहस्तांत धरून वामहस्त तिच्या स्कंधावर ठेवून मोठ्या ममतेनें व अत्यंत प्रितियुक्त भाषणानें–) राजकन्ये–यक्षिणी–एकाएकीं तुझें मन इतकें शोकाकुळ कां बरें झालें ? आतां कां बरें दुःख करावें ? मजपासून कांहीं गुप्त ठेऊं नकोस. आतां मला अगदीं संशयांत ठेऊं नकोस. तुझा मी कैवारी असतांना तूं अशी क्षणोक्षणीं निराश कां बरें होतेस? सांग, सांग.

ती कृष्णवर्णा आपलें मस्तक वर उचलून सुभटवीर्याकडे मंद दृष्टीनें अवलोकन करूं लागली. आपल्या करकमलानें तिनें अश्रु पुसले, त्यासमयीं पूर्वीं जसे तिचे नेत्र किंचित भीतियुक्त दिसत होते, तसे सांप्रत न दिसतां त्यांमध्यें मोहकपणा विशेष दृग्गोचर होऊं लागला. तीं नेत्रकमलें यासमयीं क्षणेक कामातुर झालेल्या नवयुवतीच्या नेत्राप्रमाणें दिसूं लागलीं; परंतु लागलींच त्यांची ती स्थिति नष्ट होऊन त्यांनीं गांभीर्य धारण केलें. तिनें आपला केशकलाप नखाग्रांनीं किंचित् मागें सारिला, व मंद मंद परंतु गंभीर स्वरानें भाषण करूं लागली.

**यक्षिणी**–मी बोलून चालून अबला, अल्पवयस्क. माझें धैर्य गलित झालें, याची महाराजांनीं मला क्षमा करावी. यासमयीं अंगीं धैर्य धारण करणें, हें माझें कर्तव्य आहे; कारण

कीं, परमेश्वरानें मज दीनावर कृपाळू होऊन मला साह्यकारी पाठवून दिला आहे.

**सुभट०**—यक्षिणी, तूं अशी निराश झालेली पाहून मला परम दुःख होतें. परमेश्वरावर तूं आपला पूर्ण भरवसा ठेव, म्हणजे सर्व कांहीं यथासांग घडून येईल. मजविषयीं जर तुझ्या मनांत किंतु उत्पन्न होत असेल, तर तो अगदीं व्यर्थ आहे. या जीवाला ( छातीला हात लावून ) भय म्हणून ठाऊक नाहीं. मी आपल्या हृदयांत भीतीला प्रवेशच करूं देत नाहीं; परंतु आतां कांहीं सांगणार होतीस कीं, दुर्दैवेंकरून मला जर या युद्धांत अपयश आलें, तर काय होईल—याविषयीं तुला जें कथन करणें असेल तें मोकळ्या मनानें कर. तुला सर्वस्वी अभय देऊन तुझा सर्वस्वी कार्यभाग मीं आपल्या प्राणांची आशा न धरितां शिरावर घेतला आहे. इतकेंच नाहीं, परंतु या सत्कृत्याबद्दल मजला परमानंद होत आहे. यासमयीं मजपासून कांहींएक गुप्त ठेऊं नकोस.

**यक्षिणी०**—महाराजांपासून कांहींच गुप्त ठेवण्याचा माझा मनोदय नाहीं, आणि अशा सुहृज्जनापासून मजला संकट लपवून ठेऊन काय कर्तव्य आहे ? पराजयाचें नांव घेतांना माझें संपूर्ण शरीर कंपायमान होऊन जिव्हा शुष्क होते; तथापि महाराजांना मी सांगतेंच. ईश्वराच्या अवकृपेनें जरकरितां आपणास या घोर समरांत जय आला नाहीं, आणि विरुद्ध पक्षीं विजय झाला, तर आपल्यास त्या निष्ठुर यक्षाच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करावें लागेल; अथवा यापेक्षांही भयप्रद सांगण्याचें माझ्या या हतभागीच्या प्रारब्धीं आलें आहे. असें न होईल तर महाराज स्वतःच्या जिवाचे धनी राहिले नाहींत. सर्वस्वी या

देहावर मग त्याचीच सत्ता गहणार. इतकेंच नाहीं, या सुकुमार जिवाला तो उचलून घेऊन, कोणीकडे भयंकर गिरिकंदरीं घेऊन जाईल त्याचा नेम नाहीं. मग या जिवाचे काय हाल होतील ! ! आणि माझा सर्व व्यूह ढांसळून जाईल, याचें मला पराकाष्टेचें दुःख वाटत आहे. (याप्रमाणें हृदय-द्रावक भाषण करून यक्षिणीनें आपलें सर्व शरीर प्रचंडवातें करून एखादी कदली जशी उन्मळून पडते, त्याप्रमाणें सुभटवीर्याच्या अंगावर लोटून दिलें, आणि त्याच्या शरीराचा आश्रय करून त्याच्या स्कंधप्रदेशीं मुखकमल ठेवून दीर्घस्वरानें रुदन करूं लागली.)

**सुभटवीर्य**—( या तिच्या भाषणानें तिळप्राय न घाबरतां अंगांत वीरश्री उत्पन्न होऊन ) अंः! यांत भिण्यासारखें तर मजला कांहींच दिसत नाहीं. अस्तु. अद्यापि कांहीं निवेदन करण्याचें अवशिष्ट राहिलें आहे काय ?

**यक्षिणी**—इतकेंच सांगण्याचें माझ्या मंदभाग्याच्या प्रारब्धीं होतें. आतां कांहीं सांगावयाचें राहिलें नाहीं.

**सुभट०**—( तिच्या अंगावर हात फिरवून तिनें घाबरूं नये ह्मणून ) अशी वारंवार शोकग्रस्त कां बरें होतेस ? तूं जें आतां कथन केलेंस त्यावरून माझें मन यत्किंचित् सुद्धां भीति पावत नाहीं. असे प्रसंग मजवर अनेक वेळां आल्यानें मला त्यांची संवय झाली आहे. तो प्रसंग जरी आतां याच वेळीं मजवर आला असता तरी सुद्धां माझ्या मनानें धैर्य सोडलें नसतें. ( गंभीरस्वरानें ) ज्या दिवशीं हा दारुण युद्धप्रसंग होणार आहे, त्या दिवशीं सारा दिवस शुचिर्भूत राहून परमेश्वरास शरण जा, व या देहाचें रक्षण व्हावें ह्मणून श्री

शंकराची प्रार्थना कर, आणि जरकरितां मला या कामीं यशप्राप्ति झाली, आणि यक्षाचा--

**यक्षिणी**--माझी मनदेवता मला तत्क्षणींच काय परिणाम झाला तें सांगेल. विजयश्रीनें कोणास माळ घातली, अथवा पराजित कोण झाला हें समजण्यास मजला तिळमात्र रही विलंब लागणार नाहीं. महाराजांना सुदैवेंकरून यश मिळो ह्मणजे झालें.

**सुभट**--( सरळ अंतःकरणानें ) तथास्तु. तुझ्या भाषणास सत्यता येवो.

**यक्षिणी**--( करांगुलीनें दर्शवून ) तें गंगेच्या तटाकीं श्रीशंकराच्या देवालयाचें शिखर दिसत आहे, त्या स्थलीं मी त्या दिवशीं सर्व दिवसभर उपोषित राहून सायंकाळचे समयीं सचेल स्नान करून जाईन, व भगवान पिनाकपाणी श्रीशंकर, याची एकाग्रचित्तानें आराधना करीन. मी त्यास अनन्यभावेंकरून शरण जाईन. मी त्याची दीन अनाथ दुःखित दासी आहें, मजवर त्यानें कृपा करून आपल्यास यशप्राप्ति व्हावी म्हणून मी अहोरात्र त्याचा स्तव करून जागर करीन.

**सुभट**०--आणि मजला जर या घोर रणकंदनांत विजय प्राप्त झाला, तर लागलींच मी- मध्यरात्र अतिक्रांत झाल्यावर एक घटिकेनें श्रीशंकराचे दर्शनास त्या स्थलीं येईन. नंतर आपण उभयतां शंकराचें पूजन करून ती रात्र आनंदांत घालवूं; पण जरकरितां मजला अपयश आलें--( मनांत वीरश्री उत्पन्न होऊन ) आपणांस त्याविषयीं सांप्रत विचार करण्याचें प्रयोजनच नाहीं.

**यक्षिणी**--( आपल्या विशाल नयनांनीं केवल अमृतवृष्टीच करीत आहे कीं काय ) तर मग महाराजांची मी आतां

आश्रमीं जाण्यास आज्ञा घेतें. भगवान या देहाला या भयंकर युद्धसंग्रामांत विजयी करो. यानंतर मी जरी महाराजांचे सन्निध नाहीं, तरी माझे प्राण महाराजांच्या सन्निध राहतील. आतां अमावास्येचा दिन येईपावेतों मी महाराजांचें दर्शन घेणार नाहीं, आणि पुढें एकमेकांची भेट होईल किंवा नाहीं, हें सर्व त्या युद्धप्रसंगावर अवलंबून आहे. महाराजांनीं केलेल्या या महदुपकारांबद्दल ही दीन दासी काय उतराई होणार आहे? परंतु तूर्त मी या चरणरजीं अतिलीन होऊन नंतर महाराजांची आज्ञा घेतें, ह्मणजे झालें. ( त्याच्या पायांवर मस्तक ठेविते. )

साष्टांग प्रणिपात करून ती विलोलनयना श्यामांगी तरुणी आतां जाणार, तोंच सुभटवीर्यानें तिचीं उभय हस्तकमलें आपल्या हस्तांत धरून तिजला ह्मटलें, "असें करणें उचित् नाहीं. यक्षिणी, मला हा जीव तुजपेक्षां प्रिय नाहीं." त्याससमयीं नूतन तारुण्य विचारशून्य असल्यानें, व अंतःकरण आवरण्याची शक्ति नष्ट झाल्यानें, मदनानें त्याचें चित्त चंचल केलें, शरीरावर रोमांच उभे राहिले, अंगास घर्म सुटला, व तो आपले श्वेत कमलाप्रमाणें विशाल नेत्र प्रफुल्लित करून प्रीतिपूर्वक त्या सुंदरीचे मुखाकडे अवलोकन करूं लागला. तिचेंही देहमान नाहींसें होऊन मदनाच्या शरपंजरांत सांपडलेलीच काय, अशी ती त्याच्या त्या कामातुर दृष्टींत आकर्षली गेली; परंतु लागलींच गजबजून सावध झाल्याप्रमाणें करून एकदम ती दूर झाली, व आश्चर्ययुक्त होत्साती करांगुली हनुवटीवर ठेवून लज्जायुक्त गांभीर्यानें ह्मणाली, "पण महाराजांचें आणि माझें मित्रत्वाचें नातें आहे, व महाराज माझे कैवारी होऊन युद्धास जाणार आहेत." असें भाषण करून

ती कुरंगनयना, प्रमुदित अंतःकरणानें सौदामिनीप्रमाणें मोठ्या चपल गतीनें निघून गेली, व सुभटवीर्य तटस्थ व आश्चर्ययुक्त होत्साता त्या स्थलीं उभा राहिला.

## प्रीतिदिग्दर्शन.

वर निर्दिष्ट केलेल्या गोष्टीस अर्धपक्ष लोटला. संपूर्ण प्रतिष्ठाननगरी जरी वज्रदंष्ट्र याच्या लोकांनीं व्यापिलेली होती, तरी त्यांनीं कोणाचा घातपात केला नाहीं, किंवा बलात्कारानें प्रजाजनांचीं मनें दुखवून त्यांच्यापासून संपत्ति हरण केली नाहीं. मणिभद्र, चंडवर्मा, व विश्वजित महाराज यांना दुर्गामध्यें कारागृहवासांत टाकिलें होतें. त्याच दुर्गांत वज्रदंष्ट्र महाराज राहिले होते. सभोंवार सैनिकांचा वेढा पडला होता. मुंगीस सुद्धां आंत प्रवेश करण्यास मार्ग नव्हता. जिकडे तिकडे प्रतिष्ठाननगरींत नगरवासीजनांवर चांगला वचक रहावा ह्मणून संरक्षक लोकांची योजना केलेली होती. कारागृहांत वास करणाऱ्या त्रिवर्गांशिवाय जेवढे ह्मणून मोठमोठे सरदार लोक दरबारास आले होते, तेवढ्यांनीं यासमयीं स्वस्थलीं गमन केलें होतें. ते सर्व या समयीं पराभूत झाल्याप्रमाणेंच होते. इतकेंच नाहीं, परंतु कित्येकांचा मानस तर आतां असा झाला होता कीं, आपण वज्रदंष्ट्राचाच पक्ष स्वीकारावा, हा उत्तम मार्ग आहे, व त्याप्रमाणें त्यांचें वर्तन हळू हळू होऊं लागलें होतें.

सारांश, वज्रदंष्ट्र याची सत्ता सर्वत्र चांगलीच बसून गेली होती. लवकरच त्याला राज्याभिषेक होण्याचा वादविवाद चालला होता. याप्रमाणें विशेष प्रयत्न न करितां, किंवा रण माजून काळाच्या दाढेंत सैन्य न पडतां, राजनगरी वज्रदंष्ट्र

याच्या हस्तगत झाली. शत्रूंचीं कारस्थानें तो चांगलीं जाणत होता. युद्धकलेंत तर तो पराकाष्ठेचा निपुण होता हें आमचे वाचक जाणतच आहेत. त्याचें वर्तन नीतीला धरून होतें. विचारशक्ति त्याचे हृदयांत नेहमीं जागृत असे. त्याची फार दीर्घ दृष्टि होती. विद्येच्या योगानें त्याचें मन सुसंस्कृत झालेलें होतें, त्यामुळें त्याच्या हातून सहसा अन्यायाचीं कामें होत नसत. अल्पस्वल्प कामास तो कधीं हात घालीत नसे, परंतु धाडसाचीं कृत्यें करण्यांत तो सदैव अग्रेसर असे. यामुळें त्यास आपल्या जीविताची विशेष काळजी नाहीं, असें वाटे. त्याचें मन निरंतर शत्रु जिंकण्याकडे लागलें होतें. आपल्या शरीरसंपत्तीला न्यूनता येऊं नये ह्मणून; तो स्त्रीजनांस तुच्छ मानीत असे, व तो उपभोगाविषयीं नेहमीं पराङ्मुख असे. तो मनानें मोठा उदार होता. शरणागताचें रक्षण करणारा होता. शत्रुत्वाच्या नात्यानें तो जितका दीर्घ द्वेषी होता, तितकाच मित्रत्वाच्या नात्यानें तो अगदीं जिवाला जीव देऊन वागणारा होता. राज्योपभोगांत कधीं निमग्न न राहतां त्याचें वर्तन अगदीं साधें होतें. या सर्व वर्तनांवरून प्रजाजनांचीं मनें तो लवकरच आपलीशीं करून घेईल असें वाटत होतें. प्रधानमंडळ लवकरच स्थापन करण्याचा त्याचा विचार होता. अस्तु. आतां आपण आपल्या कथानकाच्या मुख्य भागाकडे वळूं.

आमच्या प्रिय वाचकांना स्मरण असेल कीं, सुभटवीर्य हा दरबारांतून विश्राममंदिरांत परत जात असतांना, मार्गांत त्यास सुमतीनें एक व वसुमतीनें एक अशीं दोघींनीं दोन पत्रें आणून दिलेलीं होतीं. त्यांमध्यें एक पत्र यक्षिणीचें होतें; दुसरें पत्र त्यास देवांगनेकडून आलेलें होतें. या दुसऱ्या पत्रांत देवांगनेनें भेटीची इच्छा दर्शविली होती, ह्मणून

माध्यान्हसमयीं सुभटवीर्य प्रतिष्टाननगरीच्या दक्षिणेकडे गंगेच्या तटाकीं जी विशाल उद्यानभुमिका आहे, तिकडे जाण्यास निघाला होता.

या समयीं त्याचें वदन सुप्रसन्न दिसत नव्हतें, व तो उल्हासवृत्तीनें त्या उपवनांत जात आहे, असें वाटत नव्हतें. पूर्वी ज्या ज्या समयीं या उभय भगिनींच्या भेटीस तो जाई, त्या त्या वेळीं त्याचें अंतःकरण आनंदमय असे, परंतु सांप्रत तशी स्थिति नव्हती. असो. लवकरच तो त्या विशाल उद्यानभूमिकेंत शिरला. या समयीं दोनप्रहरचा समय असल्यानें भगवान सविता आकाशपटलाच्या मध्यभागीं आला होता. जिकडे तिकडे शांत भासत होतें. बागेंतील वृक्ष फलपुष्पयुक्त असल्यानें फार शोभिवंत दिसत होते. आम्रमंजरींचा परिमल चोहोंकडे सुटला होता. भ्रमरपंक्ति गुंजारव करीत परागयुक्त पुष्पांतील मधुपान करण्यांत लुब्ध झाल्या होत्या. उष्णाचा दाह या स्थळीं किंचित सुद्धां वाटत नव्हता. ठायीं ठायीं पुष्पवाटिका होत्या. उद्यानभूमिकेच्या सन्निधच नदीतटाक असल्यानें वृक्षांच्या मूलप्रदेशीं आर्द्रता असे, व त्यामुळें ते नेहमीं प्रफुल्लित दिसत असत. सुभटवीर्य क्षणमात्र बागेची शोभा पाहून तसाच गोदावरीच्या सान्निध जाऊन एका कदंबवृक्षाच्या छायेंत हरित तृणांकुरावर स्वस्थ विश्रांति घेत बसला.

सुभटवीर्य आश्चर्यभरित होत्साता बागेंतील शोभा पहात होता, परंतु असें करण्यास त्यास विशेष अवसर मिळाला नाहीं. त्याच्या पार्श्वभागींच्या वृक्षराजींतून एखाद्या वनदेवतेप्रमाणें देवांगना बाहेर आली, हें सुभटवीर्याच्या ध्यानांत आलें नाहीं, कारण ती हंसाप्रमाणें मंद मंद गतीनें चालत होती. सस्मित वदन करून ती अगदीं सुभटवीर्याच्या पृष्टभागास-

न्निध उभी होती. या समयीं तिचें तें परम तेजस्वी मुखकमल प्रफुल्लित असून सूर्यप्रकाशानें केवळ स्वयंप्रकाशितच दिसत होतें. तिचे कृष्ण कुंतल नितंब भागापर्यंत पसरले होते, व त्यांस लाविलेल्या सुगंधित द्रव्यांचा परिमल सर्वत्र पसरला होता. तांबुल भक्षण केला असल्यानें त्याची रक्तिमा सर्व मुखकमलावर येऊन ओष्ठप्रांत सुरंग रंगीत दिसत होता. क्षणमात्र ती चारुगात्री कांहीं एक भाषण न करतां लज्जावश होऊन अधोवदनानें या वीर पुरुषाकडे अवलोकन करीत त्याच्या पार्श्वभागीं उभी राहिली. नंतर तिनें मंजुल स्वरानें "महाराज" असें ह्मटलें. त्यासरसा सुभटवीर्य दचकून मागें पाहूं लागला, तों ती पद्माक्षि उभी आहे. तिला पाहतांच त्यानें उत्थापन दिलें, व विचारलें कीं, "आपण आल्याचें मला कळलें नाहीं, नाहीं तर या जनाकडून असा प्रमाद घडून आला नसता. आपण केव्हां आलां ?"

**देवां०**---असें भाषण महाराजांनीं मुखावाटे काढूं नये. महाराजांकडून तर प्रमाद झालाच नाहीं, परंतु माझ्याच हातून प्रमाद घडून आला, कीं मीं महाराजांस येथें तिष्ठत बसविलें. मी आतांच आलें. (संकोचित वृत्तीनें कांहीं वेळ स्तब्ध राहून) गेल्या वैशाख शुद्ध सप्तमीस महाराजांचें दर्शन झालें होतें. त्या समयीं मी एकाएकीं महाराजांची आज्ञा न घेतां निघून गेलें, त्यायोगें महाराजांचा मजवर रोष झाला असेल; परंतु अशा प्रकारें निघून जाण्यांत माझा हेतु काय होता, तो सांप्रत महाराजांस कथन करावा, असा विचार करून आलें आहें.

**सुभट०**---आपण केव्हां निघून गेलां, हें माझ्या ध्यानांत आलें नाहीं, त्यामुळें माझें मन अगदीं उद्विग्न झालें. मी मनां-

त विचार करूं लागलों कीं, राजकन्येला मीं का भाषणानें दुखविलें ? किंवा माझ्या उद्दाम वर्तनानें तिची मानखंडना झाली ? किंवा मी स्नेह करण्यास अयोग्य जन आहें ? किंवा झालें तरी काय ? हें कांहींच मजला समजेना. एरवीं परमेश्वरसाक्ष माझ्या मनांत तर आपल्याविषयीं कोणत्याही प्रकारें अशी भावना नव्हती; परंतु सहजरीत्या भाषणाच्या ओघांत कदाचित् अपमान—

**देवां०**—( सलज्ज व तिर्यक दृष्टीनें मोठ्या प्रेमयुक्त वाणीनें ) काय ? अपमान ? आणि तो महाराजांच्या हातून ? हीं कल्पना सुद्धां नको. क्षणमात्र महाराजांनीं येथें बसावें ह्मणजे मी माझ्या जाण्याचें कारण सांगेन. ( लज्जेच्या योगानें भूतलाकडे निश्चल नेत्रानें पाहून ) कन्याजनांस योग्य जें चांचल्य तें चित्तास अजून प्रवृत्त करीत नाहीं. बालत्वामुळें मला लाज वाटते. परंतु मी सांगतेंच.

असें भाषण झाल्यावर तीं उभयतां गोदावरीच्या तीरीं शिलातलावर बसलीं. तिच्या मुखाकडे पाहून ती विशालाक्षी आतां काय भाषण करणार आहे, याविषयीं तर त्यानें तत्काल जाणिलेंच. कुमारीजनांनीं असें अप्रबुद्ध भाषण करणें हें त्यास क्षणमात्र आवडलें नाहीं.

**देवां०**—( भूतलाकडे दृष्टि देऊन सस्मित वदनानें ) यक्षिणीशीं अथवा मजशीं महाराजांचा परिचय होऊन अल्पकाळच लोटला आहे. एवढ्या अल्पकाळांतच महाराजांनीं आह्मांसंबधीं सर्व वृत्तांत अवगत करून घेतला. आतां हा वृत्तांत श्रवण करून मनाची खातरी झाली असेल कीं, आमचीं चरितें अन्यस्त्रियांच्या चरित्रांपेक्षां किती चमत्कारिक असून, तीं किती नानाविध रसांनीं परिपूरित आहेत ! यक्षिणीनें म-

हाराजांस आमचें जन्मवृत्त निवेदन केलें तें वृत्त किती भयानक आहे ? त्यामध्यें, आमच्या प्रारब्धीं क्लेश कसे भोगावयाचे होते ? आतां मात्र माझ्या भगिनीचा कृष्णवर्ण कशानें झाला, आणि माझा गौरवर्ण कशानें झाला, अथवा इतर स्वरूपवैचित्र्य, व स्वभाववैचित्र्य तिजमध्यें व मजमध्यें कशानें झालें, हें महाराजांनीं चांगलेंच जाणलें असेल. प्रस्तुतची आमची स्थिति अन्यत्र राजकन्यांप्रमाणें मुळींच नसून आह्मी उभयतां अहोरात्र काळजीनें ग्रस्त झालेल्या आहोंत. या भूतलावर आमच्याप्रमाणें संकटांत पडलेली राजकन्या एक तरी सांपडेल काय ? वारंवार संकटें आल्यानें आमच्या मनोवृत्ति आतां दृढतर होऊन बसल्या आहेत. कसेंही अपरिहार्य संकट उद्भवलें, तरी आह्मीं तिळमात्र डगमगत नाहीं. तस्मात्–ही कांहीं गर्वोक्ति नाहीं परंतु–आमची गणना साधारण स्त्रीजनांत होण्यासारखी नाहीं, अथवा आमच्याशीं अन्य स्त्रियांची अथवा कन्याजनांची तुलनाही करणें व्यर्थ होय. ( त्याच्या मुखकमलाकडे पाहून ) कां मी ह्मणतें, हें सत्य आहे कीं नाहीं. ?

**सुभट॰**––यांत काडीमात्र संदेह नाहीं, आणि इतकीं भयंकर संकटें येऊन कुमारीजनांस अनुचित्, असें वर्तन तुह्मां उभयतांकडून तिळमात्र झालें नाहीं, ही अत्यंत आश्चर्याची गोष्ट आहे.

**देवी॰**––( किंचित् हास्य करून ) महाराजांचे बोलण्याचा भाव मीं जाणिला; आणि महाराजांची एकांतीं भेट घेणें, हेंच जर केवळ या जनांकडून अनुचित् वर्तन घडत असेल, तर मीं महाराजांचा निरोप घेतें. महाराजांचें आह्मांवर एक प्र-

कारचें ममत्वाचें प्रेम असल्यानें, हा जन इतक्या मोकळ्याम-नानें भाषण करीत आहे. आम्हीं उभय भगिनींनीं महाराजां-पासून गुप्त असें आतां कांहींच ठेविलें नाहीं. मजसंबंधीं मा-त्र साग्र वृत्तांत अजून महाराजांस निवेदन केला नाहीं, तो मी आतां सांगतें, याकडे अवधान असावें. माझ्या भगिनीनें महाराजांस सांगितलेंच आहे कीं, मजला माझ्या जन्मदात्या आईबापांनीं देवीस अर्पण केलें आहे. त्याप्रमाणें श्रीअंबे-ची आजन्म एकनिष्ठ सेवा करून या देहाचें सार्थक्य करावें, सर्व आयुष्याचे दिवस कौमार्यावस्थेंतच घालवावेत, वैराग्य-दीक्षा धारण करून स्वकीय आप्तजनांचा त्याग करावा, संसार विषतुल्य मानून जीवित अल्पकाळ राहणारें आहे असें जाणा-वें, यौवनास झुगारून देऊन तारुण्यवस्थेस तुच्छ मानावें, सौंदर्याभिमान क्षणिक आहे असा मनाचा ग्रह करून मी खडतर तपश्चर्येचीच सिद्धता करणार होतें, मनाचा तसें कर-ण्याचा निश्चय होऊन गेलाच होता, आणि तो कदापि फिर-लाही नसता, परंतु एकाएकीं कांहीं विलक्षण प्रकार घडून आला, त्यामुळें या सर्व गोष्टी जागच्या जागींच राहिल्या; त्यामुळें मन अस्थिर झालें, मनाचे विवेकरूपी दृढबंध शिथिल झाले, आणि हा सर्व प्रकार देवी मातेच्या अनुज्ञेप्रमाणें होत आहे, त्यामुळें मनास वाईट वाटत नाहीं.

**सुभट०**—(मोठ्या आश्चर्यानें) असा विपरीत प्रकार को-णता घडून आला कीं, ज्याच्या योगानें या संसारव्यथेंतून मुक्त होण्याच्या मार्गाचें आपण अवलंबन करणार असून आतां त्या मार्गाचा परित्याग करावा, असें आपणास वाटलें ?

असा प्रश्न करितांच ती तरुणी किंचित् स्तब्ध राहिली. लज्जावश होत्सातो क्षणमात्र तिच्यानें बोलवलें नाहीं. यास-

मयीं तिच्या मुखकमलाची कांति अत्यंत देदीप्यमान दिसत असून तिचे विशाल नेत्र चंचल झाले होते. तिनें आपल्या कोमल हस्तानें आपले कृष्णकुंतल मागें सारले, व वक्र दृष्टीनें सुभटवीर्याच्या मुखाकडे पाहूं लागली. त्यावेळीं तिला असें दिसून आलें कीं, आपल्या भाषणानें याचें मन गर्क होऊन आपला वृत्तांत ऐकण्यास हा मोठा आतुर झाला आहे. हें पाहून ती हर्षभरित झाली. क्षणमात्र दंतपंक्तीची प्रभा ओष्ठप्रांतावर दृग्गोचर होऊं लागली. उरोज भाग लज्जेनें व भीतीनें वारंवार उंच सखल होऊं लागला. सुभटवीर्यानें तिच्या स्तब्धतेविषयीं पुनरपि प्रश्न केला; तेव्हां ती लज्जेनें व्याकूळ होऊन अधोमुख करून भाषण करूं लागली, कीं ज्याच्यायोगानें प्रीतिदिग्दर्शन चांगलेंच होऊं लागलें.

देवां०---महाराज मोठ्या कौतुकानें माझा वृत्तांत श्रवण करीत आहेत, व तो ऐकण्यास परम उत्सुक झाले आहेत; परंतु मला लज्जेमुळें कथन करण्यास संकोच वाटत आहे. तथापि मी सांगतेंच.---अशा प्रकारें माझा निश्चय झाला असतां, व मी आतां सकल सुखोपभोगाचा त्याग करून पाशुपतदीक्षेचें धारण करणार, तोंच मजला त्या रात्रीं दृष्टांत झाला. तो दिवस पौर्णिमेचा होता. मध्यरात्र उलटून गेलेली होती. भगवान् रोहिणीकांत नीलवर्ण आकाशांत रोहिणीसमवेत फारच सुशोभित दिसत होता. त्याची प्रभा सर्वत्र पडल्यानें अंधकार अगदीं नाहींसाच झाला आहे असें वाटत होतें. अशा शांत समयीं मी निद्रावश होत्साती, मंचकावर पडलें असतां, मजला असें शुभ स्वप्न पडलें कीं, जणूं काय चंद्रिकेची प्रभा गवाक्षद्वारांतून माझ्या मंचकावर पडलेली आहे, व त्या प्रभेच्या योगानेंच अत्यंत सुंदर व अनुपम्य अशी एक कन्यका उत्पन्न

होऊन, ती माझ्या मंचकाच्या सन्निध येऊन, तिनें माझ्या मस्तकीं आपला कोमल हस्त ठेविला, व माझ्या मुखाकडे निरखून पाहूं लागली. तिचें सौंदर्य इतकें विलक्षण होतें कीं, ती मजला नगतनया पार्वती असावी, अथवा क्षीराब्धितनया प्रत्यक्ष लक्ष्मीच असावी, असा भास झाला. तिच्या मुखकमलाच्या प्रभेनें माझें संपूर्ण शयनमंदिर प्रभायुक्त दिसूं लागलें. तिच्या मुखाकडे पहातांच माझी दृष्टि दिपून गेली, व मीं नेत्र गच्च मिटले, असें मजला वाटलें. ती मजशीं भाषण करूं लागली कीं, 'हे राजकन्ये, तूं या आपल्या सुकुमार देहाला खडतर तप करून आयास देऊं नकोस. तुजवर माझी पूर्ण कृपा आहे. मातापित्यांच्या अकालीं गमनाचा तूं शोक करूं नकोस. तूं मोठी भाग्यवान् राजकन्या असून, तुझें पाणिग्रहण एक धनुर्धारी येऊन करील, व त्याच्यापासून तुजला संपूर्ण राज्योपभोग प्राप्त होतील. लवकरच, मी सांगतें, हें तुझ्या अनुभवास येऊं लागेल.' इतकें भाषण झाल्यावर देवी जगन्माता अंतर्धान पावली, व मी जागृत होऊन मंचकावर उठून बसलें. वारंवार मी आपल्या मनाशीं, मीं स्वप्नांत काय पाहिलें याचें आश्चर्य करूं लागलें.

इतकें भाषण झाल्यावर देवांगना स्तब्ध होत्साती सुभटवर्याच्या मुखाकडे न्याहाळून पाहूं लागली, तों तो आपलें वृत्त ऐकण्यांत अगदीं तल्लीन होऊन, त्याचें एकाग्रचित्त झालें आहे, असें दिसून आलें. त्याची दृष्टि मंद होऊन, त्यानें ती एका लतापुष्पावर जणूं काय स्थापितच केली आहे, असें दिसलें. तिनें आपल्या करांगुलीनें त्याचे शरीरास किंचित स्पर्श केला, त्यासरसें त्यानें एकाएकीं दचकून तिच्या मुखाकडे पा-

हिलें; तों ती त्यास लज्जा व भय यांनीं युक्त होत्सातीं आप-ल्याकडेस पहात आहे, असें दिसलें.

**देवा०**—महाराजांना राग आला काय ?

**सुभट०**—काय राग ? भलतेंच एखादें ! माझें मन त्या दृ-ष्टांतांत अगदीं गढून गेलें होतें. मजला असें वाटतें कीं, मी जणूं निद्रेंतून एकाएकीं जागृतच झालों आहें. मजला तुमची कथा ऐकून फार कौतुक वाटत आहे ! आपण, पुढें काय झालें, तें कथन करावें.

**देवा०**—या दृष्टांतास एक मास लोटला नाहीं तोंच, महा-राजांची व माझी त्या रात्रीं देवालयांत गांठ पडली; त्या ठि-काणीं महाराजांनीं मजला, व महाराज वज्रदंष्ट्र यांना, प्रचंड मूर्च्छेतून सावध केलें. आतां महाराजांचे ध्यानांत माझें बो-लणें चांगलें आलें असेल. त्या भयंकर रात्रीं कसा प्रसंग आला, हें सर्व महाराज जाणतच आहेत. देवालयांतील सर्व प्रकार महाराजांनीं अवलोकिला आहे, व भाषणें श्रवण केलीं आहेत. तस्मात् त्यासंबंधें द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं. (मंद स्व-रानें अडखळत अडखळत अत्यंत लज्जायमान होऊन) त्या एकांत स्थलीं महाराजांनीं मजला आपले शेल्याचे पदरानें वारा घातला, व मजवर अत्यंत प्रेम आहे, असें दाखविलें. इत-केंच नाहीं, परंतु पुनरपि माझ्या भेटीविषयीं महाराजांनीं आ-पली आतुरता प्रकट केली, आणि महाराजांच्या मनोदयाप्र-माणें वर्तन ठेवण्याचें मीं अनुमोदन देतांच, महाराजांस मोठा आनंद झाला. महाराजांनीं मोठ्या कष्टानें त्या वृक्षराजींतून शयनस्थलाकडे जाण्यास माझा निरोप घेतला. हें सर्व महारा-जांचें माझ्याशीं घडलेलें वर्तन पाहून, माझ्या मनांत तो जग-न्मातेनें दिलेला दृष्टांत वारंवार येऊं लागला. नंतर महाराजां-

ची व माझी पुनरपि येथें गांठ पडली. त्यासमयीं काय भाषणें झालीं हीं लक्षांत असतीलच ?

**सुभट०**---हां, 'आपली गांठ घेतली याबद्दल मजला किंचित् पश्चात्ताप उत्पन्न झाला,' असें बोलून दाखविल्याचें मला स्मरत आहे. हें मजकडून मोठें धाडसपणाचें वर्तन घडून आलें, आणि असें होण्याचें कारणही मीं त्यावेळीं सांगितलें कीं, 'मजला एका अन्य स्त्रीची भेट घेणें आहे' म्हणून.

**देवां०**---आणि नंतर महाराजांची मी जाण्यास आज्ञा मागूं लागलें, त्यावेळीं महाराज मजला थांबण्याविषयीं अधिक अधिक आग्रह करूं लागले, व ह्मणूं लागले कीं, 'जरी मजला, पश्चात्ताप झालेला आहे तरी मी आनंदसमुद्रांत पोंहत आहे.' या भाषणानें मजला वृक्षराजींत घडून आलेलें महाराजांचें वर्तन आठवलें. त्यासमयीं महाराजांचीं भाषणें कशीं संकेताचीं होत होतीं--वर्तनक्रमांत कसा फरक दिसूं लागला होता--महाराजांचें मुखकमल किती प्रसन्न दिसत होतें--नेत्र कसे चंचल दिसत होते--हें सर्व पाहून मग मात्र माझ्या मनाची दृष्टांताच्या सत्यतेविषयीं उत्तरोत्तर खातरी होत चालली. महाराज धनुर्धारी आहेत, असा मनाचा ग्रह झाला. अंतःकरण आनंदसमुद्राच्या लाटांनीं उचंबळूं लागलें. लज्जेनें मी अगदीं व्याकूळ झालें, व मजला महाराजांचे सन्निध उभें राहण्याचें धारिष्ट होईना, ह्मणून मी त्यावेळीं महाराजांस सोडून निघून गेलें. माझ्या हृदयमंदिरांत सुखाचा ठेवा काय आहे, तो मीं आतां महाराजांस व्यक्त करून दाखविला. खऱ्या प्रेमाचें दिग्दर्शन आतां झालें. यापुढें माझ्यानें याविषयीं बोलवत नाहीं.

**सुभट०**---(मुखावर एकदम निस्तेजता दिसूं लागून, मो-

ठ्या कळवळ्यानें ) खरोखरच का आपल्यास असें वाटलें कीं, मी आपलें करग्रहण करीन ह्मणून ?

**देवां०**—( आश्चर्यानें भिवया वर करून ) ह्मणजे ! मी महाराजांचें भाषण पूर्णपणें समजलें नाहीं; तथापि प्रथम दिवशीं या पायांचें दर्शन झाल्यापासून प्रेमांकुराचें बीजारोपण प्रथम महाराजांच्या हातून झालें, असें ह्मटल्यास चिंता नाहीं; आणि हें मींच कशाला सांगितलें पाहिजे.

असें भाषण होतांच सुभटवीर्य आपल्या ठिकाणीं कुंठित झाला. त्याच्यानें कांहींच भाषण करवेना. तो तिच्या मुखकमलाकडे निश्चल नेत्रांनीं सारखा पाहूं लागला. त्यावरून तिच्या हृदयमंदिरांत प्रेमांकुर किती दृढतर झाला आहे, याची तो परीक्षाच करीत आहे, असें दिसलें. त्या विशाल नेत्रांत त्यास भीति, लज्जा, व मनाची आतुरता, यांशिवाय कांहींच दिसलें नाहीं. स्वतःच्या वर्तनाचा त्यास मोठा पश्चात्ताप होऊन त्याचें मन अगदीं थिजून गेलें, व तो मंद स्वरानें ह्मणूं लागला "हे राजकन्ये, मीं फार अनुचित काम केलें. आपलें मन मीं व्यर्थ दुखविलें "

**देवां०**—काय ? माझें मन दुखविलें ! आणि महाराजांचे हातून अनुचित काम घडून आलें ?

**सुभट०**—कोणतीही गोष्ट मी आपणापासून गुप्त ठेवीत नाहीं. प्रथमतः मी जेव्हां आपला निरोप घेऊन शयनगृहाकडे जाऊं लागलों, त्यावेळीं, व तदनंतर जेव्हां पुनरपि भेट झाली, त्यावेळीं, खरोखरच माझें मन या सौंदर्यास अगदीं लुब्ध झालें होतें. असें झाल्यानें माझे हातून कामी जनांप्रमाणें वर्तन घडलें असेल, आणि या माझ्या कृत्यासच मी अनुचित काम घडून आलें, असें ह्मणतों. याच कर्माबद्दल मजला वारंवार

पश्चात्ताप वाटत आहे. मी आपल्यास दुखविण्यास कारणीभूत झालों, हें माझें कपटाचें वर्तन झालें. असें करण्यानें मीं आपणास व्यर्थ फसविलें. मीं आपला विश्वासघात केला.

**देवां०**—( सर्वांगास कंप सुटून, मुख कोमेजून जाऊन ) अरेरे परमेश्वरा ! ! मीं व्यर्थ आशा केली ! ! !

**सुभट०**—( दुःखित स्वरानें ) हां, असें झालें खरें ! ज्यावर आपण विश्वास ठेविला त्यानेंच आपला गळा कापिला. ज्यावर आपण प्रेम धरिलेंत, तेथून आपणास निराश होऊन परत जावें लागलें. आपल्या प्रेमरूपी निष्कलंक चंद्राचें योग्य प्रतिबिंब या माझ्या हृदयसरोजीं प्रतिबिंबित झालें नाहीं, आणि यामुळें आपणास दुःख होणें साहजिक आहे. आपणास दिलेल्या या दुःखामुळें माझें मन मजला वारंवार, सत्य क्रियेस तूं जागृत नाहींस, ह्मणून टोंचीत आहे. आज जो मी येथें आलों, तो केवळ, ही आपण मजविषयीं धरिलेली आशा, व्यर्थ आहे, हें आपल्याला कळवावें ह्मणूनच आलों, असें समजा. आतां आपण एकमेकांस भेटण्याचें कालावधीवर टाकूं ह्मणजे झालें. आपण एकमेकाशीं मित्रत्वानें वागत जाऊं. मजला आतां एक गुप्त गोष्ट आपणास सांगावयाची आहे.

**देवां०**—( उभय हस्तांनीं हृदयास धीर देऊन ) आणि ती कोणती ?

**सुभट०**—गुप्त गोष्ट ह्मणजे हीच कीं, आपल्या भगिनीच्या ठायीं माझें प्रेम बसलें आहे, आणि तिचें पाणिग्रहण करण्याचें माझें मानस आहे.

हें भाषण श्रवण करतांच देवांगनेच्या मुखावर प्रथमतः आश्चर्याचीं चिन्हें पूर्णपणें व्यक्त होऊं लागलीं. नंतर लागलीच तिनें आपलें मुखकमल उभय करकमलांनीं आच्छादून घेऊन

ती रुदन करूं लागली. आतां काय भाषण करावें, हें सुभट-वीर्यास मुळींच सुचेना; परंतु ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. एकाएकीं देवांगना उठून उभी राहिली. तिच्या नेत्रांतून घळघळ अश्रुधारा वहात होत्या; परंतु तिनें कांहीं अंशीं सस्मित वदनही केलें होतें. या समयीं तिच्या मुखावर आनंद, शोक, समाधान व अस्वस्थता, हीं सर्वच एकसमयावच्छेदेंकरून दिसूं लागलीं. हें अवलोकन करतांच सुभटवीर्याची मति अधिकच कुंठित होत चालली.

**देवांगना**--( नेत्र आरक्त करून--रागानें ) फार उत्तम झालें. असें केल्यानें महाराजांनीं आपल्या प्रतिष्ठेस उणेपणा आणला नाहीं, परंतु मी बोलतें, याची मजला महाराज क्षमा करतील. ही शिष्टजनरीति नव्हे, हें महाराज प्रांजलपणें मान्य करतील. श्रीअंबिकेच्या दृष्टांतावर मीं विश्वास ठेविला, परंतु आतां तो दृष्टांत केवळ भ्रम आहे, असें ह्मटलें पाहिजे. माझ्या नेत्रांवरून तीं भ्रमरूपी पटलें आतां नाहींशीं झालीं. मी फार मूढ आणि अप्रबुद्ध आहें, कीं मीं महाराजांच्या भाषणरूपी मधूस लुब्ध झालें. माझी स्थिति दुष्यंतराजानें त्याग केलेल्या शकुंतलेप्रमाणें, अथवा ययातीनें देवयानीला संतोषित करण्यासाठीं त्याग केलेल्या शर्मिष्ठेप्रमाणें झाली आहे. अस्तु; परंतु एक अत्यंत समाधानकारक गोष्ट महाराजांनीं आपणच होऊन मला सांगितली, हें फार उत्तम केलें. माझ्या भगिनीची पूर्व पुण्याई फारच सबल कीं, जिच्या योगानें तिला योग्य भ्रतार मिळाला. महाराजांचें व आमचें जें आजकालपावेतों मित्रत्वाचें नातें होतें, तें नाहींसें झालें, व महाराज आमच्या आप्तवर्गापैकीं झाले ही फारच उत्तम गोष्ट झाली; तथापि श्रीजगन्मातेचा दृष्टांत तरी एकाएकीं असत्य कसा

झाला, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. महाराजांच्या या गुह्य गोष्टीची माझ्या मुखांतून परिस्फुटता होणार नाहीं.

**सुभट०**—( तिचा क्रोध कमी होत चालला आहे, हें पाहून समाधान वाटून ) तुह्मां उभय भगिनींचें प्रेम पाहून मजला फार आनंद वाटतो. ही गुप्त गोष्ट तुह्मी यक्षिणीला सुद्धां कळवूं नका.

**देवां०**—महाराजांची आज्ञा मला प्रमाण आहे. आणि महाराजांचा त्या यक्षासमवेत दारुण युद्धप्रसंग झाल्यावरच महाराज विजयी होऊन त्यांना माझ्या भगिनीचें पाणिग्रहण करतां येणार आहे, तोंपावेतों महाराजांचें माझ्या भगिनीशीं केवळ मित्रत्वाचेंच नातें आहे. ( गंभीर स्वरानें ) परमेश्वरा ! या योर संग्रामांत महाराज विजयी होवोत. ( किंचित् वेळ स्तब्ध राहून ) आतां मी महाराजांचा निरोप घेतें. ( सुभटवीर्यानें मानेनें आपला रुकार प्रकट केला त्याबरोबर ) महाराजांनीं या जनावरील कृपा कमी करूं नये.

इतकें म्हणून देवांगना वृक्षराजींत निघून गेली व क्षणांत दिसेनाशी झाली. बराच वेळपावेतों सुभटवीर्य गत गोष्टीविषयीं मनांत विचार करीत उभा राहिला. या समयीं त्याचें मन नानाविध कल्पनातरंगांनीं भरून गेलें होतें. नंतर त्यानें आपल्या विश्राममंदिराचा मार्ग धरिला. आश्रमीं आल्यावर त्यानें आपले शरीररक्षक, जे द्युमत्सेन आणि बृहत्सेन, यांस पाचारण करून त्यांस आज्ञा केली कीं, " तुह्मांस अवगत असेलच कीं, महाराज वज्रदंष्ट्र यांचा मानस राजकन्या प्रभावती इजला हस्तगत करून घेण्याचा आहे, परंतु असें होणें मला इष्ट दिसत नाहीं. अवन्ती देशाहून तिचें साहाय्य झालें पाहिजे. या नगरीच्या आसमंत भागींच तिजला कोठें

तरी गुप्त रीतीनें ठेविलें आहे, येवढें मी निश्चयात्मक सांगतों. तुह्मीं उभयतांनीं मोठ्या काळजीनें तिच्या वसतिस्थानाचा शोध करावा, अशी माझी इच्छा आहे. तुह्मीं जरी संग्रामकुशल आहांत, तरी प्रसंगोपात तुह्मांवर संकटें येऊन तुमचे प्राण धोक्यांत पडतील; कारण सांप्रतकालीं असें करणें हें मोठें धाडसाचें काम आहे. शिवाय ज्यांनीं तिजला अशा गुप्त रीतीनें ठेविलेलें आहे, तेही सामान्य नसतील, हें विशेषेंकरून लक्षांत ठेवा. एवढ्यावरून माझा हेतु काय आहे, हें तुह्मीं जाणलेंच असेल. तुमच्यासारख्या धूर्त मनुष्यांस अधिक स्पष्टपणें सांगण्याची अवश्यकता नाहीं. सारांश हें काम झालेंच पाहिजे.

## यक्षकन्येचा कैवारी योद्धा.

शेवटीं वैशाख वद्य अमावास्येचा दिवस येऊन पोंहोंचला. अमावास्या मंदवारीं आली होती. आज मोठा भयंकर संग्राम होणार होता, हें तर खरेंच, परंतु आजचा दिवसही क्षुद्र मनास भीतित्रस्त करणारा होता. त्या दिवशीं प्रचंड वादळ सुटून दशदिशा धुळीनें व्याप्त झालेल्या होत्या; त्यामुळें हा प्रळयकाळचा झुंझावातच आहे कीं काय, असें वाटूं लागलें. त्या दिवशीं रात्रौ सर्व आकाश घनदाट मेघांनीं आच्छादिलें होतें. दशदिशांभर काळोख किट्ट पडला होता. आकाशांत वारंवार गंभीर घनगर्जना होऊन, प्रतिष्ठान नगरी दणाणून जात होती. शिखायुक्त मोरांच्या केकांनीं मनुष्याच्या चित्तवृत्ति हरण होत होत्या. दर्दुर ओरडून ओरडून कर्णेंद्रिय बाधिर करीत होते. अंतरिक्षांत क्षणोक्षणीं विद्युल्लतेचा कडकडाट होऊन, तिच्या आघातांनीं आकाशपटल आतां दुभंग होतें कीं काय, असें वाटत होतें. असें झालें ह्मणजे मनुष्यांच्या दृष्टि दिपून

जात होत्या. सोंसाट्याच्या वायुवेगानें मोठमोठे जुनाट वृक्ष उन्मळून पडूं लागले, व त्यांचीं शुष्कपर्णें अंतराळीं भ्रमण करूं लागलीं. विजेच्या गडगडाटानें असें वाटलें कीं, तो जणूं काय लोकांचीं हृदयें आतां फोडूनच टाकीत आहे. क्षणमात्रांत भयंकर पर्जन्यवृष्टि होऊन जिकडे तिकडे जलमय होऊन जाईल असें वाटत होतें.

आणखी ती रात्र इतकी भयंकर होती कीं, मनुष्यमात्रास त्याची एकाएकीं कल्पनाच करतां येणार नाहीं. ज्या समयीं राज्यावर परचक्र येऊन शतशः लोकांच्या कृतांताच्या मुखीं आहुति पडतात, जेव्हां भूमितल कंपायमान होऊन भूमि दुभंग होते, जेव्हां एखाद्या पुण्यपुरुषाचा कोणी नीच–कृतघ्न–दुष्ट प्राणघात करतो, जेव्हां एखादा सार्वभौम नृपति–प्रजाजनांचें पितृवात्सल्यानें पालन करणारा,–स्वर्गवासी होतो, जेव्हां एखाद्या अत्यंत भयंकर रोगाचा उद्भव होऊन सहस्रशः प्रेतें भडाग्नि देण्याकरितां एकदम स्मशानभूमींत आणतात, जेव्हां स्मशानवासी पिशाच्चें बलिभक्षणार्थ एके ठिकाणीं जमून एकच कोलाहल करितात, जेव्हां सरितापति आपली मर्यादा उल्लंघन करून आपल्या प्रचंड लाटांनीं वनें, उपवनें व मानवी प्राण्यांचीं वसतिस्थानें आपल्या विशाल उदरांत सांठविण्यास आरंभ करितो, जेव्हां आकाशांत सहस्रशः उल्कापात होऊं लागतात, जेव्हां क्षितीवर अनंत उत्पात होऊं लागतात, अथवा जेव्हां व्याघ्र, केसरी, इत्यादि हिंस्र पशू गर्जना करीत निबिड काननांतून भक्ष्याच्या शोधार्थ मोठ्या आनंदानें बाहेर पडतात, अशा समयीं जशी भयंकर आणि उदास रात्री असते, तशीच या प्रसंगीं होती.

ज्या समयीं ब्रह्मांडपालक प्रभूनें भूमिभार हलका करण्या-

करितां नृसिंहअवतार धारण करून आपल्या तीव्र नखांनीं हिरण्यकश्यपूचें उदर विदारण केलें; जेव्हां श्रीरामचंद्रानें दशकंठाचीं शिरकमलें छेदून भूमीला पाडिलीं; जेव्हां यादवकुलभूषण भगवान गोपालकृष्णानें कंसचाणुरादिकांचें मर्दन केलें; किंवा जेव्हां कालिंदीं वास करणारा जो भयंकर भुजंग कालीया यास शासन केलें; जेव्हां त्रिपादक्रमणानें भुवनत्रय व्यापणाऱ्या वामनावतार घेणाऱ्या विष्णूनें इंद्राचें पद हरण करूं इच्छिणारा जो दैत्यराजबळी तो पाताळीं घातला; अथवा जेव्हां कौरवपांडवांचा भयंकर युद्धप्रसंग होऊन भीष्मद्रोणादि सुभटवीर निमाले असतील; तेव्हां जशी भयंकर आणि उदास रात्र होती तशीच या प्रसंगीं होती.

असो. अशा त्या भयंकर रात्रीं सुमार प्रहर रात्र अतिक्रांत झाल्यावर सुभटवीर्य आपल्या करड्या रंगाच्या अश्वावर आरोहण करून आश्रमाबाहेर पडला. हा अश्व, अश्वरत्नांत एक उत्तमच रत्न होतें. त्याच्या लगामाच्या रेशमी दोऱ्या सुभटवीर्यानें वाम हस्तानें ओढून धरल्यानें, त्यानें आपल्या मानेचा झोंकदार आंकडा वळविला होता. क्षणोंक्षणीं कठोर किंकाळ्यांनीं तो राजमार्ग दणाणून टाकीत होता. त्याच्या वेगाचा प्रतिबंध केल्यानें त्याच्या अंगीं चपलता व वेग इतके दिसत होते कीं, मोकळा सोडला तर हा निमिषमात्रांत अतिदूर निघून जाईल. त्यानें आपले कान टवकारिले होते. अश्वजातीचीं जीं उत्तम प्रकारचीं लक्षणें असावीं लागतात, तीं सर्व त्याच्या ठायीं होतीं. अशा त्या सुंदर व तेजस्वी अश्वावर आरोहण करून त्या निबिड अंधकाराच्या रात्रीं सुभटवीर्य पूर्वदिशेनें राजनगरीच्या तटासन्निध येतांच, वेशीपाशीं नगररक्षकानें त्याच्या गमनास प्रतिबंध केला. सुभटवीर्यानें आप-

त्या सर्वांगीं कवच धारण केलें होतें. त्यानें आपल्या मस्तकीं शिरस्त्राण घातलें होतें. सव्य हस्तांत एक लांब भाला वरचेवर धरिला होता. पृष्ठभागीं ताम्रतकट बसविलेली कूर्मचर्माची प्रचंड ढाल बांधिली होती व कटिबंधांत रुंद, पल्लेदार तलवार व कट्यार खोविलीं होतीं. अशा प्रकारची सिद्धता करून हा कोणी तरी रणयोद्धा युद्ध करण्याकरितांच जात आहे असें पाहून त्या नगररक्षकाचें मन शंकित झालें. त्यानें आमच्या संग्रामशूरास स्पष्टपणें निक्षून सांगितलें कीं " महाराज वृज्रदंष्ट्र यांची आज्ञा असल्याशिवाय मी आपल्यास जाऊं देणार नाहीं. "

अशा प्रकारें आपल्या गमनास कोणी तरी अवरोध करील हें सुभटवीर्यानें पूर्वींच जाणलें होतें. त्या नगररक्षकाचें हें भाषण श्रवण करतांच, त्यानें आपल्या करांगुलींतून दिव्य तेजःपुंज रत्नजडित मुद्रिका काढून त्या रक्षकास दाखविली. त्यानें तत्काळ आपले स्वामी जे वज्रदंष्ट्र महाराज यांची ती मुद्रिका आहे हें ओळखिलें, व नम्रपणें उत्तर केलें कीं " महाराजांनीं या दासास क्षणमात्र थांबवून धरल्याबद्दल क्षमा करावी. महाराजांनीं आतां खुशाल गमन करावें. " ही मुद्रिका सुभटवीर्यास कोणत्या प्रसंगीं प्राप्त झाली हें आमच्या वाचकांस अवगत आहेच.

प्रथमतः त्याच्या अश्वाच्या खुराचे आघात पाषाणमय भूमीवर होत होते. त्यांचा प्रतिध्वनि आसमंत भागीं निघत होता, परंतु तो ध्वनि लवकरच बंद झाला; कारण तो नगरीच्या तटबंदीपासून बऱ्याच अंतरावर आला होता. या ठिकाणीं वारा फारच सोंसाट्यानें वहात असून अंबुकणानें आर्द्र असा शरीरास लागत होता. साहस कर्म करण्यास प्रवृत्त झालेला असा तो युद्धकुशल आणि सांप्रत उतावीळ झालेला

रणधीर तसाच पुढें पुढें चालला होता. या समयीं तो किंचित् मंद गतीनें पूर्व दिशा धरून चालला होता. मुखानें जरी वरचेवर हरिनामस्मरण चाललें होतें, व आपण जें भयंकर प्राणांत होणारें कृत्य हातीं धरिलें आहे, त्यांत आपणास यश मिळावें ह्मणून तो ईशस्तव करीत होता, तरी मधून मधून त्याच्या मनांत त्या कृष्णवर्णी सुंदरीची दुःखित स्थिति येऊन त्याचें अंतःकरण विव्हल होत होतें. वारंवार त्या तरुणीची अश्रुभरित मूर्ति त्याच्या मनांत उभी राहात होती. तिचे ते विशाल नेत्र दीनाप्रमाणें 'मजला या संकटांतून मुक्त करा' ह्मणून आपल्या मुखाकडेस पहात आहेत, असें त्यास वाटत होतें. या संग्रामांत मी विजयी होऊन त्या कुसुममालेप्रमाणें सुकुमार सुंदरीस शिवमंदिरात जाऊन भेटतांच, ती मजला उत्थापन देऊन आनंदाश्रु ढाळील, असें तिचें मुखकमल पाहून माझे नेत्र खरोखरच कृतार्थ होतील. अरेरे! खरोखरच अशी दुःखित स्थिति पाहून माझें चित्त विव्हल होतें. हा केवढा प्रसंग त्या राजकन्येवर कीं; जिचा मात्यापित्यांनीं, आत्मवर्गांनीं, बंधुजनांनीं त्याग केलेला आहे.

याप्रमाणें क्षणमात्र त्या कोमलांगीची दुःखित स्थिति मनांत आणीत, क्षणमात्र परमेश्वराचें ध्यान करीत तो विलक्षण धाडसी तरुण पुढें पुढें मार्गावलंबन करीतच होता. आतां तो निबिड अंधकार बराच कमी कमी होत जाऊन वृक्षादि भव्य पदार्थ अंतरावरून कज्जलराशीप्रमाणें दिसत होते. पूर्वीचा झुंझावात आतां मंदत्व पावल्यानें ठायींच्या ठायींच ते स्थिर दिसत होते. आकाशतल ढगांनीं व्याप्त होऊन अवडंबर आलेलें दिसत होतें; परंतु पर्जन्य पडण्याचीं चिन्हें दिसत नव्हतीं. अश्वरंगाची पांडुरता व सुभटवीर्यानें धा-

रण केलेलें कवच अस्पष्ट रीतीनें दिसूं लागलीं होतीं.

अशा रीतीनें मार्ग क्रमीत असतां ज्या स्थलीं उंच सखल प्रदेश असून जेथें कंटकादिकांच्या वनस्पतीनें भूमितल आच्छादून गेलेलें आहे अशा भूमीचें उल्लंघन करून तो एका सपाट मैदानावर आला. ती भूमि हरित तृणांकुरांनीं व्याप्त झालेली होती. या स्थलीं आतां आपण आपला अश्व स्थिर करावा असें त्यास वाटलें; कारण मध्यरात्रीस आतां एक घटकाभरच अवकाश राहिला होता. येथें आल्यानंतर तो अश्वावरून खालीं उतरला व एकनिष्टभावानें जगन्नियंत्याची आपणास या दारुण प्रसंगीं यश मिळावें ह्मणून नेत्र मिटून स्तुति करूं लागला "हे स्वयंप्रकाश, तेजोमय ब्रह्मानंदा, आनंदकंदा, निर्विकारा, पुराणपुरुषा, मायाचक्रचालका, लक्ष्मीपते, नारायणा तुला हा दीनजन अनन्यभावानें शरण आहे. या जगाचा उत्पत्तिस्थितिलय कर्ता तूंच आहेस. तुझ्या इच्छामात्रेंकरून भक्तांवर आलेलीं प्राणसंकटें दूर होतात. भक्तांचीं संकटें निवारण करण्याकरितां गजाननरूपी तूंच आहेस. त्यांना बुद्धि देण्याकरितां त्यांच्या जिव्हाग्रीं सरस्वतीरूपानें तूंच वास करतोस; परंतु इतकें असूनही हे भगवंता, तुजला आदि नाहीं, मध्य नाहीं व अंत नाहीं. युगायुगीं अनेक अवतार धारण करून, दुष्टांचें निर्दालन करून, आम्हां दीनजनांचें व भक्तजनांचें तूंच रक्षण करतोस. व्यास–वाल्मिक–शुक–शौनकादिकांस तूंच बुद्धि देऊन हे प्रभो, त्यांच्याकडून तूं आपलीं विमल चरित्रें वर्णिविलीं आहेस. संपूर्ण लोकांस तूं आपल्या प्रभावाचें कौतुक दाखविणारा, विश्वाचें पालन करणारा, सकल ब्रह्मांडाचा आधारस्तंभच, अज्ञानरूप अंधकाराचा नाश

करणारा, अशा तुला हा दीनजन अनन्यभावें शरण आहे. तूंच आपल्या कृपादृष्टीनें मनुष्यमात्रांचे ठायीं विवेकरूपी वैभव उत्पन्न करतोस. कृत्रिम कृत्यांचें दहन करून दुष्ट प्राण्यांचें तूंच हनन करतोस. इंद्रियांचा नियंता तूंच आहेस. वेदांचा कर्ता तूंच आहेस. तुझ्याशिवाय या जनास अन्य विश्रांतिस्थानच नाहीं. चंद्रसूर्यादि मंडळांस प्रकाश तूंच देतोस. वनस्पतींचें पोषण तूंच करून प्राण्यांच्या जीवितांचें तूंच संरक्षण करतोस; तस्मात् तुला हा अल्पमति, तुझे चरणरज वांच्छिणारा, त्रिवार शरण आहे.

श्री नंदनंदन इंदिरावर सुखकंद आनंदकर कुंदरदन मंद हास्य इंदुवदन मुचकुंदवरद मुकुंद मुरमर्दन श्यामसुंदर सिंधुजाप्रियचरणारविंद सकृद्वंदनमात्रभवसिंधुजलबिंदुकणाविभव किंकरबंधमोचक यदुकुलावतंस कंसमर्दन असुरविध्वंसकर शंकरप्रिय संकर्षणानुज चतुर्भुज यदुराज कुंजभुवनविराजमान गुंजाभरणधर कर्णांतलोचन वेणुवाद्यविशारद मदनमूर्ते गोपीगोपवलयशोभायमान कलिमलांतक सकलभक्त जनमनोमोहन मे तादृशीं रमणीयतनुं दर्शय ॥

श्रीमच्छंकर विरूपाक्ष दक्षमखविक्षेपकर भक्तजनरक्षणार्थातिदक्ष रक्षोगणलक्षशिक्षक भवभक्षक तक्षकभूषण नक्षत्रवरधर धृताक्षमाल स्वपरपक्षविवर्जित कामाक्षीवर सुराध्यक्ष निरपेक्षातिसूक्ष्मा लक्ष्य ब्रह्मन् भूतिवलक्ष भगवन् सज्जनवनवसंत मदनांतक महावैष्णवानाद्यंत वेदान्तवेद्य श्रुतिसार संसारविध्वंसकर प्रणतसुरनरकिन्नरयक्षोरगराक्षसगणगंधर्व गर्वरहित सर्वपदनिर्विकार निर्वाणभेषज सर्वाभीष्टकर निरंतरं शिव ते स्मरामि ॥

येणेंप्रमाणें जगदीशाची स्तुति करून त्यानें आपला मस्तक भूमि-

पर्यंत लववून परमेश्वरास प्रणिपात केला. नंतर त्यानें अश्वावर घातलेलें सामान एकवार पुनरपि तंग ओढून दृढ करून त्याच्या मानेवर त्यास ईर्ष्या उत्पन्न करण्याकरितां व त्यास उत्तेजन प्राप्त व्हावें ह्मणून थोपटिलें. नंतर त्यानें आपलीं सर्व आयुधें नीटनेटकीं सांवरून धरिलीं, व आपल्या कवचाचे बंध चांगले दृढ करून शिरस्त्राण मस्तकीं पुनरपि धारण केलें. कटिवलयांत खोंविलेल्या शस्त्रांचे बंध शिथिल केले; कारण तीं प्रसंगविशेषीं त्वरित बाहेर काढतां आलीं पाहिजेत. सव्य हस्तांत त्यानें तो लांब भाला धारण केला, व वामहस्तानें ती प्रचंड ढाल आपल्या विशाल हृदयस्थलीं धरिली. नंतर अश्वास नमस्कार करून त्यानें त्यावर आरोहण केलें. त्यास आतां एकवार त्या विशालाक्षि श्यामसुंदरीचें स्मरण होऊन, त्याच्या मुखावाटे तिच्या नांवाचा उच्चार झाला.

तिचें स्मरण होत आहे नाहीं तोंच, त्याच्या कर्णेंद्रियावर, भूमितलावर अतिवेगानें ज्यांचा आघात होत आहे, अशा घोड्याच्या टापांचा ध्वनि पडला. तो ध्वनि अगदीं आपणाकडेसच येत आहे, असें त्यास स्पष्टपणें कळून आलें, व अर्धक्षणांत सन्निध असलेल्या घनदाट वृक्षसमुदायांतून तिमिर रूपाप्रमाणें जिचा कृष्णवर्ण आहे, व जिनें कृष्णवर्ण अश्वावरच आरोहण केलेलें आहे, अशी एक भव्य आकृति चंडवेगानें आपणावर चाल करून येत आहे, असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. आतां क्षणमात्र सुद्धां विलंब करितां उपयोगाचें नाहीं, असें त्यास वाटलें. उभयतांच्या अश्वांच्या कठोर किंकाळ्यांनीं तो वनप्रदेश दणाणून सोडिला. यक्षानें प्रचंड गर्जना केली. सुभटवीर्यानें आपला भाला सांवरून धरिला, व आपला अश्व प्रचल प्रभंजनाच्या अत्यंत तीव्र वेगानें मुखानें हर ! हर ! नामाचा-

गजर करून आपल्या शत्रूच्या अंगावर फेंकला. निमिषमात्रांत उभयतां वीर मदोन्मत्त गजांच्या भयंकर टकरीप्रमाणें एकमेकांवर येऊन आदळल्यानें, त्याचा प्रतिध्वनि त्या समरभूमींत किंचित् कालपावेतों घुमत आहे नाहीं तोंच, मेघमंडळांत प्रलय चपलेचा, असंख्य उल्हाट यंत्राच्या भडीमाराप्रमाणें, कडकडाट ध्वनि होऊन, आतां हें संपूर्ण मेघमंडल अंतरिक्षांतून कोसळून भूमीवर पडतें कीं काय, असें वाटलें.

## समरभूमि.

खरोखरच उभय वीरांची ही धडक इतक्या प्रचंड वेगानें आणि इतक्या निकरानें झाली कीं, त्यासरसी भूमि थरारून जाऊन कर कर वांकते आहे कीं काय, असा भास झाला, व त्याचप्रमाणें उभय वीरांच्या ताम्र तकटें बसविलेल्या प्रचंड ढालांवर भाल्यांच्या पात्यांचा इतक्या जोरानें खणखणाट झाला कीं, त्यापासून अग्निकणांचा वर्षाव झाला व निराळप्रदेशीं तो ध्वनि घुमत राहिला. निमिषमात्रांतच या द्वंद्वयुद्धाचा निर्णय झाला; कारण दुर्दैवेंकरून असें घडून आलें कीं, सुभटवीर्याच्या भाल्याचा अग्रभाग या प्रचंड आघातानें भंगून जाऊन, त्याचे दोन तुकडे झाले. विरुद्ध पक्ष सबळ असल्यानें व त्याचें शस्त्रही अजस्र असल्यानें, त्याचा इतक्या विलक्षण जोरानें आघात झाला कीं, प्रचंड तालवृक्ष वायुवेगानें प्रकंपित होऊन उन्मळून जसें त्याचें अकस्मित् पतन होतें, तसा सुभटवीर्य आपल्या वेगवान् अश्वावरून धरणीवर निचेष्ट होत्साता पतन पावला. त्या पतनाचा मोठा ध्वनि झाला. प्रथमतः त्याचा अश्व वेगांत असल्यानें चौपायीं उफळत बऱ्याच अंतरावर निघून गेला; परंतु लागलींच दीन वाणीनें खिंकाळत, व अतिशय शोकामुळेंच काय, चौखुरानें

पृथ्वीला ताड ताड ताडण करीत, पुनरपि स्वामिसन्निध येऊन टोकारून त्याच्या मुखाकडे पाहूं लागला, व आपलें मुख भूमीस लोळवून घेऊं लागला. अशा रीतीनें त्यानें आपल्यास आपल्या स्वामीच्या पतनापासून अनिवार्य दुःख झाल्याचें प्रथमतः प्रदर्शित केलें, आणि नंतर त्या यक्षास भिऊन बुजल्यामुळें, तो दूर निघून गेला.

तत्क्षणींच यक्षानें अश्वावरून भूमितलावर उड्डाण करून, गात्रें विकल होऊन धरणीवर पडलेल्या सुभटवीर्याकडे तो खालीं वांकून निरखून पाहूं लागला. त्यानें त्याच्या मस्तकाचें शिरस्त्राण दूर केलें, त्यामुळें त्यास शीतल वायूचा स्पर्श होतांच, त्याच्या कपोलप्रदेशीं किंचित् आरक्तता दिसूं लागली, ओष्टप्रांत स्फुरण पावत आहे असें दिसलें, व भ्रमितचित्तानें जड व मंद झालेलीं नेत्रकमलें किंचित् उघडण्यास आरंभ झाला; परंतु त्याच्या शरीरांत चांगली हालचाल अद्याप उत्पन्न झाली नव्हती.

अशी त्याची स्थिति पाहून त्या यक्षानें आपल्या अश्वाच्या पृष्ठभागीं बांधलेल्या वनस्पतीच्या अर्काची एक गिंडी काढून त्याचे दोन तीन थेंब त्याच्या मुखांत घातले; त्यामुळें त्याच्या सर्व शरीरांत चेतना उत्पन्न झाली. त्याची स्मरणशक्ति जागृत झाली व मूर्च्छेनें जड झालेलें त्याचें मस्तक हलकें होऊन, आकुंचित झालेले ज्ञानतंतु पुनरपि प्रसृत झाले व तो चांगला शुद्धीवर आला. आपण कोणत्या स्थलीं आहोंत हें तत्क्षणींच त्याच्या ध्यानांत आलें. आपण कोणत्या निमित्तानें आलों आहों, आपणास अपजय कसा प्राप्त झाला, आणि आतां आपला परिणाम काय होईल, हें सर्व त्याच्या मनांत येऊन चुकलें. यक्षिणीचे शब्द एकदम त्याच्या मनांत उभे रा-

हिले. "ईश्वराच्या अवकृपेनें जरकरितां आपल्यास या घोर समरांत जय आला नाहीं, आणि विरुद्धपक्षीं जय आला, तर आपल्यास त्या यक्षाच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करावें लागेल. असें न होईल तर आपण स्वतःच्या जिवाचे धनी राहिलों नाहीं, सर्वस्वी या देहावर मग त्याचीच सत्ता, इतकेंच नाहीं, परंतु या जीवाला तो उचलून घेऊन कोणीकडे भयंकर गिरि-कंदरीं नेईल याचा नेम नाहीं."

अशा प्रकारें विचारतरंगांनीं त्याचें मन अगदीं गोंधळून गेलें, व अशा त्याच्या त्या उद्विग्न झालेल्या मुखकमलाकडे शिर-स्त्राण धारण केलेला तो यक्ष निरखून पाहूं लागला. गिरिकंदरीं भयंकर गुहेंतून क्रोधाविष्ट होत्साता पंचानन जसा खोल स्वरानें गुरगुर ध्वनि करितो, तसा शिरस्त्राणामधून खोल व गंभीर स्वर काढून तो यक्ष बोलूं लागला, "अरे मानवा, आतां तुझें जी-वित सर्वस्वी माझ्या हातीं आहे. तू आतां पूर्णपणें माझ्या स्वाधी-न झाला आहेस. तूं आपल्याच हातानें आपला जीव संकटांत घालून घेतलास. या तुझ्या शरीरांतील संपूर्ण रक्तमांसाचा धनी आतां मी आहें. मीं जय मिळविल्याचें परमेश्वरानें मज-ला हें योग्य पारितोषिक दिलें, आणि हें सर्व विपरीत कसें घ-डून आलें याविषयीं तूं वारंवार आपल्या मनांत खेद करीत असशील; परंतु तूं हें जाणलेंच असशील कीं, हा दारुण युद्ध-प्रसंग केवळ तूं त्या सुंदरीवर—जिच्या ठायीं मीं आपल्या कर्तृ-त्वानें ही केवळ सकल सौंदर्याची अधिष्ठात्री देवताच आहे, असें लावण्य निर्माण केलें आहे—लुब्ध होऊन तिच्याविषयीं कामातुर होत्साता मजशीं संग्राम करण्याचें धारिष्ट केलेंस. मि-त्रत्वाच्या निर्मल प्रेमानें जर तूं मजसमागमें द्वंद्व करण्याचा प्रसंग आणिला असतास तर सांप्रत तुला प्रतिकूल काल आ-

ला नसता. यक्षिणीबरोबर झालेलें तुझें वर्तन शुद्ध नव्हतें, याविषयीं तुझें मन तुला साक्ष देत आहे. खऱ्या मित्रत्वाचें प्रेम रसाळ असून प्रीतिप्रेमाप्रमाणें स्वहित साधून घेण्याकरितां तें लालचावत नाहीं, आणि असें असल्यानेंच युद्धांत तुला जयप्राप्ति झाली नाहीं. बीज शुद्ध असलें ह्मणजे त्याचा वृक्ष निकोप होऊन त्याच्या पोटीं मधुर फळें उत्पन्न होतात. मूळारंभीचें तुझें वर्तन अशुद्ध असल्यानें असा परिणाम घडून आला. प्रथमपासूनच त्या सुंदरीचे ठायीं मीं असें कांहीं अप्रतिम सौंदर्य उत्पन्न केलें आहे कीं, कसा जरी धीरवाम आणि विवेकी पुरुष असला तरी त्यानें सुद्धां, तिच्या अधरोष्टमरंदमाधुर्याची लालसा उत्पन्न होऊन, मधुकराप्रमाणें त्यावर तुटून पडावें. तस्मात् ही कर्तृत्वशक्ति, हा अतुल प्रताप, अथवा ही अमानुष कृति माझी आहे; यामध्यें तुजकडे विशेष दोष नाहीं. आतां तूं सर्वस्वी आपल्या जीवितास आंचवलास."

**सुभट०**—( भूमितलावर जोरानें पतन झाल्यानें सर्वांगाचीं गात्रें बधिर झालेलीं होतीं; हस्तपादादि अवयव उचलण्यास तादृश शक्ति राहिली नाहीं; जिव्हा शुष्क होऊन मुखावाटे रामनामाचा उच्चार सुद्धां स्पष्टपणें होईना; अशा स्थितींत ) तर मग हा जन सर्वस्वी आतां जीविताला मुकला ह्मणावयाचा ना ?

**यक्ष**—माझ्या इच्छेनुरूप मला जें योग्य दिसेल तसें मी करीन. माझ्या मनांत तुझी मुक्तता करण्याचें आलें तर तसें करीन; परंतु इतकें मात्र निक्षून सांगतों कीं, हें जें तूं अविचाराचें व धाडसाचें कृत्य केलें आहेस, त्याचें कांहीं तरी प्रायश्चित्त तुला भोगलेंच पाहिजे, आणि तें हेंच कीं, मी तुला जसें सांगेन त्याप्रमाणें तुझें वर्तन झालें पाहिजे.

**सुभट** —( अंतर्यामीं पुनरपि यक्षिणीचें स्मरण होऊन, तिची मुक्तता करण्यास अजून मार्ग उरला आहे, असें वाटून किंचित् आनंद पावून ) काय आज्ञा आहे ?

**यक्ष०**—( सिंहनादाप्रमाणें गर्जना करून मोठ्यानें दटावून ) अधिक भाषण करण्याचें प्रयोजन नाहीं. तुझ्या मनामध्यें कसे कसे विचारतरंग उद्भवत आहेत, हें मी सर्व जाणत आहें. तुजला इतक्यांत हर्ष होण्याचें कारण काय झालें, हें मी जाणतों. पुनरपि तुझें चित्त त्या मीनाक्षीकडे धांव मारीत आहे, ही अत्यंत निंद्य गोष्ट आहे. जिच्यामुळें तूं आपले पंचप्राण सांप्रत संकटांत घातले आहेस, तिजवर तूं, दीपकज्योतीवर झडप घालून प्राणनाश करून घेणाऱ्या अज्ञान पतंगाप्रमाणें पुनरपि मन जाऊं देतोस ? धिःकार असो या गोष्टीला ! असो. माझी आज्ञा मान्य केल्यास, माझी सत्ता तुझ्या जीविनावर राहणार नाहीं इतकेंच तर काय, परंतु कोणत्याही प्रकारें यक्षिणीवर माझें वर्चस्व राहणार नाहीं. सर्व प्रकारें ती मुक्त झाली.

**सुभट**—क्षणोक्षणीं हे शब्द माझ्या मनांत आशेचा अंकुर उत्पन्न करतात, आणि तो लागलींच नष्ट करून टाकतात. मला वाटतें, ती आज्ञा इतकी भयंकर असेल कीं, ती माझ्यानें मान्यच करवणार नाहीं ! !

**यक्ष०**—( प्रचंड वादळाप्रमाणें ध्वनि काढून ) तुजला स्वतःच्या जीविताची जर कांहीं आशा असेल, तर तूं माझी आज्ञा मान्य करशील. माझी आज्ञा अशी आहे कीं, प्रथम तूं सात दिवसांचे आंत प्रतिष्ठान नगरी सोडून, एकदम अवन्ति नगरीचा मार्ग धरिला पाहिजे. दुसरें असें कीं, याउपरांत तूं यक्षिणीचें ह्मणून दर्शन न घेतलें पाहिजेस. तिसरें असें कीं,

तूं आपल्या समवेत देवांगनेस अवन्ति नगरीला न्यावें; आणि चवथें असें कीं, एक संवत्सरपावेतों या प्रतिष्टान नगरीच्या राजकार्यसंबंधांत तूं मन मुळींच घालतां कामा नये.

**सभट**०—(हर्षयुक्त होऊन आश्चर्यानें) आणि या सर्व आज्ञा मान्य करण्याचें वचन दिलें तर यक्षिणी सर्व पीडेपासून मुक्त होईलना? अशा वर्तनानें माझ्या कीर्तीस कालिमा लागत नाहीं, व माझ्या नांवाला दूषणही लागत नाहीं, करितां झालेल्या आज्ञा मजला मान्य आहेत. (एक विचार मनांत येऊन) देवांगनेला अवन्ति नगरीला घेऊन गेलें पाहिजे, ही आज्ञा मात्र माझ्या हातून मान्य होणें कठीण आहे; कारण तिजला देवीला अर्पण केली असल्यानें, तिनें येथें राहून जगदंबेची एकानिष्टभावेंकरून सेवा करण्यांत आपल्या जीविताचें सार्थक्य केलें पाहिजे.

**यक्ष**०—तिच्या जन्मदात्यांनीं तिला जरी परमार्थसाधन करण्याकरितां जगन्मातेस अर्पण केलेली आहे, तरी देवीनें त्यांतून तिची मुक्तता केली आहे, हें तूं जाणत नाहींस काय?

**सुभट**०—पुनरपि देवांगनेची मजला भेट होईल कीं नाहीं, याविषयीं मीं निश्चयात्मक कसें सांगावें? त्याचप्रमाणें मजला तिचें वसतिस्थानही ठाऊक नाहीं. इतकें असूनही तिच्या इच्छेविरुद्ध मी तिजला अवन्ति नगरीला घेऊन जाणार नाहीं. मला असेंही वाटत नाहीं कीं, ती होऊनच आपल्याला अवन्ति नगरीला घेऊन जाण्याविषयीं माझी विनंति करील.

**यक्ष**०—यासंबंधानें निरर्थक वाद करण्याचें प्रयोजन नाहीं. इतर सर्व आज्ञा तुला सर्वतोपरी मान्य आहेत कीं नाहींत? अवन्ति नगरीला तिजला घेऊन जाण्याकरितां तुला कोणत्याही प्रकार तिचें मन वळविण्याचें कारण पडणार नाहीं, मी निश्चयात्मक सांगतों.

**सुभ०**—तर मग मजला केलेल्या सर्व आज्ञा मान्य आहेत ; परंतु यक्षिणी—

**यक्ष०**—त्या सुंदरीनें तुजला पुर्वींच सांगितलें नाहीं काय कीं, माझी मनदेवता काय परिणाम झाला तें मजला तत्क्षणींच सांगेल ह्मणून ? या समरभूमीवर हा कालपावेतों जेवढें कांहीं घडून आलें, त्याविषयीं साकल्य वर्तमान तिच्या मनदेवतेनें तिजला जाणविलें आहे. अश्वावरून धरणीवर तूं जेव्हां पतन पावलास त्या समयीं तिजला झालेलें दुःख परमावधीचें होतें, परंतु सांप्रत तूं माझी आज्ञा मान्य केल्यानें तिजला परम हर्ष झाला आहे. तिच्या मुखांतून सारखें हरिस्मरण चाललें आहे. ( त्याच्या मुखासन्निध आपलें भयंकर मुख नेतो )

**सुभट०**—( परमभयाभीत होऊन ) काय ? तिच्या मुखांतून निघालेले शब्दोच्चारसुद्धां जाणतां, इतकी विलक्षण शक्ति आहे अं ! ! !

ह्याप्रमाणें त्याची अमानुष शक्ति पाहून व त्याचें विशाल भयानक मुख आपल्या अगदीं सन्निध आलें आहे असें पाहून, पुनरपि त्याचें हृदय भीतिग्रस्त झालें, व श्वासोश्वास मंद वाहूं लागला. त्यानें आपले नेत्र गच्च मिटले. त्याचें सर्व अंग पाषाणवत् जड होऊन अवयवांना पराकाष्टेची शिथिलता प्राप्त झाली. स्मरणशक्ति उत्तरोत्तर नाहींशी होऊन, आपणास कोणी खोलच खोल नेत आहे, असें त्यास वाटूं लागलें. सन्निध उभी असलेली यक्षाची भयंकर आकृति अधिक अधिक उग्रता धारण करून दीर्घ होत चालली आहे, असें त्यास वाटूं लागलें; नंतर असा भास झाला कीं, त्यानें आपल्या अश्वावर आरोहण केलें, व तीव्र अश्वगतीच्या योगानें उत्पन्न होणारे

त्याच्या खुराचे भूमीवर झालेले असंख्यात आघात कर्णें-द्रियावर पडून तो भयंकर यक्ष निघून गेला असावा. त्यांचा ध्वनि जसजसा मंद होत गेला तसतशी त्याची शुद्धि समूळ नष्ट होऊन भूमीवर तो जसा पतन पावला होता त्याप्र-माणेंच निचेष्टित पडला.

ज्या समयीं तो पुनरपि सावध झाला त्यासमयीं पाहतो तों, कोणी एक स्त्री आपल्या सर्व शरीराकडे वांकून निरखून पहात आहे, असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. या समयीं आकाश अगदीं निरभ्र होऊन तारांगणाचा प्रकाश बराच पडला होता. तथापि ती स्त्री कोण असावी हें त्यास जाणतां आलें नाहीं. प्रथमतः ती कदाचित् आपली प्रिय सुकुमारी यक्षिणी असेल असें त्यास वाटून त्यास फार आनंद वाटला; परंतु त्याची ती कल्पना लागलींच मिथ्या झाली; कारण प्रस्तुतच्या मुखक-मलाची गौरवर्ण प्रभा चांगली दृष्टोत्पत्तीस येत होती. यावरू-न तें मुखकमल त्या श्यामांगीचें नव्हतें हें उघडच झालें. नंतर त्यास वाटलें कीं, हें चंद्राप्रमाणें तेजोमय मुख कदाचित् देवां-गनेचें असेल. ही कल्पना त्याच्या मनांत किंचित् प्रवेश करते आ-हे नाहीं तोंच, अद्याप केवळ अपरिचित अशा त्या तरुणीनें आ-पल्या कोमल स्वरानें भाषण करण्यास आरंभ केला. आपल्या भाषणांत ममत्व प्रकट करून तिनें प्रश्न केला कीं, 'महाराज काय घायाळ झाले आहेत ? कारण येथें आपल्या सन्निध भा-ल्याचे दोन तुकडे दिसत आहेत त्यावरून या भयंकर स्थलीं नुकेंच दारुण युद्ध घडून आलें असावें असें मला वाटतें.'

**सुभट०**—(अडखळत अडखळत) अशा प्रसंगीं—इतक्या ममतेनें—आपण मजला आग्रहपूर्वक विचारतां, हें पा-हून माझ्या चित्तास परम समाधान वाटत आहे.

आपला माझा परिचय नसूनही, इतकी भूतदया आपण प्रगट करतां, हें पाहून हा जन आपला परम आभारी आहे. ( हळू हळू उठून बसून ) युद्धांत मी कांहीं घायाळ झालों नाहीं—परंतु माझें सर्व शरीर जोरानें भूमीवर आदळल्यानें बधिर झालें आहे. माझ्या शस्त्राचे युद्धामध्यें दोन तुकडे झाले, त्यामुळें शत्रूनें मजला अश्वावरून भूमितलावर पाडिलें.

**स्त्री०**—परंतु महाराजांचा अश्व कोठें दृष्टोत्पत्तीस आला नाहीं. प्रथम ज्या समयीं मी येथें आलें त्यावेळीं येथें मजला अश्व कोठें दिसला नाहीं; मला वाटतें तो कदाचित् उधळून गेला असेल.

**सुभट०**—( आपल्या सन्निध एक अश्व उभा आहे असें पाहून ) तर मग हा अश्व आपला आहे वाटतें ?

**स्त्री**—होय महाराज; तथापि महाराजांचे सेवेस तो उपयोगी पडेल. महाराजांनीं इच्छा असल्यास त्यावर आरोहण करून स्वगृहीं गमन करावें, अथवा ज्या स्थलीं महाराजांचें प्रस्तुत वास्तव्य असेल त्या स्थलीं जावें; परंतु त्यापूर्वी महाराजांनीं इतकेंच सांगावें कीं, येथून प्रतिष्टान नगरी किती अंतरावर आहे ?

**सुभट**—( अंगांत बरीच शक्ति येऊन ) अश्वारोहण करून गेलांत तर दोन घटका लागतील. या स्थलीं येऊन आपण किती वेळपावेतों माझ्या मूर्छित शरीराकडे ममतेनें पहात होतां ?

**स्त्री**—सरासरी घटका झाली असेल. ( मस्तकाकडे अंगुली दाखवून ) शिरस्त्राण काढण्याचा मीं प्रयत्न केला, परंतु तें काढण्याची विद्या मजला अवगत नसल्यानें तें काढतां आलें नाहीं. नंतर मी महाराजांच्या मुखांत किंचित् उदक घालून नेत्रांस लाविलें, ( संकोचवृत्तीनें ) मग महाराज सावध झाले.

**सुभट**—हा जन फार फार आभारी आहे. या जनाकडून

कोणत्याही रीतीनें कांहीं सेवा करून घेणें असल्यास हा जन सिद्ध आहे. मजला असें वाटतें कीं, आपल्या समवेत कोणी सेवकजन नसून, कोणी मित्रही नाहीं. रात्र तर अशी भयंकर ! ( आश्चर्यानें व आनंदानें )--पण मी हें काय अवलोकन करीत आहें ! !

**स्त्री**--( किंचित भय पावून ) महाराजांना काय वाटत आहे !--किंवा महाराजांच्या दृष्टीस फिरून--

**सुभट**--( मध्येंच ) हेंच तें मुख ! जें एकदां अवलोकिलें ह्मणजे हृदयांतून नाहींसें ह्मणून होणारच नाहीं ! !

याप्रमाणें सुभटवीर्य संदिग्ध भाषण करून त्या सुंदर मुखाकडे न्याहाळून पाहूं लागल्यानें ती तरुणी सलज्ज होत्साती अधोमुख करून उभी राहिली. अशा वर्तनापासून तिजला मुळींच कोप आला नाहीं; कारण या त्याच्या वर्तनांत कृत्रिमभाव अथवा कामिजनांच्या चित्ताची चंचलता मुळींच दृष्टोत्पत्तीस येत नव्हती.

**सुभट०**--मजला एकाएकीं इतकें आश्चर्य कां वाटलें याचें कारण मीं लागलीच न सांगतां आपल्यास किंचित् घोटाळ्यांत पाडलें, व त्यामुळें आपल्यास क्षणमात्र त्रास झाला याबद्दल हा जन अपराधी आहे. पण ही फारच चमत्कारिक रीतीनें गांठ पडली ! ज्या भेटीच्या योगानें आपण मजला अशा संकटसमयीं धीर दिलात, व मजला मूर्च्छेंतून सावध केलेंत, या योगानें आपण येवढेंच केलेंत कीं, मीं जसें आपल्याला कांहीं दिवसांपूर्वीं तस्करांच्या हातून मुक्त करून आपल्या मानलेल्या मातापित्यांच्या घरीं पोंचाविलें, त्या मीं केलेल्या उपकारांचें आज आपण पारणें फेडून टाकिलें. आतां मीं आपल्यास

पूर्णपणें ओळखिलें. आपलें आभिधान 'सत्यवती.' ईश्वराची करणी किती अगाध आहे !

**स्त्री०**—( आश्चर्यभरित होऊन ) महाराजांचें भाषण आतां माझ्या लक्षांत आलें. एकूण माझी त्या दुष्ट चंद्रसेनाच्या हातून महाराजांनींच मुक्तता केली ह्मणावयाची !

**सुभट०**—काय चंद्रसेनाचे हातून ? त्या चांडालानें का आपणास बलात्कारानें नेण्याचा प्रयत्न केला ? आणि माझे दोन हात त्या नीचाबरोबर का झाले ? तरीच त्यानें आमचें आदरातिथ्य इतक्या उत्तम तऱ्हेनें केलें ! मी दुर्गांत गेल्यावर त्यानें मला ओळखिलें, आणि मीं केलेल्या सत्कृत्या-बद्दल मजला योग्य शासन मिळावें ह्मणूनच, भित्र्याप्रमाणें त्यानें मजला दुर्गाच्या पूर्वेकडील खोलींत, जेथें पिशाच्यांचा उपद्रव फार आहे असें सांगतात, तेथें माझ्या शयनस्थलाची योजना केली होती. असो. प्रस्तुत त्यासंबंधानें विचारच करणें नाहीं. पण कायहो, आपणावर त्या वृद्ध सत्यजिता-चें व त्याच्या त्या सुशील भार्येचें अगदीं पोटच्या कन्ये-प्रमाणें ममत्व आहे. आणि असें असतां त्यांनीं आपल्यास अशा भयंकर रात्रीं समागमें कोणी न देतां प्रतिष्ठानास पाठविलें हें मोठें आश्चर्य आहे. त्यांच्यावर कांहीं बिकट प्रसंग तर येऊन ओढवला नाहींना ? कीं ज्याच्या योगानें त्यांचे प्राण––

**सत्य०**––(गहिंवर येऊन) माझीं मातापितरें कुशल आहेत. प्रतिष्टानास माझें कांहीं मोठें महत्वाचें काम––

इतकें अर्धें भाषण करूनच ती कुमारिका एकदम थांबली. तिच्या मनांत असा विचार आला कीं, या तरुण राजपुरुषाचा व आपला परिचय नसून–तो कदाचित्, महाराज वज्रदंष्ट्र यां-च्या पक्षाचा असला ह्मणजे आपले सर्वच प्रयत्न निर्फळ हो-

णार आहेत. प्रतिबंधांत टाकलेल्या त्रिवर्गांशीं हा कदाचित् वैर-भावानेंच वागत असेल; तस्मात् प्रतिष्टानास आपण काय हेतु धरून जात आहों, त्याचें याजपाशीं लवमात्र दिग्दर्शन करणें उपयोगी नाहीं; नाहीं तर सर्वच गोष्ट विलयास जाणार आहे.

सुभट०--( भाषणाच्या ओघांत ती मध्येंच थांबली असें पाहून) सत्यवती, आपल्या समागमें मिष्ट भाषणें करून आपल्या हृदयांतील गुप्त गोष्ट काढून घेण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. इतकेंच नाहीं, परंतु असें ज्यांचें वर्तन असेल त्या लोकांचीं मी अधमांत गणना करितों--आपण ज्याअर्थीं अशा राजक्रांतीच्या प्रसंगीं मोठ्या महत्वाचे कामीं चालला आहांत त्याअर्थीं आपलें वर्तन फारच सावधपणाचें असलें पाहिजे. अनेक प्रकारचे प्रसंग आपणावर येणार आहेत. आपलें वर्तन फारच पोक्तपणाचें व धूर्तपणाचें असलें पाहिजे. आपलें वय तरुण असून आपण सौंदर्यानें भूषित आहांत, यामुळें कोणत्या प्रसंगीं कसा प्रसंग येईल याचा नेम नाहीं. कोणाच्या भाषणावर आपण विश्वास ठेवूं नका. कोणत्याही संबंधानें कोणाशीं वादविवाद अथवा अतिपरिचय करूं नका. अशा रीतीनें वर्तन ठेविल्यास पुष्कळ संकटांचें आपोआप निवारण होईल.

या सद्बोधावर ती कुमारिका भाषण करणार होती इतक्यांत, घोड्याच्या टापांचा आवाज अगदीं आपल्या सन्निध येत असल्याचें त्यांच्या कानीं पडलें, व एका क्षणांत सुभटवीर्याचा अश्व मोठ्यानें खेंकाळत आपल्या धन्याच्या सन्निध येऊन उभा राहिला. तो सन्निध येतांच सुभटवीर्यानें त्याच्या अंगावरून हस्त फिरवून त्याजला गोंजारिलें. "हाच माझा अश्व" असें ह्मणून तो सत्यवतीस ह्मणूं लागला " आपली इच्छा

जर माझ्या सांगातीं प्रतिष्ठानास जाण्याची असेल तर चला आपण बरोबरच जाऊं."

**सत्य०**—महाराजांच्या आज्ञेप्रमाणें माझी सिद्धता आहे. मी मोठ्या आनंदानें महाराजांच्या समागमें प्रतिष्टान नगरींत येतें. ( इतकें बोलून तिनें मोठ्या चपलतेनें अश्वारोहण केलें. व त्या क्रियेंत आपली निपुणता आहे असें तिनें दर्शविलें. )

**सुभट०**—( अंगामध्यें शिथिलता प्राप्त झाल्यानें अश्वावर बसण्यास अंमळ वेळ लागत आहे इतक्यांत ) आपणास अश्वावर बसण्याचा परिचय चांगला आहे असें दिसतें व या प्रांताचें व इकडील प्रदेशाचें विशेष ज्ञान आहे असें वाटतें.

**सत्य०**—मातापित्यांची आज्ञा घेऊन निघाल्यास मजला आज आठ दिवस झाले. दुसरा जर कोणी असता तर मी निश्चयात्मक सांगतें कीं, तो तीन दिवसांत प्रतिष्टान नगरीला आला असता. निशीथसमयीं प्रवास करण्याची मला भीति वाटे, त्याचप्रमाणें अरुणोदयापूर्वींही मी मार्गक्रमण करीत नसें. एक सुद्धां दिवस असा गेला नाहीं कीं, ज्या दिवशीं ह्मणजे मी मार्ग चुकून आडरानांत गेलें नाहीं. समागमें मार्गदर्शक अथवा कोणी सेवकजन नसल्यानें पथिकाश्रमांत जी कांहीं माहिती मिळेल तेवढ्यावर दुसरे दिवशीं आमचें प्रयाण होणार. त्या धोरणावर आडरानांतून, भयंकर अरण्यांतून, दऱ्याखोऱ्यांतून आणि नदीनाल्यांतून मार्गक्रमण करीत मी येथपावेतों आलें. असें झाल्यानें विश्रांतिप्रीत्यर्थ अपरिचित स्थलीं राहणें भाग पडे; मग कृषीवलाची पर्णकुटिका म्हणा, किंवा अरण्यांतील एखादें आडोशाचें स्थल ह्मणा, किंवा निदान एखाद्या वृक्षाच्या मूलप्रदेशीं ह्मणा. मार्गांत भेटलेल्या पाथिकांनीं मजला तस्करांची अनेक प्रकारें भीति घालावी, अथवा अमूक स्थलीं

त्यांची वस्ती आहे ह्मणून सांगावें, त्यामुळें मजला मनुष्याची संगति मिळाल्याशिवाय पुढें जातां येत नसे ( किंचित् हास्य करून ) याप्रमाणें मजला इकडील देशाचें विशेष ज्ञान आहे. आणि आतां मार्गक्रमण करतां करतां मी अगदीं श्रांत झालें आहें.

**सुभद्र०**—( अश्वारोहण करून चालत असतां ) परंतु अशा भयंकर रात्रीं या समयीं आपण याच स्थलीं किंनिमित्त आलां ! आणि या अरण्यांत आपण कसा प्रवेश केला !

**सत्य०**—( आपला अश्व त्याच्या अश्वाच्या सन्निध मंदगतीनें चालवीत ) महाराजांनीं योग्य प्रश्न केला. काल सायंकाळीं सूर्यास्तसमयीं मी, सुदामपुरी ह्मणून एक लहानसें गांव येथून सुमारें एक योजन दूर आहे, तेथें एका वृद्ध ब्राह्मणाचे पर्णकुटिकेंत विश्रांति घेण्याकरितां थांबलें. तेथें वास्तव्य करून रात्र घालवावी असा माझा हेतु होता, व त्या ब्राह्मणाच्या स्त्रीनेंही मजला आग्रह केला, ह्मणून मीं अश्वाच्या निर्वाहाची व्यवस्था करून तेथेंच राहिलें. माझ्या आगमनानें त्यांना मोठा संतोष झाला; असें त्यांनीं दर्शविलें. भोजनाची सिद्धता त्यांनीं उत्तम प्रकारची केली, व आह्मीं त्रिवर्ग भोजनविधि आटोपीत असतां दुसरा एक पोक्त वयाचा गृहस्थ तेथें आला. तो मोठा कर्मठ ब्राह्मण दिसत होता. त्यानें सर्वांगास भस्माचें उद्धलन केलेलें होतें. भिवयांचे मध्यभागीं देवीचा अंगारा ह्मणून सिंदूरतिलक लाविल्यानें तो शक्तिउपासक असावा, असें प्रथमदर्शनीं मजला वाटलें. त्या वयोवृद्ध दंपत्यानें मोठ्या पूज्यबुद्धीनें त्याचें स्वागत केलें. त्यांच्या भाषणक्रमावरून परस्पर त्यांचा चांगला परिचय असावा असें मला वाटलें, कारण ते विशेष सलगीचीं भाषणें करीत होते. त्यानें

आपल्या भाषणाचे ओघांत 'रात्रौ येथें वस्ती करून प्रातःकाळीं मी प्रतिष्ठानास जाणार आहें' असें सहज दर्शविलें. 'आतांच गमन केलें असतें, परंतु आजची रात्र फारच भयंकर असून मेघावडंबरानें दिशा धुंद होऊन पर्जन्यवृष्टि होईल कीं काय, याचा नेम नाहीं.' त्याच्या या भाषणावर त्या वृद्ध ब्राह्मणानें उत्तर केलें कीं, 'या तरुण मुलीलाही तिकडेच जाणें असून ईश्वरकृपेंकरून तिजला अनायासेंच उत्तम संगति मिळाली.' हें भाषण श्रवण करून ऊर्णावस्त्रानें ज्यानें आपलें मस्तक आच्छादिलेलें होतें, असा तो पोक्त गृहस्थ मला अगदीं नखशिखांत निरीक्षण करून पाहूं लागला. पूर्वीं कधीं तरी त्याला मीं पाहिलें असल्याचें मजला स्मरण झालें, व मी मनांत विचार करूं लागलें. पण कांहीं केल्या मला स्मरण होईना; परंतु एवढी मात्र मनाची खातरी होऊन चुकली कीं हा सद्गृहस्थ नाहीं. त्याच्याकडे मी पहात नाहीं असें त्यानें जाणून, तो वारंवार माझें मुख न्याहाळून पाहूं लागला. त्याचें हें कृत्य तर मला फारच विपरीत भासलें. इतक्यांत तें वृद्ध दंपत्य कांहीं कामाकरितां आह्मांपासून दूर निघून गेलें; तेव्हां त्या शठानें मजशीं जणूं अति परिचयच आहे अशा रीतीनें भाषण करण्यास प्रारंभ केला. मोठ्या कुशलतेनें देवगिरिदुर्गाचें त्यानें नांव काढिलें. तें ऐकतांच मी एकाएकीं दचकलें. त्याच्या हें लक्षांत आलें. यावरून माझ्या ध्यानांत आलें कीं, बहुतकरून हा मजला जाणत असावा. मी अमुकच आहें, असें पूर्णपणें जाणण्यास्तवच हें नांव त्यानें काढिलें असावें. इतक्यांत या बकवृत्तिधारण केलेल्या साधूची आणि माझी पूर्वीं कोठें भेट झाली होती, तें एकदम माझ्या ध्यानांत आलें. महाराजांनीं एकवार माझी त्या तस्करांच्या हातून मुक्तता केली होती, परंतु पुनरपि त्या चांडाल चं-

द्रसेनानें मला आपल्या सेवकाकरवीं देवगिरिदुर्गांत बलात्कारानें चालविलें असतां, द्वारासन्निध मला हे पाशुपतदीक्षेचें धारण केलेले साधुजन भेटले. त्याच्या चरणीं मीं लीन होऊन विनंति केली कीं, 'या संकटांतून स्वामींनीं मजला मुक्त करावें.' त्यासमयीं त्यानें मोठ्या प्रेमानें केवळ हास्य केलें, आणि तेंही उपेक्षेनेंच केलें, आणि आपण दूर निघून गेला. हाच तो गृहस्थ असें माझ्या आतां पक्कें ध्यानांत आलें.

**सुभट**—परंतु त्याचें नांव काय ? हें आपण जाणतां कां ? अथवा त्या ब्राह्मणानें तरी त्यास कोणत्या अभिधानानें पाचारण केलें ?

**सत्य**०—ते त्यांना 'गुरुवर्य उत्पाताचार्य' या नांवानें पाचारण करीत होते.

**सुभट**—काय उत्पात ! त्या कपटपटु नराधमास मी चांगलें ओळखितों. त्या नीचानें मजशीं कापट्याचें वर्तन केलेलें आहे.–

**सत्य**०—तर मग माझा जो कांहीं तर्क झाला होता तो कांहीं मिथ्या नाहीं. असो. पुढें काय वृत्त झालें तें मी महाराजांस निवेदन करितें. हे गुरुवर्य कोण हें एकदम माझ्या ध्यानांत आल्याबरोबर माझ्या अंतःकरणांत भीतीचा उद्भव होऊन, मी भीतित्रस्त झाल्याचीं चिन्हें माझ्या मुखावर अगदीं स्पष्टपणें दिसूं लागलीं. त्यानें हें तत्क्षणींच जाणलें व ह्मणाला कीं 'आपण अन्योन्य कांहीं अपरिचित नाहीं, आणि मजसंबंधीं तुह्मीं तिळमात्रही भिण्याचें कारण नाहीं. उद्यां आपण मोठ्या आनंदानें प्रतिष्ठान नगरीला जाऊं. कोणत्याही रीतीनें आपल्यास मजकडून ताप पोहोंचणार नाहीं. प्रसंगोपात् आपल्यास शक्त्यनुसार मी साहाय्यच करीन.' हें त्याचें भाषण श्रवण करून मला मोठें आश्चर्य वाटलें, व चि-

त्यांत वाटलें कीं, अशा राज्यक्रांतीच्या कठीण प्रसंगीं, ज्यानें केवळ वरवर पाशुपतदीक्षेचें धारण केलेलें असा हा ढोंगी साधु माझें साहाय्य काय करणार ? अथवा संकटसमयीं काय रक्षण करणार ! हा माझ्या मनांत आलेला तर्क त्यानें तत्क्षणींच जाणला व ह्मणाला कीं, ' तुह्मास हा जो माझा प्रस्तुत वेष दिसत आहे, यासहित मी आपल्या समागमें येणार नाहीं. मी वेषांतर करणार आहें, ह्मणजे प्रसंगविशेषीं जरी कोठें युद्धप्रसंग प्राप्त झाला, तरी कांहीं अडचण पडणार नाहीं. ' या त्याच्या भाषणावर मीं कांहींच उत्तर केलें नाहीं. नंतर त्यानें मला प्रश्न केला कीं, 'प्रतिष्ठान नगरीस या समयीं तुह्मास जाण्याचें काय प्रयोजन आहे व त्या स्थलीं गेल्यावर ? तुह्मी कोणाच्या घरीं वास्तव्य करणार ? आपलें तेथें कोणी परिचित आहे किंवा नाहीं, नसलेंच तर काय करणार.' प्रथम केलेल्या प्रश्नाचें उत्तर मीं दिलेंच नाहीं. दुसऱ्या प्रश्नासंबंधानें मीं उत्तर केलें कीं, ' तेथें माझें कोणी परिचित अथवा आप्तस्वकीय नसून वसतिस्थल कोठें करणार, याविषयींही प्रस्तुत मला कांहींच सांगतां येत नाहीं.' या माझ्या भाषणावर तो एका महासाध्वी, धार्मिक आणि धनाढ्य अशा स्त्रीचे गुणानुवाद गाऊं लागला व म्हणूं लागला कीं, ' पाहिजे असल्यास त्या स्थलीं मी तुमची राहण्याची सोय करितों, कारण तिचा माझा विशेष परिचय आहे.'

**सुभट०**—( मन शंकित होऊन ) परंतु त्यानें त्या सन्मार्गगामी साध्वीचें नांव सांगितलें काय ?

**सत्य०**—त्या साध्वीचें नांव काय आहे, तें त्यानें सांगितलें नाहीं. त्यानें दिलेल्या आश्वासनाबद्दल मी आपली कृतज्ञता प्रगट करणार होतें, व त्या पूज्य पुण्यशील स्त्रीविषयीं

आणखी विचारपूस करणार होतें, इतक्यांत एक वृद्ध स्त्री तेथें आली. तिच्या मुखचर्येवरून व तिनें परिधान केलेल्या वस्त्रांवरून ती श्रीमान लोकांत वागणारी असावी, असें दिसत होतें. ती तेथें येतांक्षणींच गुरुवर्य एकदम उठले, व तीं उभयतां कांहीं गुप्त भाषण करण्याकारितां सन्निध असलेल्या एका खोलींत गेलीं. सारा दिवसभर मार्गक्रमण केल्यानें विश्रांति केव्हां मिळेल असें मला झालें होतें. तीं उभयतां जातांच, मी ज्या स्थलीं माझ्या शयनगृहाची सोय केली होती तेथें जाऊन निजलें. निद्रेनें माझे नेत्र किंचित् जड होतात नाहींत तोंच, मला वाटलें कीं, खोल स्वरानें कोणी कुजबुजत आहे. लागलीच मी खडबडून उठलें, व माझी ऐकण्याची इच्छा नसतांही तरी खोलीच्या भिंती अगदीं पातळ असल्यानें काय भाषणें चाललीं आहेत तें मजला सहज ऐकूं येऊं लागलें. ‘ वेषांतर करण्यास मीं वस्त्रें आणिलीं आहेत, ’ असे शब्द एका स्त्रीच्या मुखांतून बाहेर पडले. ‘ फार चांगलें ’ असे शब्द पुरुषाच्या मुखांतून आले, त्यासरसें हा स्वर गुरुवर्य उत्पात यांचाच आहे, हें मीं ओळखिलें. नंतर त्यानें प्रश्न केला कीं ‘ जिच्याविषयीं प्रतिष्ठानास तुह्मी शोध करण्याकरितां गेलां होतां, तिच्याविषयीं कांहीं शोध लागला किंवा नाहीं ? ’ नंतर उत्तर देणारी ती वृद्धच असावी अशी माझी खातरी झाली. तिनें उत्तर केलें कीं ‘ माझ्या श्रमाचें सार्थक झालें. या समयीं मालिनी प्रतिष्ठान नगरींतच आहे. गुरुमहाराजांची इच्छा असल्यास त्या स्थलीं जाऊन त्यांनीं आपला सूड उगवून घ्यावा ’.

मामिनीचें नांव सत्यवतीचे मुखांतून निघतांच, सुभटवीर्यास इतकें आश्चर्य वाटलें कीं, तो आपल्या अश्वावर कांहीं

कालपावेतों सारख्या उड्याच मारीत होता. त्याच्या नेत्रांपुढें एकदम महाराज वज्रदंष्ट्र व देवांगना, व देवालयांत घडून आलेला गुप्त प्रकार उभा राहिला. आश्चर्यानें अति चंचल झालेली ही त्याची दृष्टि अंधकार असल्यानें सत्यवतीच्या दृष्टोत्पत्तीस आली नाहीं. त्याची आतां पूर्णपणें खातरी झाली कीं, मालिनी आणि देवांगना या स्त्रिया दोन नसून, हीं दोन्हीं एकीचीच नांवें आहेत. सत्यवतीनें आपलें भाषण पुढें चालविलेंच होतें. तिच्या भाषणानें त्याची मुखचर्या क्षणांत आनंदित, क्षणांत हर्षयुक्त, क्षणांत क्रोधयुक्त व क्षणांत दुःखित होत गेली, हें तिला मुळींच समजलें नाहीं.

**सत्य०**---ह्याप्रमाणें त्या वृद्धेचें भाषण श्रवण करतांच, गुरुमहाराज हर्षभरित झाले. नंतर कांहीं वेळपावेतों, अगदीं अस्पष्ट भाषणें माझ्या कर्णीं पडत होतीं. शेवटीं त्या स्त्रीनें विचारिलें कीं, ‘ जरकरितां महाराजांच्या हातीं मालिनी सांपडलीच तर महाराज तिला कोणतें शासन करणार आहेत ?’ या प्रश्नावर त्या कुटिल साधूनें उत्तर केलें कीं ‘ असा कसा ज्ञानहीन मनुष्याप्रमाणें तूं प्रश्न करितेस ! देवीची तूं एकनिष्ट भक्त असून तुझ्या मुखांतून असा प्रश्न म्हणजे मोठें आश्चर्य आहे ! कालिमातेचा भक्ष्य कालिमातेला अर्पण करावयाचा; याशिवाय दुसरें शासन तिला कोणतें द्यावयाचें आहे ? ’ यावर त्यांचीं बराच वेळपावेतों एकांतीं भाषणें चाललीं होतीं, परंतु मजला पुढें श्रवण करण्याचें धैर्य राहिलें नाहीं. माझ्या मनांत एकदम भीति उत्पन्न झाली, आणि नानाविध कल्पनातरंग उद्भवूं लागले.

**सुभट**---कां बरें ! या भाषणानें आपल्यास भीति वाटण्याचें कारण काय ?

**सत्य०**—त्यानें ‘ कालिमातेचा भक्ष्य ’ हे शब्द मुखावाटे काढतांच, काय असेल तें असो, मला ते शब्द पराकाष्टेचे भयप्रद वाटले. कारण—

**सुभट**—आपल्या भाषणाचा आशय माझ्या ध्यानांत येऊन चुकला. मला वाटतें आपल्यास देवगिरिदुर्गाच्या भुयारांतील सर्व प्रकार अवगत आहे! त्याशिवाय—

**सत्य०**—परंतु महाराजांना सुद्धां हा सर्व प्रकार श्रुत आहे तर मग—इतक्यांत तिनें आपलें भाषण एकदम बंद केलें. तिच्या हृदयांत ती श्वेतवस्त्रेची मूर्ति एकदम उभी राहिली, त्यामुळें तिनें आपलें तोंड घट्ट मिटलें.

**सुभट०**—( गंभीर स्वरानें ) सत्यवती मजला तें स्थल कांहीं अपरिचित नाहीं. देवगिरि दुर्गाच्या पूर्वेकडील सर्व भुयारें मीं धुंडिलीं आहेत. मोठा आश्चर्ययुक्त व भीतिग्रस्त होत्साता देवी अंबिकेची भव्यमूर्ति मीं अवलोकिली आहे. इतकेंच नाहीं, परंतु तिच्या मस्तकावर असलेलें प्राणघातक चक्रयंत्र सुद्धां पाहिलें आहे! भाषण करीत असतां आपण एकाएकीं कां थांबला याचें कारण तरी हेंच असावें. मनांत उद्भवलेल्या भीतीनें आपल्याच्यानें एक अक्षरसुद्धां पुढें काढवेना दुसरें काय?

**सत्य०**—महाराजांचें भाषण सत्य आहे. एकाएकीं माझी वाचाच बंद झाल्याप्रमाणें झालें. चक्रयंत्राचा उपयोग काय आहे हें मजला जरी कळलें नाहीं, तरी पण माझा असा भाव होऊन चुकला होता कीं, त्या भवानीच्या मूर्तीचा आणि त्या यंत्राचा कांहीं तरी संबंध आहे—तें असो—याप्रमाणें त्या उभयतांचीं भयप्रद भाषणें श्रवण करून भीतिग्रस्त झालेल्या माझ्या मनास मीं क्षणभर धीर दिला, व किंचित् विचार करूं लागलें.

नंतर माझा निश्चय होऊन चुकला कीं, पाणी पिण्यासस्द्धां या- स्थलीं थांबावयाचें नाहीं. नंतर मजला असें वाटलें कीं हे सर्व खरें, परंतु मजला येथून इतक्या अपरात्रीं कोण जाऊं देईल ? मी एकटी काय करणार ? अशी मला मोठी चिंता प्राप्त झाली. पुढें कांहीं निमित्तानें मी घराबाहेर पडलें. तेथें आश्रमाच्या द्वारांतच एका वृद्ध कृषीवलानें शयन केलें होतें. त्यास मीं जागृत करून त्याच्या हातावर एक सुवर्णमुद्रा ठेविली, व या प्रसंगीं त्याचें साहाय्य मागूं लागलें. त्यानें तत्काल माझा अश्व सज्ज करून आणला. त्या- वर मी आरोहण केलें. व एका अर्ध घटकेंत एक कोशभर निघून गेलें. महाराजांनीं मजला प्रश्न केला होता कीं अशा भयंकर रात्रीं या अरण्यांत मी किंनिमित्त आलें ह्मणून ? आतां महाराजांच्या ध्यानांत माझें सकल वृत्त आलें असेल.

**सुभट**०–आपल्या भाषणक्रमावरून येवढें मात्र स्पष्ट दिसून आलें कीं, प्रतिष्ठान नगरींत आपलें कोणी परिचित नसून आपणास निवासस्थल, कसें मिळेल याची मोठी चिंता आहे. माझा येथें एक सुमित्र या नांवाचा धनिक चांगला परिचया- चा असून, त्याचा स्त्रीजन चांगला सुस्वभावाचा व सुविचारी आहे. आपली इच्छा असल्यास मी आपला त्यांचा परिचय करून देतों.

**सत्य**०—महाराजांनीं या जनावर पूर्वींच अपरिमित उप- कार करून ठेविले आहेत, आणि सांप्रतही होतच आहेत. महाराज जशी आज्ञा करतील तसें मी करीन.

**सुभट**—या गोष्टींत आपल्यास आभार प्रदर्शित करण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. आतां मी धरणीवर निचेष्टित पडलों असतां, सदयअंतःकरणानें आपण मजसन्निध येऊन माझ्या

मुखांत उदक घातलें, व भयंकर मूर्च्छेतून मजला शुद्धीवर आ-णलें. हें जें मजला आपण जीवदान केलें त्यांतून मी कसा उत्तीर्ण होईन ? याचा प्रत्युपकार माझ्या हातें कसा होणार ?

इतकें भाषण झाल्यावर त्यांनीं आपल्या अश्वांना किंचित् ग-ति देऊन तीं उभयतां एका घटकेंत प्रतिष्ठान नगरीच्या तटाच्या भव्यद्वारासन्निध येऊन पोंहोंचलीं. यासमयींही उभयतांच्या गमनास पूर्वीप्रमाणें प्रत्यवाय आला. या स्थलीं आतां दुसरा नगररक्षक आला होता. प्रज्वलित केलेली मशाल आपल्या हातांत घेऊन उभयतांचीं मुखें तो निरीक्षण करून पाहूं लागला. सुभटवीर्यानें हस्तांतून मुद्रिका काढून त्याचे हातीं दिली. ती तेजःपुंज रत्नजडित मुद्रिका प्रकाशांत धरतांच चमकूं लागली. त्या नगररक्षकानें आपला स्वामी महाराज वज्रदंष्ट्र याचीच ती मुद्रिका आहे हें तात्काल जाणिलें. नंतर त्यानें या उभयतांस मोठ्या नम्रतेनें प्रणाम केला, व प्रथम जितक्या आवेशानें त्यानें त्यांस प्रतिबंध केला होता, तितकाच तो आतां नम्र होऊन, त्याच्या वर्तनक्रमांत पराकाष्ठेचें मृदुत्व आलें.

आश्रमीं आल्यावर त्यांनीं सुमित्र धनिकास जागृत करून, त्याच्या विलासवती भार्येस पाचारण करविलें. तिनें सत्य-वतीचा फार उत्तम प्रकारें सत्कार केला. तिला ती अंतःपुरीं घेऊन गेली; व तिच्या सकल श्रमांचा परिहार व्हावा म्हणून, तिनें तिजला उत्तम शय्या करून दिली. सुभटवीर्य आपल्या शयनस्थलीं आला. त्यानें द्युमत्सेन व बृहत्सेन ज्या स्थलीं शयन करीत असत तेथें जाऊन पाहिलें तों ते उभयतां त्या स्थलीं मुळींच नव्हते. नंतर त्यास वाटलें कीं, ते उभयतां कदाचित् आपल्या आज्ञेप्रमाणें राजकन्या प्रभावतीच्या शोधांतच अजून

निमग्न असतील. अंगावर धारण केलेलीं कवचखड्गादि आयुधें त्यास स्वतःच काढावीं लागलीं. या समयीं त्यास अश्रांत श्रम झाले होते. तो लवकरच शय्येवर जाऊन पडला; परंतु त्यास गाढ निद्रा आली नाहीं. नुकाच घडून आलेला भयंकर संग्राम त्यास पुनरपि स्वप्नांत दिसूं लागला.

## शेवटचा प्रणिपात.

पुनरपि त्या भयंकर यक्षाचें व आपलें युद्ध चाललें आहे, आपण त्यामध्यें पराजित झालों, नंतर तो यक्ष आपल्यास वचनबद्ध करून घेत आहे, त्याचा प्रत्येक शब्द कर्णेंद्रियांत घुमत आहे, उपरांत सत्यवतीची व आपली गांठ पडते आहे, वगैरे सर्व घडून आलेले प्रकार अर्धवट निद्रेंत तो पाहूं लागला. अशा रीतीनें त्याचें चित्त अर्धवट निद्रेंत मग्न झालें असतां त्यास वाटलें कीं आपल्यास कोणी तरी जागृत करीत आहे. नेत्र उघडून पूर्णपणें जागृत होऊन पहातो तों, आपल्यासन्निध मंचकावर ती सुंदर यक्षकन्या बसलेली असून, क्षणोक्षणीं ती आपल्या मुखाकडे निरखून पहात आहे, असें त्यास दिसलें. हें पाहून त्यास परम आश्चर्य वाटलें, व क्षणमात्र आनंद झाला. परंतु या समयीं त्या सुंदरीचें मुखकमल सुकलेल्या कुमुदिनीप्रमाणें कोमेजून गेलेलें दिसत होतें.

अरुणोदय होण्याचा समय जवळ येत चालल्यानें दीपतेज मंद होत चाललें होतें. अशा मंद प्रकाशानें यक्षिणीच्या वदनावर आलेली निस्तेजता सुभटवीर्यास फारच दुःखद वाटूं लागली. या समयीं तिनें आपल्या केशकलापास एकत्र करून ग्रंथि दिलेली होती. अंगावर एकही भूषण धारण केलेलें नस-

ल्यानें, व श्वेतवस्त्रपरिधान केलेलें असल्यानें, ती वनवा-
सास निघालेल्या एखाद्या राजकुलोत्पन्न नवयुवतीप्रमाणें दिसत
होती. इतकें झालें होतें तरी तिचें सौंदर्य किंचित् सुद्धां कमी
झालेलें दिसत नव्हतें. सुभटवीर्याची व तिची दृष्टादृष्ट झा-
ल्याबरोबर, तिनें मंदहास्य केलें, त्यावरून आकुंचित झालेली
नील कमलिनी चंद्रोदयानें विकासच पावत चालली आहे कीं
काय, असें वाटूं लागलें. अशा उत्तररात्रीचे समयीं तिचें आ-
गमन झालें कसें, तस्मात् ही कांहीं मंत्रविद्या जाणत आहे, असें
सुभटवीर्यास वाटून त्याच्या मनांत भीति उत्पन्न झाली.

**सुभट०**—मी काय अवलोकन करीत आहें! यक्षकन्या
या समयीं येथें आली तरी कशी!!

**यक्षिणी**—होय महाराज, आपल्या या पायांची दासी य-
क्षकन्याच आहे; आणि आतां खरोखरच यक्षाच्या पीडेपासून
मी मुक्त झालें. महाराजांनीं मला संकटांतून मुक्त करून
जीवदान दिलें. महाराजांची मी आतां कशी उतराई
होईन! माझ्या हृद्रोगाचें महाराजांनीं निर्मूलनच
करून टाकलें. हा कालपावेतों मी त्या शिवमंदिरांत भगवान्
पिनाकपाणि याची आराधना करीत बसलें होतें. काल दि-
वसभर उपोषित असून मी शुचिर्भूत राहिलें होतें. महाराज
अश्वावरून भूमीवर पतन पावले, हें मजला अंतर्यामीं कळतांच
माझे पंचप्राण व्याकूळ झाले. मी श्रीशंकराच्या पिंडीवर आ-
पला मस्तक आपटून—महाराजांचे प्राण संकटांत घालण्यास
मीच कारणीभूत झालें ह्मणून—अनेक तऱ्हेनें स्वतःची निर्भ-
र्त्सना करून घेऊं लागलें. इतक्यांत अंतर्यामीं मजला किंचित्
धीर येत चालला. वादळानें खवळलेला सागर जसा कांहीं
काळानें थंड होऊन शांत दिसूं लागतो, तसा मजला प्रथम

आलेला दुःखाचा हुंद्का नाहींसा झाल्यावर माझें मन शांत झालें. अंतर्यामीं मजला कळूं लागलें कीं, मी मुक्त झालें. आतां कोणत्याही प्रकारें यक्षाची मजवर सत्ता उरली नाहीं. हें पाहून मजला हर्ष होत चालला. या असंख्य उपकारांबद्दल महाराजांस आपली कृतज्ञता प्रकट करावी, ह्मणूनच मी या समयीं येथें आलें. उदईक सूर्योदय होण्याचे पूर्वी मजला माझे जन्मभूमीकडे एकदम प्रयाण केलें पाहिजे. आतां पुनरपि या दासीला या पायांचें दर्शन होणें नाहीं. यक्षाच्या आज्ञेप्रमाणें महाराजांस मी आतां शेवटचाच प्रणिपात करण्याकरितां आलें आहें. ( कंठ दाटून येऊन अश्रु ढाळून. )

**सुभट०**—काय शेवटचा प्रणिपात! यक्षिणी, तूं ह्मणतेस तें सत्य आहे, कारण मलाही त्याची आज्ञा तशीच आहे. आपणा उभयतांची आतां जिवांतजीव आहे तोंपावेतों भेट होणार नाहीं. आतां या समयींही मजला तुला भेटण्याची त्याची आज्ञा नाहीं, फिरून मीं तुझें दर्शनच घेऊं नये अशी त्यानें मला निक्षून आज्ञा केली आहे.

**यक्षिणी**—प्रस्तुतच्या भेटीसंबंधें महाराजांस चिंता करण्याचें प्रयोजनच नाहीं. मी होऊन महाराजांचें दर्शन घेण्यास्तव आलें आहें. यामध्यें दोषास पात्र मी आहें. याचा बोल महाराजांकडे नाहीं. यक्षाच्या आज्ञेचें उल्लंघन माझे हातून झालें आहे. मीच होऊन आपली कृतज्ञता प्रकट करण्याकरितां, आपलें मित्रत्वाचें प्रेम दर्शविण्याकरितां, आणि आपले ठायीं माझ्या मनाची असलेली एकनिष्ट भक्ति प्रदर्शित करण्याकरितां आलें आहें. ( सलज्ज ) महाराजांच्या ठिकाणीं असलेल्या प्रीतीनें मजला बद्ध करून येथें आणलें आहे!

**सुभट०**—( कानावर हात ठेवून मोठ्या निष्ठुरतेनें ) य-

क्षिणी, प्रीति, प्रेम, या शब्दांचा नुसता शब्दोच्चारसुद्धां माझें कर्णेंद्रिय श्रवण करीत नाहीं; कारण या तुझ्या प्रेमांत माझें मन किंचित् मात्र लुब्ध झालें नाहीं तोंच, त्याचा केवढा भयंकर परिणाम घडून आला! ज्याच्या योगानें माझ्या आशेची निराशा झाली, जयाचा अपजय झाला, सुकीर्तीची अपकीर्ति झाली, आणि यावज्जन्म मनास खिन्नता प्राप्त झाली!! समर करण्यास जाण्याच्या पूर्वींच अंतर्यामीं या प्रेमांकुराचा उद्भव होत चालला असें मजला वाटत होतें, आणि शेवटीं तेंच झालें. ( निराशयुक्त तिचा कोमळ हस्त धरून ) माझें प्रेम या जिवावर किती होतें, आणि अद्यापिसुद्धां किती आहे, याची कल्पना मनुष्यमात्रास करतां येणार नाहीं; आणि या माझ्या प्रेमानेंच मजला अपयश प्राप्त झालें, व त्या यक्षास विजयश्रीनें माळ घातली! या प्रेमाच्या योगानें माझी वीरश्री नष्ट झाली, माझें धैर्य गलित झालें, आणि गात्रें विगलित होऊन आरोहण केलेल्या अश्वावरून भूमितलावर मी पतन पावलों!! त्या दारुण प्रसंगीं या माझ्या देहांतून प्राणोत्क्रमणच झालें असतें!!! परंतु त्या दुष्ट यक्षाच्या तावडींतून तुझ्या जिवाची सर्वस्वी मुक्तता झाली ह्मणूनच माझे मनास समाधान वाटून अपयश आल्याचा मला विशेष खेद वाटत नाहीं. ( गहिंवर येऊन ) यक्षिणी, आतां तूं जाणार ना! प्रतिष्ठान नगरी, तिच्या सभोंवतीं असलेली वनश्री, ही परमपूज्य दक्षिणवाहिनी गोदावरी, या सर्वांचाच तुला त्रास आला अं!! आतां तूं मगधदेशास जाऊन तेथें आपल्या आयुष्याचे दिवस आनंदांत घालविशील, परंतु या तुझ्या वियोगजन्य दुःखानें या जनाची काय अवस्था होईल याची तुला कल्पना तरी करितां येईल काय? मला सर्वत्र उदास भासेल, याजबद्दल तुला कांहींच वाटत नाहीं काय?

**यक्षिणी**—असें का महाराजांस वाटतें ? आणि असें जर मजला वाटत असतें तर मी या प्रसंगीं महाराजांचें दर्शन घेण्यास तरी आलें असतें काय ? असो. माझ्या वियोगापासून उत्पन्न होणारी उदासीनता, अंशतः कमी व्हावी म्हणून, महाराजांस माझी एक विनंति आहे. महाराजांचें मजवर प्रेम असल्यानें माझ्या या विनंतीला मान मिळेल यांत संदेह नाहीं.

**सुभट०**—( उतावीळपणानें ) यक्षिणी, कोणती विनंति ? किंवा दुसऱ्या कोणत्या संकटांतून तुझी मुक्तता करणें आहे ? त्याची या जनास आज्ञा कर. मीं पूर्वीच सांगितलें आहे कीं, तूं मजला या माझ्या प्राणापेक्षांसुद्धां प्रिय आहेस.

**यक्षिणी**—महाराजांवर पूर्वजन्मीं मीं अपरिमित उपकार केलेले आहेत, यांत संशय नाहीं. त्याच्याच योगानें महाराजांचे हातून सांप्रत हे प्रत्युपकार होत आहेत. आतांचें काम पूर्वीप्रमाणें विशेष धोक्याचें—कीं ज्याच्या योगानें महाराजांचे जीवितास अपाय होईल असें नाहीं. महाराजांचे चरणीं प्रस्तुत इतकीच विनंति आहे कीं, महाराजांनीं माझी प्रिय भगिनी जी देवांगना, तिचा सर्वस्वीं प्रतिपाल करावा. यक्षाची मजला अशी आज्ञा आहे कीं, तिची व माझी पुनरपि भेट होऊं नये. आतां माझी तिची ताटातूट झाली ( जलभरित नेत्रांनीं ) हा आम्हां उभय भगिनींचा होणारा वियोग आह्मांस परम दुःसह होणार आहे! माझ्या प्रिय भगिनीची आणि माझी पुनरपि आतां गांठ पडून आह्मी एकत्र रहावें, असा सुदिन केव्हां येणार हें एक परमेश्वरासच माहीत. परंतु महाराजांनीं जर या माझ्या निराश्रित भगिनीचा सांभाळ करण्याचें मजला वचन दिलें, तिच्यावर महाराजांनीं प्रेम ठेविलें, तर मजला विशेष

दुःख न वाटतां प्रयाणकालीं मी मोठ्या आनंदानें आपल्या प्रिय भगिनीची जाण्यास आज्ञा घेईन.

**सुभट०**—( याप्रमाणें यक्षाच्या आज्ञेप्रमाणें तर आपल्यास कर्तव्यच आहे, व हिचेंही ह्मणणें असेंच आहे, हें मनांत आणून ) यक्षिणी, तूं तिळमात्र दुःख करूं नकोस, हें घे वचन ( वचन देतो. )

**यक्षिणी**—( कृतज्ञतेनें व सप्रेमांतःकरणानें ) महाराजांचे मजवर अगणित उपकार झाले. परमेश्वरा, याची फेड मी कशी करूं ? आज माध्यान्हकालीं महाराजांनीं श्रीगोदेच्या तटाकीं दक्षिणभागीं जी मोठी उद्यानभूमिका आहे तेथें जावें. तेथें देवांगना महाराजांचें दर्शन घेऊन आपले हेतु प्रकट करील. आतां मी महाराजांस शेवटचा प्रणिपात करून महाराजांचा निरोप घेतें.

ह्याप्रमाणें नेत्रांस आंसवें आणून प्रेमयुक्त भाषण करून ती तरुणी त्या स्थलापासून जाण्यास एकदम निघाली. सुभटवीर्यानें तिनें क्षणेक तेथें थांबावें ह्मणून तिचा हस्त धरून क्षणमात्र आग्रह केला; परंतु तिनें मान्य केलें नाहीं. आपल्या मुखावर व सर्व शरीरावर तिनें कृष्णवस्त्र आच्छादून घेतलें, व जातांना एकवार प्रेमदृष्टीनें त्या वीरपुरुषाकडे अवलोकन करून, एकाएकीं ती त्या शयनमंदिरांतून अदृश्य झाली. ती जातांच, जिचा मंदप्रकाश पडला होता अशी ती दीपकज्योति एकदम लयास गेली, व त्या शयनस्थलीं सर्वच अंधार पडून जिकडे तिकडे शांतता भासूं लागली. आपणास हें स्वप्न पडलें किंवा आपण जागृतच आहों, याविषयीं सुभटवीर्यास क्षणोक्षणीं शंका वाटूं लागली. तो मंचकावर उठून बसला व आ-

पलें मस्तक करतलानें क्षणमात्र दाबून धरून भ्रमित झालेली आपली चित्तवृत्ति स्थिर करूं लागला. जितका जितका तो घडलेल्या गोष्टींविषयीं अधिक विचार करूं लागला, तितका तितका त्यास घडून आलेला सत्य प्रकार मिथ्या भासूं लागला. शेवटीं कंटाळून जाऊन पुनरपि त्यानें मंचकावर शयन केलें. लवकरच त्यास गाढ निद्रा लागली.

प्रातःकाळीं उठून पाहतो तों, वातायनद्वारें सूर्यकिरणें आंत येऊन त्या शयनमंदिरांत जिकडे तिकडे प्रकाश पडलेला आहे. आपणास उठण्यास विलंब झाला हें पाहून तो खडबडून उठला. इतक्यांत त्याच्या ध्यानांत आलें कीं, रात्रीं जेव्हां आपण शयन केलें त्यासमयीं वातायनद्वारें बंद केलेलीं होतीं, असें असतां सांप्रत एकच द्वार उघडलेलें कसें दिसतें ! मंचकावरून खालीं उतरून तो द्वारासन्निध येऊन पहातो तों, त्यास भूमितलावर नितंबभागानें खोल गेलेली पदपंक्ति उठलेली आहे असें दिसलें. हें अवलोकन करतांच त्याची भ्रांति दूर झाली, व तत्क्षणींच ध्यानांत येऊन चुकलें कीं, या द्वारासन्निधच यक्षिणी एकाएकीं अदृश्य झाली; तस्मात् तिनें याच द्वारांतून गमन केलें यांत संशय नाहीं.

नंतर तो ज्या स्थळीं त्याचे शरीररक्षक शयन करीत असत तेथें आला. तेथें येऊन पहातो तों, ते उभयतां मंचकावर नसून मंचकावर पसरलेलीं स्वच्छ वस्त्रें अस्ताव्यस्त न होतां, तशींच्या तशींच होतीं. त्यावरून रात्रीं ते परतच आले नाहींत असा तर्क होऊन त्यास वाटलें कीं, ते कदाचित् राजकन्या प्रभावतीच्याच शोधार्थ गुंतले असावेत. परंतु त्यांच्यावर एखादें प्राणसंकट तर ओढवलें नसेलना ? असा तो आपल्या मनाशीं विचारूं लागला. त्यानें निश्चय केला कीं, आतां ते

पुनरपि आश्रमीं आल्यावर त्यांना कळवावयाचें कीं, आपणास प्रभावतीच्या वसतिस्थानाचा शोध करण्याचें कारण नाहीं; कारण यक्षास वचन दिल्याप्रमाणें एक संवत्सरपावेतों इकडील राजप्रकरणांत मन घालतां कामा नये.

स्नानादि प्रातर्विधि आटोपल्यावर उपहार करून त्यानें वस्त्रें धारण केलीं. नंतर तो विलासवतीस जाऊन भेटला व सत्यवतीविषयीं कुशलवृत्त पुसूं लागला तों त्यास असें समजलें कीं, प्रातःकाळींच ती बाहेर निघून गेली, इतकेंच नाहीं, परंतु आपण कोणत्या समयीं परत येऊं याजबद्दलही तिनें निघतांना कळविलें नाहीं. ती या नगरींत अपरिचित असल्यानें, तिचें हें वर्तन सुभटवीर्यास क्षणमात्र मोठें खेदास्पद वाटलें.

या नरजन्मामध्यें येऊन जन्मकालापासून तों कृतांताच्या भक्ष्यस्थानीं पडेपावेतों, ज्यानें आपलें आयुष्य सुखांत घालविलें आहे, असा प्राणी एक तरी सांपडेल काय? रावापासून तों रंकापर्यंत विचारपूर्वक दृष्टि फिरविली ह्मणजे सर्वत्र शोक, निराशा, मत्सर, द्वेष, असत्यता, लक्ष्मीप्राप्तीसाठीं अघोर कर्में, राजवैभव प्राप्त करून घेण्यास्तव एकमेकांच्या प्राणांचे बळी घेणें, सुंदर ललना प्राप्त व्हावी ह्मणून अपरिमित द्रव्याचा कुमार्गीं व्यय, व आप्तवर्गांची छलना हीं दिसून येतात. आज मी मी ह्मणून नाना प्रकारचीं गर्वोक्तीचीं भाषणें करणारे, द्रव्यमदाचा अथवा राज्यपदाचा ताठा चढलेले उद्यां हीन दशेला येऊन, अथवा पदभ्रष्ट होऊन दारोदार हिंडावयास लागतात. रावणासारखे महा पराक्रमी, कीं ज्यांच्या घरीं वैश्रवणाप्रमाणें संपत्ति, सकल सुर ज्यास शरणागत होऊन ज्याचे दास बनून गेलेले आहेत, श्रीशंकरासारखें दैवत ज्याला प्रसन्न, कुंभकर्णासारखा महा पराक्रमी भ्राता, इंद्रजितासारखा

पुत्र, अशी स्थिति असून काल फिरला तेव्हां सर्व लयास जाऊन प्राणास मुकावें लागलें. हेंही असो. त्याला एक दुष्टबुद्धि उत्पन्न झाली ह्मणून त्याला योग्य फळ अथवा शासन मिळालें. परंतु हरिश्चंद्र, नलराजा, श्रीरामचंद्र व राजा धर्म, कीं ज्यांची सुकीर्ति दुंदुभीप्रमाणें त्रिलोकीं गाजत राहिली आहे, व पुढें ही कल्पांत होईपावेतों राहणारच, त्यांनासुद्धां दैवगतीनें वनवासास जाऊन, अंगावर शहारे उत्पन्न होऊन नेत्रांवाटे उदकाचे पूर वाहूं लागतात, असे क्लेश सोसावे लागले ! तस्मात् आह्मां क्षुद्र मानवांचा काय पाड ? परंतु सांप्रत आपण जिकडे तिकडे काय पहातों ? वर निर्दिष्ट केलेल्या अतुल पराक्रमी, नृपश्रेष्ठांत कांहींच जीव नाहीं. राजलक्ष्मी तर दासीप्रमाणें आमच्यापुढें उभी आहे, धर्माप्रमाणें आमचें मन शांत असून कर्णाप्रमाणें आह्मी दानशूर आहोंत, बृहस्पतीप्रमाणें आम्ही बुद्धीचे सागर असून आमच्या वाणीचे ठायीं सरस्वती वास करते आहे, आमच्या पराक्रमाचें तेज सूर्याप्रमाणें सर्वत्र पसरलें असून,यमाप्रमाणें आमचा कोप दारुण आहे, इतर सर्वत्रांना हीन दशा प्राप्त झाली, परंतु आमचें राजकारस्थान पाया शुद्ध असल्यानें कधीं ढासळणारच नाहीं. अशा प्रकारच्या व्याजोक्ति सर्वत्र ऐकूं येतात.

सुभटवीर्यास अशी खिन्नता कधींच प्राप्त झाली नव्हती. त्याच्या मनाची सुप्रसन्नता यासमयीं अगदीं नष्ट झाली. रात्री युद्धामध्यें पराजय–ज्यामध्यें आपला सर्वस्वी अपमान अशा त्या दुष्ट यक्षाच्या आज्ञा मान्य करणें–त्या सुंदर श्यामांगीचें पुनरपि दर्शन होणें नसल्यानें प्राप्त झालेली विरहव्यथा व वियोगजन्य दुःख–द्युमत्सेन व बृहत्सेन यांच्यावर कांहीं प्राणसंकट आलें आहे कीं काय याची सबल चिंता–व आतां अव-

न्ति देशास निराशेनें परत जाणें, या सर्व गोष्टी मनांत येऊन त्यास असें वाटलें कीं, सांप्रत आपल्यास ग्रहदशेनें पूर्ण व्यापिलें असून चोहोंकडून संकटें ओढवलीं आहेत. नंतर तो निराशेनें तसाच मंद मंद पावलें टाकीत विश्राममंदिरांतून गंगेच्या तटाकीं असलेल्या उपवनांत जाण्याकरितां बाहेर पडला. तेथें तो क्षणमात्र देवांगनेची मार्गप्रतीक्षा करीत नदीतीरानें हिंडत असतां, त्यास एकाएकीं कोणी एक सुंदर स्त्री पाण्याच्या ओघासरसी वेगानें वाहात आहे असें दिसलें. त्यानें तें सुंदर मुख तात्काळ ओळखिलें–एकदम सत्यवतीची मूर्ति त्याच्या हृदयांत उभी राहिली. निमिषार्धांत त्यानें तिला वांचविण्याकरितां मोठ्या वेगानें गंगेंत उडी घालून तीरासारखा तो तिच्या सन्निध गेला.

## आत्महत्या.

उदकाच्या ओघासरसी वाहात असतां सत्यवतीनें सुभटवीर्यास तीरावर उभा असलेला पाहिलें. तिनें त्यास तात्काळ ओळखिलें. आपले प्राण आतां खचित वांचतात अशी तिला आशा उत्पन्न होऊन, तिनें आपले दोन्ही हात बाहेर काढले, व धावन्या धावन्या किंकाळी फोडली. यासमयीं ती धारेंत सांपडल्यानें अति वेगानें वाहात वाहात, सुभटवीर्याच्या अगदीं जवळून निघून गेली.

आपल्या सबळ भुजांनीं पाणी तोडीत तोडीत मत्स्याप्रमाणें अतितीव्र गतीनें तो त्या कुमारिकेच्या अगदीं सन्निध गेला, व आतां तिचें वस्त्र धरणार तोंच, ती सुंदरी अंतर्धान पावल्याप्रमाणें एकाएकीं तळीं गेली. तिच्या मागोमाग सुभटवीर्यानें तळाशीं सुरकांडी मारिली, परंतु ती हाताला लागली नाहीं.

निराश होऊन तो वर आला इतक्यांत पुनरपि बऱ्याच अंतरावर ती बाहेर आली, व आणखी एकवार तिनें दुःखानें किंकाळी फोडली. ती कठोर किंकाळी कानावर येऊन आदळतांच व पुनः एकवार तिला पहातांच, मोठ्या अमानुष वेगानें धारेंतून बाहेर पडून ज्या स्थलीं ती दृग्गोचर झाली होती तें स्थल ध्यानांत धरून तिचे प्राण वांचविण्यास तो धांवला. पुनरपि ती कुमारी दिसेनाशी झाली. मग मात्र त्याची खातरी होत चालली कीं, आतां ती फिरून वर येणार नाहीं. आणखी एकवार त्यानें तिच्या मागोमाग बुडी मारिली.

ईश्वराची करणी अगाध आहे. बुडी मारतांच तिचा वस्त्रपल्लव त्याच्या हातांत आला. त्याला पराकाष्ठेचा आनंद होऊन त्यानें तिजला वर उदकाच्या पृष्ठभागीं आणलें. तिची शुद्धि नष्ट झालेली होती. तरी त्यानें तशीच तिजला उचलून धरून तीरावर आणून ठेविलें. वारंवार तो तिच्या निस्तेज वदनाकडे न्याहाळून पाहूं लागला. परंतु श्वासोच्छ्वास बंद होऊन, मुखावर पांडुरता येऊन तिचें शरीर गतप्राण झालें असावें असें त्यास वाटलें. इतके श्रम करून व्यर्थ झाल्यानें त्यास पराकाष्ठेचें दुःख वाटूं लागलें. कांहीं उपाय सुचेना. एखाद्या संगमरवरी पाषाणपुतळीप्रमाणें सर्व शरीर निर्जीव होऊन ती त्याच्या सन्निध पडलेली होती. अशा सुंदर कुमारीस अशा रीतीनें अकालीं मृत्यु आला म्हणून, सुभटवीर्याचें कोमल अंतःकरण गहिंवरून त्याचीं विशाल नेत्रकमलें जलभरित झालीं. शेवटचा उपाय ह्मणून त्यानें तिचा केशकलाप पिळून तिचे उभय बाहू आपल्या हातांत गच्च धरून तो चक्राकृति तिच्या देहास भोंवाडूं लागला. नंतर तिचे आंख आपल्या हातानें जोरानें मर्दन करून उष्णता यावी ह्मणून तिचीं

उभय हस्तकमलें त्यानें स्वहस्तांत दाबून धरिलीं. गरगर फिरविल्यानें तिला उमदळून येऊन तिच्या मुखांतून पुष्कळ पाणी पडलें, व उदर हलकें होऊन ती किंचित् शुद्धीवर आल्याचीं चिन्हें दर्शवूं लागली.

मंद गतीनें उरोजभाग उंच सखल होऊं लागला, गालांवर किंचित् रक्तिमा येऊं लागली, ओष्ठप्रांत स्फुरण पावूं लागला, जड झालेल्या हस्तपादादि अवयवांत चलन दिसूं लागलें, व नेत्रकमलें उघडण्यास ती सुंदरी प्रयत्न करूं लागली, हें पाहून त्या उदार पुरुषास परम संतोष वाटून बारीक दृष्टीनें तो तिच्या मुखाकडेस निरखून पाहूं लागला. मंद व जड झालेल्या दृष्टीनें ती कुमारिका त्याच्या मुखाकडे पाहूं लागली. सुभटवीर्यानें ममतेनें भाषण करतांच, तिचे ज्ञानतंतु जागृत होऊन, सकल स्थिति तिच्या ध्यानांत आली. आपण नदींत कसे पतन पावलों, या संकटांतून आपली कोणी मुक्तता केली व प्रस्तुत आपण कोणाच्या सन्निध भूतलावर पडलों आहों, हें सर्व तिच्या ध्यानांत आलें. त्याच्या मुखाकडेस ती अशा रीतीनें पाहूं लागली कीं, ज्या योगें तिनें आपली कृतज्ञता दर्शित केली.

इतक्यांत तेथें दुसरें कोणी आल्याची चाहूल सुभटवीर्यास वाटली. मागें वळून पाहतो तों, देवांगना आपल्या पृष्ठभागीं उभी आहे. उभयतांचीं वस्त्रे उदकानें ओथंबलीं असून थबथबां गळत आहेत, क्षणोक्षणीं सुभटवीर्य त्या तरुणीकडे निरीक्षण करून पहात आहे व ती शुद्धीवर येत आहे, असें पाहून त्यास पराकाष्टेचा आनंद वाटत आहे, असें पाहून क्षणमात्र देवांगनेस पराकाष्टेचें कौतुक वाटलें. परंतु लागलींच अशा तरुण स्त्रीशीं सुभटवीर्य एकांतांत पाहून, व निष्कारण त्या कु-

मारीवर तो प्रेम करीत आहे हें अवलोकन करून, देवांगनेच्या मनांत, स्त्रीजातीला अनुसरून, किंचित् मत्सर उत्पन्न झाला. जेव्हां तिनें त्या सुंदर स्त्रीच्या मुखाकडे निरखून पाहिलें, तेव्हां तिचा सौंदर्याभिमान किंचित् कमी झाला. नंतर तिनें शहाणपणानें मनांत उद्भवलेल्या दुष्ट भावनांचा क्षणमात्र त्याग करून, सुभटवीर्यास मोठ्या ममतेनें कुशलप्रश्न केले. अशा संकटसमयीं आपण आपल्या जिवलग मित्राचें साहाय्य केलें पाहिजे, हें मनांत आणून तिनें दोन तीन वेळां मोठ्यानें टाळी वाजविली; आणि एका क्षणांत त्या स्थळीं महाराज वज्रदंष्ट्र यांचे शरीररक्षक, सुबल आणि सुनीथ, व देवांगनेच्या सुंदर परिचारिका, वसुमती आणि सुमती, धांवत आल्या. हीं सर्व तेथें येतांच देवांगना आपल्या परिचारिकांस ( सत्यवतीकडे बोट दाखवून ) ह्मणाली, "तुह्मी उभयतां यांना आपल्या शिबिरांत घेऊन जाऊन, नूतन वस्त्रें परिधान करवा, व मंचकावर स्वस्थ निद्रा येईल असे उपाय करा. यांच्या जिवावरचें संकट गेलें असून, ईश्वरकृपेनें व महाराजांच्या साहाय्यानें, यानीं हा दिवस पुनः पाहिला आहे. परमेश्वर करील तर लवकरच यांच्या जिवास बरें वाटेल." नंतर त्या उभयवीरांना उद्देशून ह्मणाली, "महाराजांस घेऊन आपण आपल्या शिबिरांत जाऊन, हीं भिजून चिंब झालेलीं महाराजांचीं वस्त्रें काढून त्यांना उंची वस्त्रें परिधान करवा. ( मंदस्वरानें सुभटवीर्यास उद्देशून) महाराजांची मार्गप्रतीक्षा करीत मी येथेंच बसतें." यावर त्या उदार अंतःकरणाच्या वीरपुरुषानें उत्तर केलें कीं "हा जन यक्षिणीच्या आज्ञेनें येथें आला असून आपली मनीषा काय आहे तें ऐकण्याची उत्कट इच्छा आहे."

असें मधुर भाषण श्रवण करतांच देवांगनेस मो-

ठा संतोष वाटला. मंजुळ स्वरानें ती ह्मणाली, " महाराजांचें आह्मां उभय भगिनींवर महाकाष्टेचें प्रेम असून महाराजांच्या आह्मी फार ऋणी आहोंत." असें भाषण करीत असतांना मोठ्या सप्रेम दृष्टीनें ती तरुणी त्याच्या मुखाकडे पहात होती. नंतर सलज्ज होत्साती ती खालीं पाहूं लागली. मध्यंतरीं उभय परिचारिकांनीं सत्यवतीस उठवून उभें केलें. आतां तिला बरीच शक्ति आली होती. उभतांच्या स्कंधप्रदेशीं आपले हस्त ठेवून, मंद मंद पावलें टाकीत, देवांगनेच्या शिबिरांत सत्यवती जाऊं लागली. त्या उभय वीरांनीं मार्ग दर्शवितांच, सुभटवीर्य त्यांच्या मागोमाग निघून गेला. देवांगना नदीतटाकीं त्या उद्यानभूमिकेंतील वृक्षराजींत, आतां एकटीच राहिली.

त्या घनदाटवृक्षसमुदायांत बरेंच लांब पावेतों चालत आल्यावर एका स्थलीं ही सर्व मंडळी कांहीं काल स्थित झाली. त्या स्थलीं वृक्षांच्या गर्द छायेंत तंबू दिलेले होते. त्यांतील एका भव्य तंबूंत–ज्याला भरजरीच्या कनाथा लाविलेल्या असून ज्यावर नाना प्रकारच्या चित्रविचित्र रंगांच्या वेली काढिलेल्या होत्या–अशा तंबूंत वसुमती व सुमती सत्यवतीला घेऊन गेल्या. त्याच्या सन्निधच दुसऱ्या एका तंबूंत सुभटवीर्यास ते उभय परिचारक घेऊन गेले. शिबिरांत गेल्यावर त्या उभय परिचारिकांनीं सत्यवतीचा केशकलाप वस्त्रांनीं कोरडा केला व उदकानें जड झालेल्या तिच्या मस्तकास शेकून, तिच्या विशाल भालीं केशर—कस्तुरीचा लेप केला. तिजकडून दुसरीं वस्त्रें परिधान करविलीं, व मंचकावर नेऊन तिजला निजविलें. इकडे या पुरुषद्वयांनीं मोठ्या सन्मानानें सुभटवीर्यास सुस्थलीं बसवून आपल्या संग्रहांत जीं अतिमौल्यवान् वस्त्रें होतीं,

तीं त्यास परिधान करण्यास दिलीं. वस्त्रें परिधान करून पुनरपि तो सत्यवतीनें शयन केलेल्या स्थलीं आला. तिजला तेथें निद्रा लागलेली पाहून, व आतां भिण्याचें कारण नाहीं असें जाणून, त्यास समाधान वाटलें. नंतर तो पुनरपि देवांगनेच्या भेटीस येऊं लागला. तो जाण्याच्या पूर्वींच सुबल व सुनीथ देवांगनेकडेस निघून गेले.

त्या उद्यानप्रदेशीं हंसाप्रमाणें मंद मंद गतीनें देवांगना चालत होती. तिनें आपली दृष्टि भूमितलाकडे लाविल्यानें तिचे कृष्ण कुंतल रविप्रकाशानें चमकत होते. त्यामुळें क्षणमात्र दुरून अवलोकन करणाऱ्या प्रेक्षकांस, तिनें आपल्या मस्तकीं चकचकीत मुकुटच धारण केला आहे कीं काय, असें वाटे. आपलीं विशाल नेत्रकमलें स्थित करून मंद गतीनें ती चालत असल्यानें, ती विचारांत अगदीं निमग्न झाली आहे, असें वाटत होतें. तिच्या मुखावर क्षणमात्र आनंद, क्षणमात्र चिंता, क्षणमात्र उदासीनता, व क्षणमात्र निराशेचीं चिन्हें व्यक्त होत होतीं. एकंदरींत या सयमीं तिची मुद्रा मुळींच सुप्रसन्न नव्हती, असें ह्मटलें तरी चालेल. यासमयीं तिजला एक नवीनच चिंता प्राप्त झालेली होती. ती मनांत ह्मणूं लागली, "ही सुंदर स्त्री कोण? गंगेंत उडी घालून ही का आत्महत्या करीत होती कीं काय? महाराज इतके सप्रेमांतःकरणानें तिची काळजी कां ह्मणून घेतात? पण मी तरी किती मूर्ख आहें! महाराजांनीं यक्षिणीवर माझें मन आहे, असें स्वमुखानें स्पष्ट बोलून दाखविलेलें असून, या त्यांच्या उदार वर्तनाला मी विनाकारण दूषित करीत आहें. यांत मजला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. थोर पुरुषांचीं मनें क्षणोक्षणीं बदलत नाहींत."

येणेंप्रमाणें सचिंतांतःकरणानें सुभटवीर्य ज्या स्थलीं पूर्वीं

बसलेला होता, व जेथें तिनें स्वमुखानें सुभटवीयांवर असलेलें प्रेम व्यक्त करून दाखविलें होतें, तेथें ती आली. 'यक्षिणीवर माझें प्रेम बसलें आहे' असें सुभटवीयानें भाषण केल्याचें तिला स्मरण झालें; त्याच्या योगानें तिची चित्तवृत्ति एका क्षणांत सुप्रसन्न होऊन, किंचित् कालपावेतों तिनें सस्मित वदन केलें. वृत्ति आनंदमय झाल्यानें मुखकमल शोभायमान दिसूं लागलें. कुमुदिनीप्रमाणें नेत्रकमलें विकास पावूं लागलीं. पुनरपि ती आपल्या मनांत ह्मणूं लागली "माझ्याप्रमाणें अस्थिर मनाची दुसरी कोणीही राजकन्या नसेल. पूर्व जन्मीचें माझें केवढें सुकृत उदयास आलें, कीं ज्याच्या योगानें अशा तरुण रूपसंपन्न गुणनिधानाचें मला दर्शन झालें, इतकेंच नाहीं तर त्यानें आपण होऊन आपल्या मनाची आतुरता प्रकट केली---जेव्हां तो दिवस येईल---मला आतां अगदीं धीर धरवत नाहीं--पण नाहीं-ज्या कालीं मीच होऊन महाराजांना--" इतक्यांत तिच्या सन्मुख एक वृद्ध स्त्री सन्निध असलेल्या वृक्षसमुदायांतून येऊन उभी राहिली. प्रथमतः देवांगनेची दृष्टि पदतलीं असून ती विचारांत गढून गेली असल्यानें ती वृद्धा तिच्या अगदीं सन्निध आल्याचें तिच्या लक्षांतच आलें नाहीं. ती वृद्धा दिसण्यांत ह्मणजे फारशी उग्र होती असें नाहीं; परंतु तिच्या मुखाकडे पहातांच देवांगना एकदम दचकली व एक दोन पावलें भूमि मागें सरली. त्या वृद्धेच्या मुखावर शांतता, गंभीरपणा व दृढ निश्चय, हीं पूर्णपणें दिसत होतीं.

**देवां०**—(रागानें संतप्त होऊन नेत्र लाल करून) अगे चांडाळणी नारदी, येथें तूं कशाला आलीस?

**नारदी**—मालिनी, तूं असें वेड्यासारखें काय आरंभिलें आहेस? अजून तरी तूं आमची दीक्षा धारण कर, ह्मणजे देवी

अंबिका तुझ्या उद्दामपणाच्या आचरणाबद्दल तुजला क्षमा करील.

**देवां०**—( भिवया वर चढवून एक हात हृदयाशीं धरून ) अगे दुष्टे, पापिष्टे, दुरात्मे, तुझ्या शक्तिउपासकांच्या हातीं मी जिवंत लागेन काय ? ( सर्व शरीर क्रोधानें कंपित होऊन ओष्टप्रांत स्फुरण पावत आहे अशा स्थितींत ) मुखावाटे एक शब्द काढूं नकोस. आतां या स्थलीं तूं माझें काय करशील ?

**नारदी**—( शांत चित्तानें ) इतकीं दुर्वचनें तूं मुखांतून काढतेस, परंतु देवी चंडिकेच्या प्रभावानें मला यत्किंचितूही कोप येत नाहीं. माझ्या मनावर तुझ्या अशा निष्ठुर भाषणाचा कांहींच परिणाम घडून येत नाहीं ! त्या एकाक्षाची संगति तूं सोडून दे, आणि ज्या ठिकाणीं तुझी इहपरलोकीं सुकीर्ति होऊन तुला उत्तम गति प्राप्त होईल तेथें तूं चल. देवी अंबेच्या चरणारविंदीं मस्तक ठेऊन तिची करुणा भाक. या समयीं मी तुला समागमें नेल्याशिवाय जाणरच नाहीं. वज्रदंष्ट्राच्या सैनिकांना मी भिणार नाहीं. देवीच्या सन्निध मीं अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, 'एक तर मी मालिनीला, तिच्या मातापित्यांनीं अर्पण केल्याप्रमाणें, तुझ्या चरणारविंदीं घालीन, नाहीं तर स्वप्राणांचें तुला अर्पण करीन.' माझी ही भयंकर प्रतिज्ञा असत्य होणार नाहीं, हें मी त्रिवार सांगतें. इतकें सांगून जर न आलीस तर—( भयोत्पादक मुख करून नेत्र वटारून ) बलात्कारानें तुजला मी घेऊन जाईन व तुझे प्राण देवीमातेला अर्पण करून सुकीर्ति मिळवीन; कारण अजून तूं कुमारी आहेस; तुझ्या मातापित्यांनीं दिलेल्या वचनाचा तूं असा भंग करूं नकोस.

**देवां०**—या भाषणानें मला क्षणमात्र तुझी दया येते,

नाहीं तर केव्हांच महाराज वज्रदंष्ट्र यांना सांगून मीं तुला शासन केलें असतें; येथून तूं चालती हो; मला मुख दाखवूं नको; नाहीं तर —

**नारदी**— तूं कोण मला आज्ञा करणार ? मी जिवावर उदार होऊन आलें आहें. हा निर्वाणीचा प्रसंग आहे. आतां मीं तुझ्या मणगटाला धरून ओढून नेली तर तूं काय करणार ?

या भाषणानें देवांगनेस दारुण संताप उत्पन्न झाला. तिचीं नासापुटें स्फुरण पावूं लागलीं.नेत्रांतून आतां अग्निकणांचीं वृष्टि होईल कीं काय असें वाटूं लागलें. अधरोष्ठ स्फुरण पावूं लागला. उरोज भाग उंच सखल होऊं लागला—तिनें मोठ्या संतापानें ह्मटलें.—

**देवां॰**—तूं हें कोणाशीं बोलत आहेस ? मी कोण आहें ? (नीविबंधनांत खोंचून ठेविलेलें एक बारीक बांकदार शस्त्र काढून तिला दाखवून ) हें पाहिलेंस काय ?

**नारदी**—( मुख हिंडीस करून, आसपास कोणी नाहीं असें पाहून, कावऱ्या बावऱ्या नजरेनें तिच्यावर एकदम आस्वलीप्रमाणें झडप घालून, तिचें शस्त्र हिसकावून घेऊन, तिचीं उभय करकमलें आपल्या एका हातांत धरून तिला फरफर ओढीत ) कोण आहेस तूं ? आतां तुला नेऊन जगन्मातेला अर्पण करतें ! तुझ्या रक्ताचें मातेवर सिंचन करितें ! ! नाहीं तर येथेंच याच शस्त्रानें देवी भवानीच्या नांवाचा जयघोष करून तुझ्या जिवाचा आतांच अंत करतें ह्मणजे झालें!!! इतकें भाषण करून ती कृतघ्न वृद्धा त्या सकलसौंदर्याच्या खाणीचा, संपूर्ण सद्गुणांच्या ठेव्याचा एकाच घायानें अंत करून, इहलोकींच्या स्त्रीरत्नाचा अंतच करणार होती; परंतु भवितव्यता दुर्वार असल्यानें ह्मणा, अथवा त्या कुमारिकेचें आयुष्य सब-

ळ असल्यानें ह्मणा, तसा प्रसंग घडून आला नाहीं. आपलें सकलबल एकवटून देवांगनेनें त्या कठीण हस्तांतून आपलीं सुकुमार करकमलें झटकन् हिसका मारून सोडवून घेतलीं. नंतर जीव घेऊन ती सैरावैरा पळूं लागली. मोठमोठ्या किंकाळ्या फोडूं लागलीं. अडखळून वारंवार भूमीवर पडूं लागली. तिच्या मागें ती वृद्धा धांवतच होती. तें दारुणशस्त्र तिनें हातांत धरलेलें होतें, व पिसाळलेल्या वाघिणीप्रमाणें त्या हरिणकिशोरचंचलनयनेच्या मागें लागली होती. शेवटीं तिला गांठून तिचा केशकलाप त्या वृद्धेनें आपल्या हातांत धरून हिसडा देऊन तिला भूमितलावर पाडलें, व दांत चावून भवानीचें नाम उच्चारून तिचें कंठनाल आतां चरचर चिरणार तोंच, त्या वृद्धेचा हात वरचेवर धरला गेला, व तिच्या बाहूस हिसडा मारून, एका चपेट्यासरसें तिजला भूमीवर उलथें पाडलें.

देवांगना गलितधैर्या होऊन प्रसंगावधान सोडणारी राजकन्या नव्हती; परंतु प्रस्तुतप्रसंगीं तिचा अगदीं निरुपाय होऊन ती निःशस्त्र झाली होती. तिच्या हातीं जरी शस्त्र असतें तरी प्राणघाताचें अघोर कृत्य तिनें सहसा केलें नसतें. मात्र स्वप्राणांचें उत्तम रीतीनें संरक्षण केलें असतें; प्रसंगानुसार धैर्य धारणकरून, युद्धपटुवीरांस सुद्धां चकित करण्यासारखें तिचें बल होतें; परंतु असें करण्यास तिजला कोणी तरी साहाय्यकारी अथवा उत्तेजन देणारा सन्निध लागत असे. सुभटवीर्यास वस्त्र परिधान करण्यास दिल्यावर, सुबल व सुनीथ हे उभयतां देवांगनेकडे परत यावयास निघाले. ते नेहमीं तिच्या आसपास त्या वृक्षसमुदायामध्यें, तिनें आज्ञा केल्यास, उभे राहात असत. ही चाललेली उभयतांची झटापट त्यांनीं दुरून अवलोकि-

ली, व वृक्षांतून लपत लपत येऊन पटकन् सुबलानें नारदीचा हात धरून तिजला भूमीवर पाडलें. देवांगना उठून उभी राहिली. तिनें त्या उभयय वीरांस आज्ञा केली कीं "या वृद्धेस याचक्षणीं घेऊन महाराज वज्रदंष्ट्र यांचेकडे जा, व झालेला वृत्तांत महाराजांना श्रुत करा; ह्मणजे हिला ते योग्य शासन करतील." या भाषणावर ती वृद्धा क्रोधाविष्ट होऊन बोलूं लागली, "त्या एकाक्षाचें मुख मी अवलोकन करणार नाहीं; इतकेंच नाहीं, परंतु घे तुला माझा दारुणशाप–तुजला पतिसमागमाचें सुख मिळण्यास अति क्लेश पडून तुझ्या जिवाला तीव्र यातना भोगाव्या लागतील. हे जगदंबे" ( इतके शब्द बोलून तिनें देवांगनेचें तीव्रशस्त्र उरांत भोंसकून घेऊन आत्महत्या करून घेतली व तत्काल प्राण सोडला ).

देवांगनेनें त्या उभय वीरांस अंमळ बाजूस जाण्यास सांगितलें, व ती चिंतातुर होत्साती त्या वृद्धेच्या मुखाकडे पहात उभी राहिली नाहीं तोंच, सुभटवीर्य त्या स्थलीं आला. तें शव पाहून, व हें भयंकर कृत्य देवांगनेनेंच केलें अशी कल्पना त्याच्या मनांत येऊन, तो दचकून मागें सरला.

**देवां०**—महाराजांचे मनांत भलतीच शंका आली असेल! या वृद्धेनें मला पराकाष्टेचें छळलें. हें तिच्या उरप्रदेशीं तीव्र शस्त्र आहे त्यानें तिनें माझा प्राणच घेतला असता, परंतु परमेश्वरानें मजला वांचविलें!

**सुभट०**—( अशा सुंदर राजकन्येनें आपल्या कोमल हस्तानें असें भयंकर कृत्य केलें, यामुळें चित्तास वाईट वाटून ) राजकन्ये, तिनें उगीच तुला भीति दाखविली असेल. तिच्या हातून प्राण घेण्याचें क्रूरकर्म झालें नसतें असें मला वाटतें.

**देवां०**—असें महाराज कसें ह्मणतात, याचें मला मोठें

नवल वाटतें. या तिच्या हृदयांत जें शस्त्र आहे त्यानेंच ती माझा प्राण घेऊन, आपली मनीषा तृप्त करून घेणार होती !

**सुभट०**---( देवांगनेकडे दयार्द्र अंतःकरणानें पाहून ) जें प्रारब्धीं असेल, तें कधींही चुकत नाहीं. त्या वृद्ध स्त्रीच्या प्राणांचा अंत या सुकुमार हस्तानें होणार होता. या चंद्राप्रमाणें सतेज मुखास आणि या कुसुममालेप्रमाणें कोमल हस्ताला प्राणघाताचें कृत्य कालिमा आणीत आहे ! हें कृत्य पुरुषांच्या कठोर हस्तानें घडून आलें असतें तर बरें झालें असतें---अथवा ---माझ्या हातानें घडून आलें असतें---अथवा वसुमती सुमतीच्या हातून जरी घडून आलें असतें---इतकेंच नाहीं, परंतु तिनें आपण होऊनच जर आत्महत्या करून घेतली असती तरी बरें झालें असतें.

**देवां०**---देवा देवा-( त्याच्या मनांत प्राणघाताचें हें कृत्य आपणच केलें आहे, असें जरी पूर्णपणें बिंबलें आहे तरी सुद्धां त्याच्या ह्मणण्याकडे लक्ष न देऊन खरा प्रकार कसा घडून आला, हें त्यास न कळवितां )या अघोर कर्माबद्दल महाराज माझा आतां तिरस्कार करतील; माझ्यासारखी हतभागी दुसरी कोणी नसेल !

**सुभट०**— तिरस्कार करण्याचें मला कारण नाहीं; इतकेंच नाहीं, निदान आपण यक्षिणीची भगिनी आहांत यामुळें तरी मला असें करतां येत नाहीं; परंतु हें कृत्य कांहीं चांगलें झालें नाहीं. या नीच कृत्यानें तुमच्या विमल कीर्तीस आजन्म कालिमा लागली ! अशी दुष्ट बुद्धि कशी उत्पन्न झाली ? हर ! हर ! !

**देवां०**---( त्याच्या सन्निध जाऊन मोठ्या कौतुकानें ) महाराजांस मी असें विचारतें कीं, हें नीच कर्म, ही प्राणहत्या,

जरकरतां माझी भगिनी जी यक्षिणी तिच्या हातून घडली असती तर महाराजांनीं जन्मभर तिचा द्वेषच केला असता अं ?

**सुभट**०– ( हंसत हंसत तिच्या मुखाकडे पहात, यक्षिणीची मूर्ति मनांत आणून देवांगनेमध्यें व तिच्यामध्यें वर्णामध्यें आणि केशकलापामध्येंच भेद आहे, असें मनांत आणून ) हा प्रश्न किती चमत्कारिक ! !

**देवांगना**०–( हास्य करीत विनोदानें ) चमत्कारिक प्रश्न खरा, आणि महाराजांस मी फिरून तोच प्रश्न करतें. यक्षिणीचा महाराजांनीं त्याग केला असता काय ?

**सुभट**०—तिला सुद्धां अशी दुष्ट बुद्धि उत्पन्न झाली याबद्दल निंदिलें असतें. या कृत्यांत मी उभयतांना सारखाच दोष देईन. असो. आपणास यासंबंधें वादविवाद करण्याचें जें मूळ तेंच आतां काढून टाकतों ह्मणजे झालें ( तिनें नको नको ह्मणत असतां तें प्रेत गंगेंत फेंकून देतो. )

**देवां**०—( जोरानें टाळी वाजवितांच वृक्षराजींतून सुबल आणि सुनीथ तेथें धांवून आले; त्यांना उद्देशून ) महाराजांच्या मनाचा ग्रह किती चमत्कारिक झाला आहे ! माझ्याविषयीं त्यांची पूज्यबुद्धि नष्ट होऊन, असा ग्रह झाला आहे कीं, हें प्राणघाताचें अघोर कृत्य मीं आपल्या हातानें केलें. त्या वृद्धेच्या हृदयांत शस्त्रप्रहार मीं केला; आणि महाराजांची अशी कल्पना होणें संभवनीय आहे; कारण ज्यावेळीं महाराज येथें आले त्यावेळीं मजसन्निध तुह्मीं उभयतां नसल्यानें महाराजांचा तर्क असा होणें साहजिक आहे.

या भाषणानें त्या उभय वीरांस परम आश्चर्य वाटून त्यांनीं सुभटवीर्याचें कलुषित झालेलें मन सत्य प्रकार कथन करून

फिरून शुद्ध केलें. राजकन्या देवांगना इजला आपण व्यर्थ दोष दिला, याचा त्याला वारंवार पश्चात्ताप वाटूं लागला, व त्याबद्दल त्यानें राजकन्येची क्षमा मागितली. अशा सु-कुमार हस्तांकरवीं परमेश्वरानें असें अघोर कृत्य करविलें नाहीं, व अशा सुंदर तनूचें त्यानें संरक्षण केलें, ह्मणून तो परमेश्वराचे आभार मानूं लागला. ते उभय वीर पुनरपि आ-पल्या शिबिराकडे निघून गेले व तीं उभयतां तेथेंच राहिलीं.

**सुभट**०—( यक्षाच्या भाषणाचें स्मरण होऊन गांभी-र्यानें ) लवकरच मला अवन्ति देशाला जाणें आहे, करितां या जनाला कांहीं आज्ञा असल्यास निवेदन करावी.

**देवां**०—( मोठ्या आश्चर्यानें ) काय अवन्ति देशाला ! ( खालीं पाहून ) आणि महाराजांसमवेत जर मी——

**सुभट**०—आपणास काय आज्ञा करावयाची असेल ती स्पष्टपणें करावी. आपल्या इच्छेनुरूप मी वर्तन ठेवीन, असें मीं यक्षिणीस वचन दिलें आहे.

**देवां**०—( आनंदित होऊन ) महाराजांच्या या भाष-णावर काय उत्तर करावें हें मला समजत नाहीं, तथापि म-हाराजांपासून गुप्त असें मीं कांहींच ठेवीत नाहीं; माझी अवन्ति नगरीस महाराजांच्या समवेत येण्याची इच्छा आहे. यक्षिणीनें वसुमति-सुमति मजकरितां येथें ठेविल्या आहेत, त्याही मजसमागमें येतील.

**सुभट**०—मी व माझे शरीररक्षक असे आजपासून अर्ध-पक्षाच्या आंत येथून प्रयाण करणार ( दुःखितस्वरानें ) इतके त्वरित कां जाणार याविषयीं यक्षिणीनें आपल्यास कळविलेंच असेल.

**देवां**०—( अधोवदन करून एक हस्त कपाळावर धरून

अश्रुभरित नेत्रांनीं ) हर ! हर ! ! तें सर्व वृत्त मला श्रुत आहे ! ! !

**सुभ०**—( दयार्द्र अंतःकरणानें ) देवांगने, तुझे नेत्रांस पाणी येणें साहजिक आहे. यक्षिणीच्या वियोगानें—

**देवां०**—( एकाएकीं त्याच्याकडे वळून उच्छृंखलपणानें मनाचा गंभीरपणा सोडून ) महाराजांस जरकरितां मी सत्य प्रकार निवेदन केला तर—पण नाहीं— मी मूर्खाप्रमाणें कांहीं तरी जल्पना करीत आहें—( कांहीं वेळ विचार करून ) अजून असें करण्याची वेळ आली नाहीं—मग अवन्ति नगरीस गेल्यावर कदाचित्—

असें त्रोटक भाषण करून ती एकदम स्तब्ध राहिली. सुभटवीर्य आश्चर्यभरित होऊन तिच्या मुखाकडे पाहूं लागला. हा गुप्त प्रकार काय आहे, याचें स्पष्टीकरण करण्याविषयीं त्याच्यानें तिला विचारवेना; कारण एक तर यक्षिणीप्रमाणें मोकळ्या मनानें तिच्याशीं तो भाषण करीत नव्हता, आणि दुसरें असें कीं, दुसऱ्याचें गुप्त वृत्त, त्यानें स्वेच्छेविरुद्ध आपल्याला कथन करावेंच अशी तो इच्छा करीत नसे.

**सुभ०**—( मनांत ) अवन्तिनगरीस गेल्यावर मग ही मला काय सांगणार ? आणि हें नूतन गुप्त प्रकरण काय आहे ! अवन्ति नगरीस जाऊन मग कथन करण्यापेक्षां आतांच कां निवेदन करीत नाहीं ?

**देवां०**—( चित्त स्थिर करून ) आतां मीं काय भाषण केलें याविषयीं महाराजांनीं अधिक विचार करूं नये. योग्य वेळा येईपावेतों ही गुप्त गोष्ट श्रवण करण्याविषयीं उत्पन्न झालेली जिज्ञासा, आत्मसंयम करून आवरून धरावी. ती योग्य वेळा प्राप्त झाली ह्मणजे आणखी एक गुप्त गोष्ट महारा-

जांस कथन करीन. ती ऐकून महाराज आश्चर्यभरित होतील; इतकेंच नाहीं, परंतु नुकाच घडून आलेला जो घोर संग्राम आणि विलक्षण आश्चर्य वाटून मानवी प्राण्यांची मति जेथें कुंठित होते असे पूर्वीं घडून आलेले, विद्यमानकालीं घडत असलेले, व पुढें घडून येणारे प्रकार, या सर्वांचें मूळबीज काय आहे तेंही समजेल. अस्तु. प्रस्तुतकाळीं याविषयीं अधिक भाषण करण्याची अवश्यकता नाहीं. (वृत्ति आनंदित करून) मोठ्या आनंदानें मी महाराजांचे समागमें अवन्ति नगरीला येतें. अर्धपक्षाच्या आंत महाराज येथून प्रयाण करणार आहेत, ह्मणजे महाराजांस येत्या आदित्यवारीं प्रयाण केलेंच पाहिजे. त्या दिवशीं प्रातःकाळीं महाराजांस मी प्रतिष्ठान नगरीच्या तटाच्या द्वारासन्निध येऊन भेटेन. आतां मी महाराजांची जाण्यास आज्ञा घेतें. (मंदस्वरानें) पण ही तरुण कुमारिका कोण आहे? हा प्रश्न मीं अशाकरितां केला कीं, महाराजांचा जर तिच्याशीं विशेष परिचय अथवा स्नेहभाव असेल तर त्याप्रमाणें मजला तिची मानमान्यता ठेवली पाहिजे. तिच्या जिवावरचें संकट नुकेंच गेलें असल्यानें माझ्या आश्रमांत ती चार दिवस विश्रांतिकरतां राहील; त्या वेळीं मी तिच्याशीं कसें वर्तन ठेवणें याविषयीं आज्ञा व्हावी.

**सुभट॰**—सत्यजित नांवाचा एक वृद्ध गृहस्थ देवगिरिदुर्गाच्या सन्निधच राहत असतो, त्याची ही मानलेली कन्या आहे; मला इतकेंच अवगत आहे. तिचें नांव सत्यवती, ही फार सुस्वभावाची असून, इजवर केलेले उपकार व्यर्थ जातील असें मजला वाटत नाहीं. आपलें प्रेम संपादन करण्यास ती कन्या अगदीं योग्य आहे.

**देवी॰**—( मनांत उत्पन्न झालेला मत्सरभाव आवरून ध-

रून ) तिच्याविषयीं महाराज मोठ्या कळवळ्यानें भाषण करीत आहेत !

**सुभट०**—( तिच्या मनांत उत्पन्न झालेली भावना समजून ) कळवळा कशाचा ? मला तिची फार दया येते. रात्रौं भयंकर संग्राम होऊन जेव्हां मी भूमीवर निचेष्ट पडलों, त्या कालीं परमेश्वररूपेनें ही कन्यका माझे सन्निध येऊन, तिनें माझे मुखांत उदक घालून मजला शुद्धीवर आणलें, ह्मणून बरें झालें, नाहीं तर त्याच स्थितींत कदाचित् माझा प्राणांत सुद्धां झाला असता. असें तिनें केल्यानें मजवर तिचे अगणित उपकार झाले आहेत; आणि येवढ्याकरितांच आपल्याच्यानें होईल तितकें तिच्या ठायीं लक्ष पुरवून तिचें आदरातिथ्य करावें, अशी या जनाची विनंति आहे.

**देवां०**—( आपल्या मनांत उत्पन्न झालेली भावना सुभटवीर्याचे ध्यानांत येऊन चुकली असें वाटून अंतःकरणांत खोंचली जाऊन ओशाळी होऊन हंसत हंसत ), महाराजांना असें वाटतें कीं काय कीं, माझे ठायीं उदारत्वाचा अथवा दयार्द्रतेचा अभाव आहे ?

**सुभट०**—छे, छे, अशी माझ्या मनांत शंका सुद्धां नाहीं. आपलें मन फार मोठें आहे, आणि हें मीं समक्ष बोलावें हें उचित नाहीं. असो आतां मीही आश्रमीं जातों; मला आज्ञा असावी. आदित्यवारीं प्रातःकाळीं पुनरपि भेट होईलच.

**देवां०**—( दृष्टि चंचल होऊन ) मीही महाराजांचा निरोप घेतें.

याप्रमाणें तीं उभयतां भाषणेंकरून सुभटवीर्य आपल्या विश्राममंदिराकडे वळला व देवांगना आपल्या शिबिराकडे गेली. या वेळीं उभयतांस त्या वृद्ध स्त्रीनें स्वहस्तानें प्राणघात करून

घेतला ह्मणून खेद वाटत होता. देवांगनेचे चित्तास फार वाईट वाटलें. शस्त्रानें तिला केवळ भीति उत्पन्न करावी अशी तिची इच्छा होती, परंतु असें अघोर कर्म करण्याचा तिचा मानस नव्हता. वृक्षराजींतून मंद गतीनें चालत असतां ती आपल्या मनाशींच ह्मणूं लागली, " कालांतरानें या सुंदर राजपुरुषाची अर्धांगी होण्याची सुवेळा येऊन पोहोंचणारच यांत संदेह नाहीं."

## द्युमत्सेन आणि बृहत्सेन

आमच्या प्रिय वाचकांच्या लक्षांत असेलच कीं, सुभटवीर्यानें आपल्या उभय शरीररक्षकांना राजकन्या प्रभावतीच्या वसतिस्थानाचा शोध करण्याची आज्ञा केली होती. त्या आज्ञेप्रमाणें त्या उभय वीरांनीं शोध करण्याच्या पूर्वी प्रथमतः सुमित्र धनिकास तिजविषयीं वर्तमान पुसून, त्या राजपुत्रीच्या सर्व खाणाखुणा चांगल्याप्रकारें समजावून घेतल्या. अशाकरितां कीं, तीस त्यांना लवकर ओळखतां यावें व प्रसंगोपात प्रभावतीनें दुसरेंच अभिधान धारण केलें असल्यास आपलें मन गोंधळांत पडूं नये. त्याचप्रमाणें त्यांनीं ' तिची एखादी प्रतिमा आह्मांस प्राप्त होईल कीं नाहीं, होण्यासारखी असल्यास ती मिळावयास काय उपाय केला पाहिजे,' याचाही शोध सुमित्रधनिकाकडून करविला. त्या समयीं त्यानें त्यांना असें कळविलें कीं, " राजकन्येची एक प्रतिमा राजवाड्यांत मीं पूर्वी अवलोकिली होती. ती प्रतिमा अतिउत्तम असून, आरशामध्यें केवळ प्रतिबिंबित झालेल्या मूर्तीप्रमाणेंच ती आहे. असें जरी आहे तरी पण विद्यमानकालीं राजक्रांतीची घडामोड चालली असल्यानें, ती प्रतिमा राजवाड्यांत असेल

किंवा नाहीं, हें मला सांगतां येत नाहीं. याशिवाय राजवाड्याचा प्रवेश मार्ग बंद असून महाराज वज्रदंष्ट्र यांची त्यांवर सर्वत्र सत्ता आहे. तुमचा तेथें प्रवेश होणें दुरापस्त आहे. " या भाषणानें आमच्या उभयवीरांचें धैर्य मुळींच खचलें नाहीं. 'प्रयत्नांअंती परमेश्वर आहे,' असा त्यांनीं मनाचा निश्चय केला.

अशा रीतीनें दृढ निश्चय झाल्यावर एके दिवशीं रात्र होऊन जिकडे तिकडे काळोख किट्ट पडला असतां, या उभयवीरांनीं राजवाड्याच्या पार्श्वभागानें, वातायनद्वाराचा खड्गानें भंग करून अंतःप्रदेशीं प्रवेश केला. त्यांनीं आपल्या समागमें एक दिवटी नेली होती, ती प्रज्वलित करून त्यांनीं संपूर्ण राजवाडा धुंडिला, परंतु त्यांच्या प्रयत्नांस यश आलें नाहीं. त्यांची या कामांत अगदीं निराशा होऊन आतां ते परत जाण्याच्या विचारांत होते, इतक्यांत ते एका शयनस्थलाजवळ आले. हें स्थल प्रथम त्यांच्या लक्षांत आलें नव्हतें. या स्थलीं येतांच एकाएकीं, भिंतीस लाविलेला एक देदीप्यमान चित्रफलक त्यांच्या दृष्टीस पडला. त्याच्याकडे अवलोकन करतांच सुमित्र धनिकानें ज्या राजपुत्रीचें रूप त्यांच्या ध्यानांत भरून दिलें होतें, तेंच हें सकलसौंदर्यानें मंडित झालेलें रत्न आहे अशी त्यांची उत्तरोत्तर खातरी झाली. कांहीं कालपावेतों तर उभयवीर तिचें सौंदर्य अवलोकन करीत तटस्थ उभे राहिले होते.

कित्येक दिवसपावेतों द्युमत्सेन व बृहत्सेन प्रतिष्ठान नगरीस घिरट्या घालीतच होते. अनेक प्रासादांतून, मंदिरांतून व मोठमोठ्या धनिकांच्या गृहांतून त्या कुमारिकेचा त्यांनीं शोध केला, परंतु त्यांना काडीमात्र सुगावा लागला

नाहीं. अशा रीतीनें शोध करीत असतां, ज्या दिवशीं मंदवार असून अमावास्या आली होती, व ज्या रात्रीं सुभटवीर्याचा यक्षासमवेत घनघोर युद्धप्रसंग झाला, त्यादिवशीं अस्तमानीं भगवान् सविता आपलीं सकल किरणें आटोपून धरून क्षितिजाखालीं जात असतां, आमचे हे उभयवीर श्वेत प्रासादापासून बऱ्याच अंतरावर उभे राहून लांबूनच त्याची शोभा अवलोकन करीत होते. सायंकालचा समय झाल्यानें अवशिष्ट राहिलेले किरण श्वेत प्रासादाच्या आसमंत भागीं असलेल्या वृक्षराजीवर पडून फारच विलक्षण शोभा दिसत होती.

हा चित्तवेधक देखावा फार कालपावेतों टिकला नाहीं; कारण त्या दिवशीं आकाश घनपटलांनीं व्याप्त होऊन लवकरच पर्जन्याची तीव्र वृष्टि होईल कीं काय, असें क्षणोक्षणीं वाटत होतें. या चित्तवेधक प्रासादापासून प्रतिष्ठान नगरी चांगली दीड कोशावर होती. द्युमत्सेनास वारंवार वाटे कीं, या भव्य प्रासादांत आपला प्रवेश होईल तर बरें; कारण येथें कदाचित् राजकन्या मिळण्याचा संभव आहे. बृहत्सेन आपल्या मित्रास, आपण आश्रमीं गमन करावें,ह्मणून वारंवार आग्रह करीत होता; कारण आश्रम लांब असून पर्जन्यवृष्टि लवकरच होईल असा सुमार दिसत होता. अशा रीतीनें कांहीं कालपावेतों त्या स्थळींच ते विचारांत गुंतले असतां, पर्जन्याचे मोठमोठे थेंब अंतरा-अंतरानें टपटप पडून विजांचा कडकड ध्वनि होऊं लागला. इतक्यांत कोणी एक स्त्री,–जिचें तारुण्य अतिक्रांत होत चाललें आहे, जिनें शुभ्र वस्त्राचें जरी परिधान केलें आहे, तरी जिचें मुखकमल परम तेजस्वी दिसत आहे, जी शरीरानें अगदीं सडपातळ असून, सौंदर्यानें जिचा अजून त्याग केलेला

नाहीं,–असें एक स्त्रीरत्न त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. ही स्त्री प्रतिष्टान नगरीकडून येऊन श्वेतप्रासादाकडे चालली होती. तिच्या समागमें पुष्कळ परिचारिका व परिचारक होते. तिच्या कपाळीं कुंकुमतिलक नसल्यानें आमच्या उभय वीरांनीं तात्काल जाणिलें कीं, पिंगला नामें जी धनाढ्य साध्वी आहे, ती हींच असावी. ती परम धर्मज्ञ असल्याचें त्यांचे कानांवर आलें होतें. तारुण्याची भरज्वानी जरी नाहींशी झाली होती तरी, सूर्यास्त झाला ह्मणजे जसा किंचित् कालपावेतों प्रकाश अवशिष्ट असतो, तसें अजून वृद्धावस्था प्राप्त न झाल्यानें पिंगला साध्वीच्या तारुण्याची रमणीयता नष्ट झाली नव्हती.

तिला मार्ग देण्याकरितां द्युमत्सेन व बृहत्सेन मार्गावरून किंचित् दूर झाले. ती त्यांच्या आंगावरून जात असतां तिनें सहज त्यांच्या मुखाकडे पाहिलें व तात्काल जाणिलें कीं, सांप्रत पर्जन्य पडण्यास आरंभ होऊन अस्तमान होत चालल्यानें हें पुरुषद्वय मोठे संकटांत पडलें आहे. ती त्यांस ह्मणाली "सायंकाळचा समय होत चालला आहे व पर्जन्यवृष्टि होण्यास आरंभ झाला आहे, करितां आपल्यास वाटत असल्यास रात्रीच्या रात्र श्वेतप्रासादीं राहावें." या भाषणावर उभयतांनीं "आह्मांवर मोठा अनुग्रहच आहे, व आह्मीं मोठ्या आनंदानें भगवतीची आज्ञा मान्य करितों" असें समर्पक प्रत्युत्तर केलें.

नंतर त्या साध्वीनें उभयतांचीं वसतिस्थानें व अभिधानें, व या नगरीस येण्याचें प्रयोजन पुसलें. त्यावरही त्यांनीं योग्य उत्तरें केलीं. याप्रमाणें भाषणें करीत तीं श्वेतप्रासादाचे सन्निध्र येतांच, त्याचें भव्य द्वार खाडकन् उघडलें गेलें.

या वाड्याचें काम कसें होतें यासंबंधीं वर्णन पूर्वीं आमच्या वाचकांच्या वाचण्यांत आलेंच आहे. गुरुवर्य उत्पात यांच्या

समागमें सुभटवीर्य प्रथमतः ज्या समयीं येथें आला ती वेळा प्रातःकालची होती त्यामुळें ही जागा विशेष शोभिवंत दिसत नव्हती. सांप्रतकालीं जिकडे तिकडे दीपकज्योति प्रज्वलित केल्यानें तो प्रासाद चोंहोंकडून शृंगारिलेला आहे असा दिसत होता. तेथें असलेल्या हजारी कारंजावर दीपकपंक्ति लाविल्यानें त्यांचीं प्रतिबिंबें उदकांत पडून कारंजाचें सर्व उदक दीपकमयच दिसत होतें. अशा रमणीय स्थलीं आल्यावर आमच्या उभय वीरांस समाधान वाटून तेथील वैभवाचें क्षणमात्र मनांत ते आश्चर्यच करूं लागले. त्या साध्वीनें त्यांचें आगतस्वागत फारच उत्तम रीतीनें करून त्यांच्या भोजनाची व्यवस्थाही चांगल्या प्रकारें केली.

प्रहर रात्र होईपावेतों ते उभयवीर तेथील लोकांशीं संभाषण करीत बसले होते, इतक्यांत ‘ जगन्मातेच्या आरतीची वेळ झाली ’ असें एकजण बोलला. या भाषणाचा संबंध द्युमत्सेन व बृहत्सेन यांच्या ध्यानांत आला नाहीं ह्मणून त्यांनीं सन्निध बसलेल्या एका वृद्ध मनुष्यास “ येथें अंबिकेचें देवालय आहे कीं काय!” असा प्रश्न केला. त्यांच्या या प्रश्नावर त्यानें “होय” ह्मणून उत्तर केलें. नंतर सर्व मंडळी वाड्याच्या मध्यप्रदेशीं जाऊं लागली. द्युमत्सेन व बृहत्सेन यांना त्यांनीं समागमें येण्याची विनंति केल्यावरून तेही त्यांच्या समागमें जाऊं लागले.

वाड्याच्या मध्यभागीं येऊन पाहतात तों, जिकडे तिकडे भरजरी पडदे सोडलेले असून भूमितलावर मृदु गालिच्या पसरलेला होता. मध्यभागीं भव्य चांदीच्या सिंहासनावर श्रीअंबिकेची मूर्ति हस्तांमध्यें नानाप्रकारचीं आयुधें धारण करून, हिनें नुकेंच महिषासुराचें मर्दन केलें आहे, अशी क्रोधाविष्ट

दिसत होती. या स्थळीं सहस्रशः दीपक प्रज्वलित केल्यानें वाड्याच्या मध्यस्थलीं असलेलें तें मंदिर सर्वत्र तेजोमयच दिसत होतें. नानाप्रकारचे धूपदीप त्या स्थलीं प्रज्वलित केल्यानें सर्वच घमघमाट सुटला होता. जगन्मातेस सुगंधित द्रव्यांनीं मर्दन करून, गंधाचें लेपन केल्यानें, व सुवासिक कुसुमांचे हार घातल्यानें सर्वत्र सुगंध पसरला होता. देवी अंबेचे अंगावर नानाविध अलंकार घातले होते. तेथें येतांच उभयतांनीं श्रीअंबिकेस प्रणाम केला. तेथें शक्तिउपासकांचा मेळा होताच. त्यांनीं सर्वांनीं बद्धांजलि केलेली होती. या मेळ्याच्या अग्रभागीं ती महासाध्वी पिंगला उभी होती. या उभयतांकडे पाहून, देवीच्या दर्शनास ते आले ह्मणून, तिला मोठें समाधान वाटलें. हा मेळा स्त्रीपुरुषमिश्रित होता. देवीची आरती धूपारती झाल्यावर सर्वांची प्रसाद ग्रहण करण्याची वेळ आली. हा समय येतांच जिकडे तिकडे स्तब्धता होऊन सर्वच मंडळ कोणाची तरी मार्गप्रतीक्षा करीत आहे असें दिसलें.

इतक्यांत या सकल राजवैभवाची स्वामिनीच काय, अथवा येथील अधिष्ठात्री देवताच काय, अशी एक सुंदर कन्या— जिनें एका हस्तांत देवीस अर्पण करण्याकरितां सुमनें घेतलीं आहेत, व एक हस्त एका मार्गदर्शिकेच्या स्कंधप्रदेशीं ठेविलेला आहे—प्राप्त झाली. त्या स्थलीं तिनें प्रवेश करतांच तिजला सर्वांनीं उत्थापन देऊन, ते मोठ्या नम्रपणानें तिच्याकडे पाहूं लागले. जगन्मातेस तिनें पुष्पें अर्पण करून एकाग्रचित्तानें नमन करून प्रसाद ग्रहण करितांच, सर्वत्रांनीं तिचेंच अनुकरण केलें.

या सुंदर कन्येचा मुखचंद्रमा जरी कोमेजलेला होता, तरी

ती वरकांति परम आनंदितच आहे असें दर्शवीत होती. यौवनावस्था प्राप्त होत चालल्यानें ती सुंदर कन्या फारच मोहक दिसूं लागली होती. तिचीं नेत्रकमलें काळींभोर असून, तिनें आपले मुक्त कुंतल नितंबभागापावेतों मोकळे सोडले होते. तिनें अंगावर धारण केलेलीं वस्त्रें व भूषणें फारच मौल्यवान होतीं.

अशा त्या सुंदर नववधूस अवलोकन करतांच, त्या उभय वीरांत किंचित् चळवळ उत्पन्न होऊन त्यांनीं एकमेकांकडे संकेतपूर्वक पाहिलें. द्युमत्सेनानें बृहत्सेनाचा हस्त दाबून, त्यास आतां कांहींच भाषण करूं नको, ह्मणून संकेत केला. कुसुममालेप्रमाणें ही सुकुमार कन्यका कोण असावी हें आमच्या वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल; कारण सुभटवीर्याची व राजकन्या प्रभावतीची भेट प्रथम ज्या स्थळीं झाली तें स्थळ याच वाड्यांत असून येथून विशेष अंतरावरही नव्हतें. राजकन्येची प्रतिमा द्युमत्सेन व बृहत्सेन यांनीं अवलोकन केल्यास दीनावधि झाला नसल्यानें, तात्काल त्यांच्या ध्यानांत आलें कीं, आपण जिचा रात्रंदिवस शोध करीत आहोंत, ती राजकन्या परमेश्वरकृपेनें या स्थळीं आपल्यास मिळाली, येणेंकरून आपल्या श्रमांचें सार्थक्य झालें.

जगदंबेचें दर्शन घेतल्यावर राजकन्या प्रभावतीनें स्वस्थळीं जाण्याकरितां साध्वी पिंगलेची आज्ञा घेतली. तिच्या मान्यतेप्रमाणें तिजला पोहोंचविण्याकरितां सर्व मंडळी तिच्या शयनस्थानापावेतों गेली. या गर्दींत त्या उभय वीरांनीं तिच्या शयनस्थलाची जागा अवलोकन करून ठेविली. उपरांत सर्व मंडळी स्वस्थळीं शयन करण्याकरितां गेली. त्या रात्रीं वारंवार मेघगर्जना होऊन, विजांचा लखलखाट चाललेला होता, व पर्जन्य केव्हां पडेल याचा नेम नव्हता.

मध्यानरात्रींचा समय प्राप्त झाला. या कालीं त्या भव्य प्रासादांत जिकडे तिकडे शांतता भासत होती. इतक्यांत घंटेचा घण घण नाद जगदंबेच्या मंदिराकडे झाला. त्या समयीं द्युमत्सेन व बृहत्सेन यांची खातरी झाली कीं, अजून येथील सर्वत्र मंडळींची सामसूम झाली नाहीं. आणखी एक घटका रात्र निघून गेली. द्युमत्सेन व बृहत्सेन मंचकावर बसून कांहीं विचारांत निमग्न झाले होते. सुमार दोन प्रहर रात्र निघून गेल्यावर उभयतांनीं आपलीं वस्त्रें नीट नेटकीं परिधान करून, शस्त्रें नीट सांवरून धरिलीं. त्यांचा स्वामी जो सुभटवीर्य त्याच्या चरणीं त्यांनीं एकवार नमन करून ईशाची स्तुति केली. जें कृत्य करण्यास ते आतां हात घालणार होते, त्यांत आपणास यश यावें ह्मणून परमेश्वराला ते शरण गेले. शयनस्थलीं प्रज्वलित केलेल्या दीपकांस प्रथमतः त्यांनीं निरोप दिला, आणि त्या स्थलांतून ते बाहेर पडले.

देवीचे मंदिरासंन्निध ते प्रथम दबत दबत मंद मंद पावलें टाकीत आले. त्या स्थलीं नंदादीप प्रज्वलित केलेले होते. त्यांचा मंद प्रकाश द्वाराच्या फटींतून किंचित् बाहेर पडलेला होता. अंबिकेच्या मंदिराच्या सन्मुखच, बोळाप्रमाणें एक अकुंचित मार्ग होता, त्या मार्गानें ते त्या मंदिरास सव्य घालून मंदिराचें पलीकडील बाजूला गेले. तेथें गेल्यावर वामभागीं वळून त्यांनीं अवलोकिलें तों, राजकन्येनें शयन केलेलें स्थळ विशेष दूर नव्हतें. त्याचा प्रवेशमार्ग बंद केलेला असून कांहीं संरक्षक स्त्रिया निद्रावश होऊन द्वारासन्निध पडलेल्या होत्या. शयनस्थलीं प्रज्वलित केलेले दीप पूर्ण तेजानें प्रकाशित होते, असें त्यांना बाहेरून दिसलें; कारण शयनस्थलाच्या पार्श्वभागींचें वातायनद्वार उघडें असल्यानें त्यांतून बागेंतील लता-

मंडपावर प्रकाश पडलेला होता. ते विलक्षण धाडसी वीरद्वय मंद गतीनें त्या लतामंडपाकडे जाऊं लागले. राजकन्या या समयीं निद्रावश न होतां मंचकावर सचित बसलेली होती. तिच्या मुखाकडे पाहिलें असतां तें काळजीनें अगदीं ग्रस्त आहे असें दिसत होतें. आपला वामहस्त तिनें आपल्या गालावर ठेविलेला होता व एकाग्रचित्तानें कांहीं विचारांत ती मग्न असल्याचें दिसत होतें. दीर्घ उष्णश्वास सोडून मधून मधून तिच्या नेत्रांस अश्रु येऊन गालांवरून ते घळघळ वाहत होते. यासमयीं फार उष्मा होत होता ह्मणून तिनें बागेकडील खिडकी उघडीच ठेविली होती. तिच्या आंगावरील वस्त्र अस्ताव्यस्त पडलेलें असून, अंगावरील संपूर्ण भूषणें एकीकडे पडलेलीं होतीं.सारांश, या स्थितीमध्यें लवमात्र तिला सुख नसावें, असें प्रेक्षकांस प्रथमदर्शनींच दिसून येत असे.

ते उभयवीर प्रथम एका वृक्षावर चढून त्यांनीं वातायनद्वारांतून राजकन्या काय करीत आहे हें अवलोकन केलें. नंतर उभयतां लपत लपत त्या वातायनद्वाराच्या खालीं येऊन बसले, व आणखी एकवार त्यांनीं स्वामीचरणाचें स्मरण केलें. या काळीं त्यांचीं काळीजे धसधस करीत होतीं. हस्तपादादि अवयवांस कंप सुटलेला होता. जिव्हा शुष्क झाल्या होत्या. सर्वांग घर्मानें डवरलेलें होतें. इतकी जरी स्थिति झाली होती तरी, स्वामीकार्याचा त्यांचा निश्चय अढळच होता. क्षणोक्षणीं ते उभयतां एकमेकांस "प्रथम तूं प्रवेश कर" असें हातानें खुणा करून सुचवीत होते. इतक्यांत राजकन्या प्रभावती वातायनद्वारासन्निध येऊन कांहीं आत्मगत भाषण करीत आहे असें त्यांना वाटलें. तें भाषण ते लक्षपूर्वक श्रवण करूं लागले.

" ह्या उपवनांतील पुष्पवेलींस सुद्धां वृक्षांचे आधार आहेत, परंतु मला हतभागीला कोणाचाच आधार नाहीं! मातापित्यांनीं माझा अल्प वयांतच त्याग करून स्वर्गीचा मार्ग धरला ! धिक् माझें जिणें ! ! अन्य लोकांस वाटतें कीं, राजकुलांत जन्म प्राप्त होणें ह्मणजे गहन तपश्चर्या करावी लागते. परंतु मला असें वाटतें कीं, ज्यानें घोर पातकें केलीं असतील, त्यासच परमेश्वर या कुलांत जन्मास घालतो. रात्रंदिवस माझ्या नेत्रांचें पाणी खळत नाहीं. आणखी काय काय दुःखें माझ्या कपाळीं भोगावयाचीं आहेत, तें एक परमेश्वराला अवगत असेल. ती मांगहृदया पिंगला आणि तो परम दारुण चांडाळ उत्पात्या, यांच्या आज्ञेचें जर मीं तिळमात्र उल्लंघन केलें, तर ते दुष्ट मजला केव्हां देवीला 'भक्ष्य' ह्मणून अर्पण करतील याचा नेम नाहीं! नीचांची कृति तरी किती असुरी आहे ! अहोरात्र मजला या भीतीस्तव निद्रा येत नाहीं ! ! हर ! हर ! ! आतां या पंकीं रुतलेल्या निराश्रित गाईस कोण मुक्त करील ? जिवाचा अंत करून घेण्यास तरी मजजवळ काय साधन आहे, महाराज सुभटवीर्य यांनीं मला व्यर्थ आशा दाखविली; अथवा त्यांच्याकडे तरी मी काय ह्मणून शब्द लावितें ? त्यांच्या स्वामीची पुढें त्यांना तशीच कांहीं आज्ञा आली असेल. पण मला तें समजण्यास कांहींच मार्ग नाहीं, कारण त्यांनीं संदेश पाठविला, तर मला तो पोंहोंचणार कसा ! त्यांच्या सेवकांस येथें कोण प्रवेश करूं देणार ? आतां अशा या एकांतसमयीं जर महाराज सुभटवीर्य येथें येतील, अथवा त्यांचे परिचारक जरी येतील, तरी त्यांच्या समागमें सुद्धां अवन्ति नगरीला मी एकदम निघून जाईन "

**द्युमत्सेन–बृहत्सेन**—( एकदम उठून उभे राहून ) राजकन्येची काय आज्ञा आहे.

**प्रभावती**—( परम भयभीत होऊन ) आं ! आपण कोण?

**सुभ०**—महाराज सुभटवीर्य यांच्या चरणांचे एकनिष्ठ सेवक आहोंत. राजकन्येस भीति वाटण्याचें कारण नाहीं.

**प्रभा०**—( भीतीचें किंचित् निरसन होऊन ) अंमळ हळू भाषण करावें; कारण बाहेर निद्रित असलेले रक्षक जागृत होतील, व आपणा सर्वांवर प्राणांत संकट ओढवेल. अर्ध मासावर दिवस गत झाले; आपले स्वामी या मंद्भागीच्या भेटीला आले होते. त्यांनीं मजकडे दयार्द्र दृष्टीनें अवलोकन केलें. माझी स्थिति पिंजऱ्यांतील सारिकेप्रमाणें आहे, हें त्यांनीं तत्क्षणींच जाणलें. तें असो. पण आतां आपल्यास त्यांनीं काय हेतु धरून पाठविलें ? (उतावीळपणानें व आश्चर्यानें) पण आपला येथें प्रवेश तरी कसा झाला ? आणि मीच राजकन्या आहें, हें आपण जाणलें तरी कसें ?

**सुभ०**—(येथें येण्यास काय साधन झालें व राजकन्येची प्रतिमा आपल्यास कशी प्राप्त झाली हें सर्व सांगून मंद् स्वरानें) आपल्यास अवन्ति देशाला नेण्याकरितांच आलों आहोंत. अवन्ति देशाहून आपल्यास चांगलें साहाय्य होईल. ( पूज्यबुद्धीनें व गंभीर स्वरानें ) आपणास नृपश्रेष्ठ श्रीविक्रमादित्य महाराज यांच्याकडे नेण्याची आह्मांला आमच्या स्वामीची आज्ञा आहे.

**प्रभा०**—( परम आनंदित होऊन किंचित् भीतीनें ) पण माझी येथून मुक्तता कशी होणार ?

**बृह०**—याविषयीं आम्हीं उभयतांनीं पूर्वीं कांहींच विचार केला नाहीं. राजकन्येची जशी आज्ञा असेल तसें आम्हीं वर्तन करूं, आणि कांहीं संकट प्राप्त झालें तर जिवंत जीव आहे

तोंपावेतों राजकन्येला साहाय्य करूं; राजकन्येच्या आज्ञेचा विलंब आहे.

**प्रभा०**—( उतावीळ पणानें ) तर मग आतां एका क्षणाचा सुद्धां विलंब करितां उपयोगी नाहीं. येथून पलायन करावयाचें. ( वातायनद्वारांतून उभयतांच्या साहाय्यानें खालीं उतरते. )

**द्युम०**—मन अगदीं शांत ठेवावें, नाहीं तर विपरीत परिणाम होईल.

**प्रभा०**—( सर्वांच्यापुढें होऊन ) अगदीं भिऊं नका. माझ्यामागें हळू हळू या.

**द्युम०**—राजकन्येनें जें करणें तें पोक्त विचारानें करावें ह्मणजे झालें.

**प्रभा०**-कांहीं काळजी नको. येथें एक मोठें थोरलें भुयार आहे, त्यामधून बाहेर मार्ग निघतो. मजला हें पक्कें अवगत आहे; परंतु जरकरितां तेथें कांहीं अडथळा उत्पन्न झाला तर मग मात्र—

**बृह०**—( दांतओंठ खाऊन ) मग हीं तीव्र शस्त्रें समागमें कशाला आणिलीं आहेत ? आपल्या गमनास कोणी प्रतिबंध केला कीं एकदम त्याचा मोक्षच !

याप्रमाणें भाषणें करून तीं मंद मंद पावलें टाकीत पुष्कळ वळणें घेऊन एका सोपानपथाजवळ आलीं. बृहत्सेनानें भुयारांतून आपल्यास प्रकाश असला ह्मणजे बरें पडेल, असें वाटल्यावरून, मार्गांत एका स्थलीं एक दिवा जळत होता तो उचलून समागमें घेतला. द्वार उघडतांच त्यांना सोपानमार्ग दिसला. याच मार्गानें सुभटवीर्यास गुरुवर्य उत्पात राजभांडार दाखविण्याकरितां घेऊन जात होते, हें आमच्या वाचकांच्या लक्षांत असेलच.

**प्रभा**०–परमेश्वरकृपेनें येथपावेतों संकट आलें नाहीं. आतां भुयारांत काय प्रसंग येईल तो खरा.

त्या त्रिवर्गांनीं तो सोपानमार्ग उतरण्यास आरंभ केला. खालीं उतरल्यावर त्यांनीं भुयाराचें द्वार पुनरपि बंद केलें. सुमारें पन्नास पायऱ्या उतरल्यावर त्यांना सरळ मार्ग लागला, व त्रिवर्गांच्या जिवांत जीव येत आहे नाहीं तोंच, त्यांना सन्मुख अंतरावर मशाली प्रज्वलित केल्या असल्याचा प्रकाश दिसला. कोणी मोठ्या त्वेषानें गर्जना केल्याचा ध्वनि त्यांच्या कर्णप्रदेशीं पडून, तें संपूर्ण भुयार दुमदुमून गेलें. एका क्षणांत, हस्तांत शस्त्रें सांवरून धरिलेले, व ज्यांनीं आपलीं मुखें नानाविध रंगांनीं चित्रविचित्र केलेलीं आहेत, अशा कित्येक धिप्पाड लोकांनीं या त्रिवर्गास गराडा घातला. या सर्वांचें धुरीणत्व गुरुमहाराज उत्पात यांच्याकडे होतें. त्यांनीं एकदम आज्ञा केली कीं, " या नीचांचे प्राण घेऊं नका, त्यांना एकदम ग्रस्त करा, ह्मणजे त्यांना जगन्मातेस बळी देण्यास बरें पडेल."

## तीन दिवसांचें मार्गक्रमण.

काय त्या वेळची ती राजकन्येची स्थिति ! आशारूपउदकाचें सिंचन झाल्यानें प्रफुल्लित झालेलें मुखकमल म्लान व निस्तेज दिसूं लागलें. आनंदलहरीनें उचंबळणारें हृदय धडधड उडूं लागलें. परावलंबनशृंखला झुगारून देण्याचा संकल्प, ईश्वराच्या अचिंत्य कर्तृत्वानें आज खचित शेवटास जाणार, ह्मणून ज्या आशारूपतटावर सर्व लय आरूढ झालें होतें, तो तट एकदम ढांसळला. क्षणेक देहभान नाहींसें झालें. सर्व शरीरास कंप सुटला व तिनें नेत्र गच्च मिटून धरिले. ही राजकन्येची स्थिति पाहून द्युमत्सेनाचा हृदयक्षोभ अनावर हो-

ऊन डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच, त्याची तलवार म्यानाबाहेर निघून चमकूं लागली. बृहत्सेनानें हातांतील दिवा झुगारून दिला, आणि तलवारीकडे हात नेला; पण त्या काळपुरुषांपुढें त्यांचा काय पाड ! तत्क्षणीं दहाबारा महावीरांनीं त्या उभयवीरांस घेरून टाकून, एके क्षणांत त्यांस निःशस्त्र करून, हतवीर्य करून सोडिलें. समरांतील खरी मैत्रीण सोडून गेली, दैव प्रतिकूल झालें, शत्रूंचा पगडा पूर्ण झाला, उभयकर रज्जुवेष्टित झाले, सर्वांगावर घुंगट पडलें, हृदयपटावर निराशेनें ध्वज उभारिला, अशी स्थिति प्राप्त झाल्यावर आमच्या उभय वीरांची कोण दैना ! ! राजकन्येवर केवढा प्रसंग ! ! केवढी विपत्ति ! ! ! तिच्या दुःखाक्रोशानें सर्व भुयार दणाणून गेलें. परदास्यमंदिराच्या पायऱ्या चढण्याचा क्लेशजनक प्रसंग पुनरपि प्राप्त झाल्यानें, जीवित कंटाळवाणें वाटूं लागलें. क्षणेक लोटला नाहीं तोंच, राजकन्येचा दीर्घालाप अस्पष्ट ऐकूं येऊं लागला, यावरून असें अनुमान झालें कीं, ज्या स्थलापासून ती त्या उभयवीरांसह मोठ्या आनंदानें निघाली, त्याच स्थलीं ते काळपुरुष तिला पुनः घेऊन चालले असावेत. द्युमत्सेन-बृहत्सेन पूर्णपणें आपल्या स्वाधीन झाले, अशी पक्की खातरी झाल्यावर, ते काळपुरुष त्या उभयतांसह भूतलमार्गानें पुढें जाऊं लागले.

आमचें वीरद्वय अशा रीतीनें दैवाशीं टक्कर देत त्या अंधारमय भुयारांतून मार्ग क्रमीत असतां, प्रतिपक्षांतील लोकांचे मुखांतून एक शब्दही निघाला नाहीं. उत्पात महाराज आपणासमवेत आहेत, कीं राजकन्येस घेऊन परत गेले, हेंही त्यांस समजेना. ही सर्व मंडळी अंमळ पुढें गेली नाहीं तोंच, एक प्रचंड दरवाजा खाडकन् उघडला गेला. या द्वारांतून सर्व-

जण निघून गेल्यावर, तें द्वार पुनः इतकें जोरानें लागलें कीं, त्याच्या ध्वनीनें तो भूतलपथ किंचित् काल घुमून गेला. त्याच्या प्रतिध्वनीनें कानठळ्या बसून गेल्या, अंगावर रोमांच उभे राहिले, व द्युमत्सेन बृहत्सेन किंचित् काल आश्चर्यचकित् झाले; कारण या समयीं त्यांची अशी पक्की खातरी झाली कीं, हा भूतलपथ अद्याप संपला नाहीं, व ज्या मार्गानें आपण जात आहोंत तो मार्ग चोंहों बाजूंनीं चिरेबंदी असून भक्कम आहे; इतकेंच नव्हे, तर तो विस्तीर्णही नाहीं, असें त्यांनीं अनुमान केलें. अंतःकरण भीतित्रस्त झाल्यानें मधून मधून पावलें मंद पडत; त्या योगानें शत्रूंच्या त्वरित गतीनें त्यांची फारच दशा उडाविली.

त्या मंडळीपैकीं जो मार्गदर्शक होता त्याचे हातीं एक मशाल होती. आमच्या उभय वीरांचीं मुखकमलें कृष्णवस्त्राच्छादित असतांही, त्यांतून अंधुक उजेड त्यांस दिसत होता. उभयतांस झपाट्यानें नेण्याची त्रेधा उडाली होती, इतक्यांत सर्व मंडळी एकदम थांबली. दुसरा दरवाजा उघडला गेला. त्यांतून ही मंडळी निघून गेली. द्वार लागतांच पूर्ववत् मोठा प्रतिध्वनि उठला. पुनः ती टोळी त्वरेनें पावलें उचलूं लागली. हा गूढ भूतलपथप्रवास सुरू होऊन सुमारें अर्ध घटका झाली नाहीं तोंच, त्यांस तिसरा दरवाजा लागला. मंडळी जिना चढूं लागली. द्वाराचा खणखण ध्वनि पुनः कर्णप्रदेशावर आदळला. गुळगुळीत फरसबंदीवरून पावलें घसरूं लागलीं. पाव घटकेंत ती सर्व मंडळी मोकळ्या हवेंत येऊन पोंहोंचली. या ठिकाणीं ते सर्व लोक एकदम थांबले. “अश्व सज्ज करा” असा एक गंभीर स्वर त्या मंडळींतून निघाला. ही

आज्ञा आपल्या उत्पात महाराजांचेच मुखांतून निघाली. त्यावरून द्युमत्सेन–बृहत्सेन यांची पक्की खातरी झाली कीं, आपणांस यमसदनीं नेणाऱ्या त्या काळपुरुषांबरोबर उत्पात महाराजही आहेत. आज्ञेप्रमाणें अश्व सज्ज होऊन आले. त्या चांडाळांनीं द्युमत्सेन–बृहत्सेन यांस बलात्कारानें अश्वारूढ केलें. उभयतांचे पाय घोड्यांच्या पोटांखालून एक एक जाड दोरी घेऊन तिनें गच्च आंवळून टाकले. इकडे तिकडे चळवळ करण्यास अवसर मिळूं नये ह्मणून, पुनः एक एक जाड दोरी त्यांचे कंबरेस बांधून ती घोड्यांचे पोटांखालून घेतली. अशा रीतीनें त्या उभयतांस सर्वस्वी बद्ध केल्यावर ती मंडळी घोडे भरधांव फेंकीत पुनः मार्गक्रमण करूं लागली. घोड्यांच्या टापांचा आवाज व त्यांचें खिंकाळणें किंचित् काळ घुमून गेल्यामुळें, व थोडा मार्ग क्रमिला नाहीं तोंच, टापांचा आवाज फरसबंदीवर झाल्यामुळें आपण प्रथम कमानीखालून गेलों, व मागाहून दगडी पूल ओलांडिला, असा सहजीं तर्क द्युमत्सेन–बृहत्सेन यांनीं केला. कमान ओलांडून अंमळ पुढें गेले नाहींत तोंच, ते सर्व स्वार पुनः मोकळ्या हवेंत आले. मार्ग उताराचा लागला यामुळें अश्वगति तीव्र झाली.

द्युमत्सेन–बृहत्सेन खरे छातीचे पुरुष असतांही त्यांचे अंतःकरणांतील धैर्यरूप मेरू डगमगूं लागला. स्वप्राणरक्षणआशावृक्ष धाडकन् एकाएकीं उपटून पडला. दुःखसमुद्रांत पडलेले देह, मृत्युरूप लाटेनें केव्हां नाश पावतील याचा भरवसा वाटत नाहींसा झाला. देवगिरिदुर्गांतील श्रीमहाकालीचें दर्शन जरी त्यांस कधीं झालें नव्हतें, श्रीचें स्थान देवगिरिदुर्गांत आहे हें जरी त्यांनीं कधीं ऐकिलें नव्हतें, महाकाली भवानीची यत्किंचित्ही माहिती जरी त्यांचे कर्णपटावर कधीं गेली नव्हती, तरी "श्रीमहाका-

लीचा भक्ष्य " ह्या शब्दोच्चारानें त्यांचें सर्व धैर्य विलयास गेलें, मनाची स्वस्थता नष्ट झाली, मनःकल्पित तरंगांत देहभान बुचकळ्या खाऊं लागलें, सर्व लय श्री महाकालीकडे लागलें, स्थिर असणारे ज्ञानतंतु क्षुब्ध झाले, कल्पनाशक्ति दशदिशा भ्रमण करूं लागली, तत्क्षणीं भ्रमित मनानें एक्या अकाळविकाळ, उग्र, अरिष्टसूचक अशा श्रीचे मूर्तींत संचार केला, तिच्या दर्शनानें सर्व गात्रें विगलित झालीं, अंगावर रोमांच उभे राहिले, सर्व शरीरावर घर्मबिंदु उठले, व जिव्हा शुष्क झाली. वाचकहो, अदृश्य व अश्रुत दुर्धर प्रसंगाची खरी कल्पना होण्याकरितां त्यांनीं केलेले जे उपाय, त्यांच्या योगानें त्यांस जे क्लेश झाले, त्यांचें यथार्थ वर्णन करणें अल्पस्वल्प काम नव्हे. अल्पकालांत आपणांवर येणारें जें महत्संकट, त्याचें चित्र आपल्या नेत्रांसमोर उभें करण्याकरितां आपल्या कल्पनाशक्तीनें त्यांनीं जो अट्टाहास केला, आणि त्यामुळें त्यांस ज्या यातना झाल्या, त्या एखादें अपरिहार्य संकट दत्त ह्मणून पुढें उभें असतांही होणाऱ्या ज्या यातना, त्यांहून खचीत शतपट अधिक अंतःकरण दग्ध करणाऱ्या होत्या.

सुमारें दोन घटका लोटल्या आणि ती मंडळी एका गृहस्थाश्रमाजवळ येऊन पोंहोंचली. आश्रमवासी दंपत्य स्वागत करण्याकरितां मोठ्या औत्सुक्यानें त्वरेनें पुढें आलें. सर्व मंडळी खालीं उतरली, द्युमत्सेन–बृहत्सेन यांस बंधमुक्त करून त्यांचे मुखावरील कृष्णवस्त्र, व शरीरावरील घुंगट, काढून घेतलीं. दृष्टिपथ मोकळा होतांच चार भव्यमूर्ति दृष्टीस पडल्या. त्यांचीं शरीरें कृष्णवस्त्राच्छादित होतीं. हस्तांत नग्न खड्गें चमकत होतीं. शरीरसंपत्ति सुदृढ असून बांधा उंच व खंबीर होता. अशा अकाळविकाळ मूर्ति अवलोकन करून क्षणभर

मनास उद्विग्नता प्राप्त होत आहे नाहीं तोंच, त्यांपैकीं एकानें "भोजनविधि त्वरित आटोपला पाहिजे" ह्मणून सांगितलें. दुसरा काळपुरुष पुढें झाला आणि त्यानें या उभयतांस एका खोलींत नेलें. भोजनाची सिद्धता होतीच. खोलीचे एका बाजूस उत्पात महाराज आसन ठोकून मोठ्या थाटानें रौप्य पात्रांत वाढलेलें मिष्टान्न सेवन करीत होते. दुसरे बाजूस ते काळपुरुष तीव्र क्षुधा लागल्यानें भोजनावर बराच हात मारीत होते; परंतु द्युमत्सेन–बृहत्सेन यांची काय अवस्था ! तें मिष्टान्न त्यांस विषतुल्य वाटूं लागलें ! ! तीव्र क्षुधा नष्ट झाली. शंकितमन पुनः कल्पित तरंगांत मग्न झालें. त्यांनीं खोलींत चोंहोंकडे निरखून पाहिलें तों, ती उदास भासूं लागली. चोंहोंबाजूंच्या भिंतींवर चित्रें काढलेलीं होतीं. एकेठिकाणीं सती कृष्णानुजेचा पुत्र बाळ अभिमन्यु कौरवदळांत आपल्या बाहुबलानें महारथी जर्जर करून तीरासारखा व्यूह फोडीत चालला आहे असें दाखविलें होतें. दुसरीकडे महानिर्दय स्वकुलघातक धृतराष्ट्रपुत्र एकवटून सुभद्रासुतास अधर्मयुद्धानें हतवीर्य करून सोडीत आहेत, असें चित्र काढिलें होतें. हा हृदयभेदक देखावा पाहून द्युमत्सेन–बृहत्सेन यांचे नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. दृष्टि अंधुक झाली. किंचित् काल त्यांनीं नेत्र गच्च मिटून धरिले. पुनः नेत्र उघडून अवलोकन करूं लागले, तों, कपट आणि साहस ज्यांत प्रतिबिंबित झालीं आहेत अशा त्या काळपुरुषांच्या आरक्त नेत्रांतून आतांच ठिणग्या बाहेर पडतात कीं काय, असें त्यांस वाटलें. उत्पात महाराजांनीं भोजनसमयीं यांचेकडे मुळींच अवलोकन केलें नाहीं. सुमारें पाव घटका लोटली नाहीं तोंच, सर्व मंडळी हें असुरी भोजन आटोपून प्रवासाचे तयारीस लागली.

आपल्या अंगावर घुंगट टाकण्याचा व मुखावर वस्त्र टाकण्याचा त्या दुष्टांचा विचार दिसत नाहीं, असें पाहून द्युमत्सेन बृहत्सेन यांस अमळ बरें वाटलें. यासमयीं मध्यरात्र उलटून गेली होती, व ज्या भागांत सुभटवीर्याचा यक्षाबरोबर झालेला युद्धचमत्कार वर्णन केला आहे, त्याच भागांत सांगितल्याप्रमाणें ही रात्र काळोखी असून, वातावरणांत विद्युत्प्रकाश व मेघगर्जना यांनीं एकच गोंधळ उडवून दिला होता. मुखावर वस्त्र असल्यानें श्वासोश्वास करण्यास अंमळ त्रास पडत होता तो नाहींसा झाला, व दृष्टि धड असतांही प्राप्त झालेली अंधदशा नाहींशी झाली, ह्मणून उभयतांचे मनास किंचित् हुशारी आली.

तृषित अश्व उदक प्राशन करून त्या घनदाट वृक्षराजींतून झपाट्यानें निघाले. सुमारें प्रहर लोटला, आणि प्रभातकालचा मंद व शीतल वायु वाहूं लागून अंतःकरण सुप्रसन्न झालें. पूर्वदिशानभकांति रक्तवर्ण होऊं लागून, अरुणोदय होण्याचा समय जवळ येऊन ठेपला. पक्षिगण आनंदानें मंजूळ स्वर काढून जगच्चक्षूचें स्वागत करूं लागले. सुवासिक पुष्पांच्या परिमळानें दशदिशा व्याप्त झाल्या. दिनमणी उदयाचळीं आल्यानें हळू हळू दूरदूरचे पदार्थ दृष्टिगोचर होऊं लागले. यासमयीं द्युमत्सेन-बृहत्सेन यांची अशी खातरी झाली कीं, प्रतिष्ठान नगरीच्या दक्षिण दिशेकडे आपणास नेत आहेत. जसजसा सूर्य क्षितिजावर येऊं लागला तसतसें आकाशपटल स्वच्छ होत चाललें. प्रचंड जलवृष्टि आतां होईल घटकेंत होईल असें भासविणारे मेघ अदृश्य झाले. दूरच्या गिरिशिखरांवर आरूढ झालेले रविकिरण तप्त कांचनाप्रमाणें चमकूं लागले. फलभारानें नम्र झालेल्या

विस्तीर्ण वृक्षाग्रांवर व हरिततृणांकुरांवर अवशिष्ट राहिलेले दंवाचे बिंदु मौक्तिकांप्रमाणें चमकूं लागले. ठिकठिकाणीं झुळझुळ वाहणाऱ्या स्वच्छ वारिप्रवाहांत, त्यांचे तीरावर असणाऱ्या विविध प्रकारच्या तरूंच्या पडच्छाया नृत्य करूं लागल्या.

ही वनश्रीची अपूर्व शोभा अवलोकन करून द्युमत्सेन बृहत्सेन यांस अल्प तरी समाधान प्राप्त झालें काय ? शिव ! शिव ! ! अखिल प्राणिमात्र आनंदपूरित होत्साते इहलोकींचें सुखसेवन करण्याकरितां पुनरपि आपापल्या उद्योगास लागण्याचा हा सुसमय, त्या उभयतांस आपली आयुर्मर्यादा जवळ येत चालली ह्मणून फारच क्लेशजनक झाला. आपल्या प्रखर किरणांनीं विधात्याचें अलौकिक चातुर्य मूढ जनांस दृश्य करणारा भास्कर, आपणास यमसदनाचाच मार्ग दाखवीत आहे, असें मनांत येऊन मुख म्लान झालें. उदासीनतेनें त्यांस सर्वतोपरी व्यापून टाकलें, व समाधानकारक विचारांस अणुरेणुइतकी देखील जागा मिळाली नाहीं. उभयतांनीं परस्परांकडे अवलोकन केलें, परंतु निराशेचींच चिन्हें मात्र उभयतांचे मुखांवर व्यक्त होत होतीं. उभयतांनीं आपली दृष्टि त्या काळपुरुषांकडे फिरविली. यासमयीं त्यांचे मुखांवर पूर्वीप्रमाणें कृष्णवस्त्राच्छादन नसल्यानें ते फारच भयंकर दिसत होते. त्यांचे ते आरक्त नेत्र, त्यांच्या त्या भयोत्पादक मुद्रा, तो सिंदूर तिलक, ती कृष्णवर्ण कांति, हीं पाहून द्युमत्सेन-बृहत्सेन बरेच कांचरले. उत्पात महाराजांकडे जों त्यांनीं पाहिलें तों, त्यांचे ठिकाणीं सदयतेचा पूर्ण अभाव आहे असें दृष्टीस पडलें. त्यांनीं पुनः एकमेकांकडे दृष्टि फिरविली. उभयतांचे नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्यांनीं नेत्रसंकेतानें अंतःकरणांतील जो भाव परस्परांस प्रगट केला त्याचें यथार्थ वर्णन करूं

गेल्यास साधणार नाहीं हें तर खरेंच, परंतु त्याची थोडी कल्पना वाचकांस करून देण्याकरितां, "आपली मृत्युवेळ भरत आली" असें त्यांनीं नेत्रसंकेतानें परस्परांस कळविलें, इतकें ह्मटलें असतां चालेल.

दोन घटका दिवस वर आला आणि ती सर्व मंडळी एका पर्णकुटिकेसन्निध येऊन पोहोंचली. पर्णकुटिकेसभोंवतालच्या उपवनांतील नानाविध बालवृक्ष फुलूं लागल्यानें एक अपूर्व शोभा दिसत होती. उन्नत वृक्षांवर आरुढ झालेल्या पुष्पलता, उपवनांतील चिरेबंदी पद्पथ, आंतील भव्य अश्वशाला, जलानें तुडुंब भरलेलीं टांकीं, हीं सर्व श्रांत चित्तास किंचित् सौख्यदायक झालीं. सर्वांचें स्वागत करण्याकरितां एक वृद्ध गृहस्थ काठी टेंकीत पुढें आला, आणि उत्पात महाराजांस मोठ्या विनयानें ह्मणाला "महाराज भोजनाची सिद्धता आहे." हा वृद्ध गृहस्थ वयानें पंचायशीं वर्षांवर असावा असें अनुमान होत होतें. तोंडांत एक दांतही नाहीं, मान लटलट कांपतच आहे, सर्वांगास सुरकुत्या पडल्या आहेत, पाठीला पोंक येऊन शरीर धनुष्याकार झालें आहे, कर्णेंद्रिय धड नाहीं, नेत्रांनीं स्पष्ट दिसत नाहीं, अशी ती यमसदनाच्या मार्गास लागलेली वृद्ध मूर्ति पाहून द्युमत्सेन-बृहत्सेन निराश झाले. या प्रसंगीं आपणास कोण साहाय्यकारी मिळणार ? या काळपुरुषांचे हातून आपली मुक्तता कशी होणार ? वगैरे विचारांनीं अंतःकरण दग्ध झालें. उत्पात महाराज स्नान करून श्रीअंबिकेच्या पूजेस लागले. त्यांच्या त्या परिचारकांनीं द्युमत्सेन-बृहत्सेन यांस एका खोलींत आणून बसविलें, व त्या वृद्ध गृहस्थास तेथें बसावयास सांगून ते पुनः अश्वशालेकडे गेले. कोण त्या वेळचा तो हृदयद्रावक देखावा !

उभयतांनीं एकमेकांस दृढालिंगन दिलें. नयनींचा बाष्पपूर अनावर झाला. कंठ सद्गदित होऊन मुखांतून एक शब्दही निघेनासा झाला. माता पिता बंधु आप्तजन यांचें स्मरण होऊन अंतःकरण शोकाकुल झालें. वाचकहो, हें आमचें वीरद्वय स्वामीकार्यार्थ आजन्म आपली काया कष्टवून त्याच सत्कृत्यांत आपले अमूल्य प्राण आज खर्ची घालण्यास सिद्ध झालें ! केवढी त्यांची थोरवी ! ! ज्याच्या अतुलपराक्रमावर विश्वासून राजकन्या प्रभावतीचें वसतिस्थान शोधून काढण्याचें विलक्षण धाष्टर्य त्यांनीं केलें त्या भाग्यशाली स्वामीचें स्मरण होऊन कंठ दाटून आला. विपरीतकाळीं आपला साहाय्यकर्ता सन्निध नाहीं, काय हा विचित्र दैवयोग ! आपल्या गंगाजलाप्रमाणें शुद्ध प्रेमानें या उभयवीरांच्या हृत्पटावर स्नेहभावाचा ठसा ज्यांनीं उमटविला, अशा त्या नववधु वसुमति-सुमति नेत्रांसमोरून हालेनाशा झाल्या. नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. आपल्या वृद्ध मातापित्यांवर केवढे दुःखाचे पर्वत कोसळतील ! ही कल्पना मनांत येऊन अंतःकरण विदारण होऊन गेलें. जिनें आपलें लालनपालन मोठ्या वात्सल्यानें केलें, जिनें आपल्याकरितां देह कष्टविला, त्या जन्मदात्या मातेचें स्मरण होऊन जो हुंदका आला, तो कांहीं केल्या आंवरेना. उभयतां एकाएकीं दचकल्यासारखे झाले, आणि एकमेकांस " श्री महाकालीचा भक्ष्य " याचा अर्थ काय ह्मणून विचारूं लागले. याचें उत्तर उभयतांसही देतां येईना. परंतु हे शब्द ऐकून उभयतांचीं शरीरें कंपायमान झालीं. भीतीनें नेत्र ताठल्यासारखे झाले. कल्पनाशक्ति कुंठित होऊन, एकमेकांस गच्च मिठी मारून, ते शोकसागरांत निमग्न झाले. उत्पातमहाराजांची पुजार्चा आटोपून सर्व मंडळी भोजनास बसली.

सुमारें चार घटका लोटल्या आणि सर्व मंडळी पुनः प्रवासास निघाली. अस्तमानपर्यंत विश्रांति घेत घेत प्रवास चाललाच होता. रात्रींच्यारात्र एका निर्जन व उदास पर्णकुटिकेंत आराम करून सुप्रभातीं ती मंडळी मार्गास लागली. सुमारें अर्धप्रहर दिवस वर आला आणि ते एका विस्तीर्ण आम्रवृक्षराजीसन्निध आले. अमळ पुढें गेले नाहींत तोंच, त्यांस उतार मार्ग लागला. श्रीगोदेचा पवित्र वारिप्रवाह दृष्टिगोचर होऊं लागला. गोदातटाकीं वाढलेल्या उच्च वृक्षसमुदायांत अश्व आले. सर्व मंडळी खालीं उतरली. गुरुवर्य उत्पातानीं नेत्रसंकेतानें आपल्या परिजनांस 'द्युमत्सेन–बृहत्सेन यांस स्नान घालून आणा' असें सुचविलें. गुरुजींची आज्ञा होतांच, उभयतांस समवेत घेऊन ते गोदेंत शिरले. या स्थलीं प्रवाह संथ असल्यानें व रविकिरण जलांत प्रतिबिंबित झाल्यानें तळचे पदार्थ स्पष्ट दिसत होते. एकाएकीं द्युमत्सेन दचकल्यासारखा होऊन ओरडून ह्मणाला, "मित्रा बृहत्सेना, घातरे घात!" बृहत्सेनानें वळून पाहिलें तों, द्युमत्सेन भीतिग्रस्त होत्साता क्षणैक बेशुद्ध झाला आहे असें त्यास दिसलें. तत्क्षणीं ते चार पुरुष सन्निध येऊन "काय! काय! कोण आहे! कोठें आहे!" ह्मणून एकदम ह्मणूं लागले. इतक्यांत त्यांपैकीं एकाची दृष्टि वारिप्रवाहांत वहात आलेल्या एका शवाकडे गेली. या समयीं त्याचे मुखावर आश्चर्य व खेद यांचीं चिन्हें स्पष्ट दिसत होतीं. सर्वांचे नेत्र त्या शवाकडे लागून राहिले, व त्यांचे मुखांतून एकदम "नारदी, नारदी" असे उद्गार निघाले. द्युमत्सेन–बृहत्सेन निश्चल नेत्रांहीं परस्परांकडे साश्चर्य अवलोकन करूं लागले. आपल्या परिजनांच्या मुखांतून "नारदी" हें नांव निघतांच, उत्पात महाराज जागच्या जागीं किंचित् खिन्न हो-

त्साते स्तब्ध झाले. परिजनांनीं त्वरा करून तें शव गुरुमहाराजांपुढें आणिलें. गुरुवर्यांनीं शवाकडे अवलोकन केलें तों, त्यास जलसमाधि मिळून बराच काळ लोटला असावा, असा त्यांचा तर्क झाला. सर्व शरीर फुगल्यानें व वर्णकांति पालटल्यानें बरेंच रूपांतर झालें होतें. परिधान केलेल्या वस्त्रावरून ती ' नारदी 'च असावी, असें त्यांनीं पक्कें ओळखिलें; व शोकविव्हल होऊन दीर्घस्वरानें ह्मणाले," ही खरोखरच 'नारदी'च ही ! " इकडे द्युमत्सेन–बृहत्सेन कौतुकानें त्या शवाकडे दृष्टि देऊन उभे होते. 'नारदी'वर हा प्रसंग कसा ओढवला असावा, या गोष्टीची कल्पना उत्पातास करतां येईना. मनास चांचल्य प्राप्त होऊन मनःकल्पित तरंगांनीं त्यांस किंचित् कालपावेतों भ्रमिष्ट केलें. विचारसरणीच्या ओघांत आपल्या परिजनांकडे वळून ते ह्मणाले " काय ही अपघातानें नदींत पडली ह्मणावें ! " इतक्यांत स्मरणशक्ति जागृत होऊन दोन दिवसांपूर्वीं त्यांनीं तीस श्वेतप्रासादीं पाहिल्याचें मनांत आलें, व ते मोठ्यानें ह्मणाले " दोन दिवसांपूर्वीं कीं हो मीं हिला श्वेतप्रासादीं पाहिलें होतें ! " तें शव नदींतून वर काढून आणणारा मनुष्य ह्मणाला " खरोखर हिचा कोणी तरी वध केला असावा ! " इतकें बोलून नारदीचे ऊरप्रदेशीं स्थित झालेली कट्यार त्यानें उपसून बाहेर काढिली. गुरुवर्यांनीं मोठ्या कष्टानें ती हातीं घेऊन अवलोकन केलें, तों तिचें तें पाणी व तिची ती रत्नजडित मूठ दृष्टीस पडतांच, त्यांचें मुख म्लान दिसूं लागलें. किंचित् काल चित्ताचे ठिकाणीं औदासीन्य प्राप्त झालें. एकाएकीं क्रोधवह्नीनें वदनकांति रक्तवर्ण करून सोडिली. नेत्रांचे ठायीं आरक्तता प्राप्त होऊन अधरोष्ठ स्फुरण पावूं लागला. विवेकानें मनाचें आकलन करून

त्यांनीं ती कट्यार आपल्या वस्त्राखालीं झांकून घेतली. उत्पात महाराजांची ही स्थिति पाहून परिजन गोंधळून गेला, तरी द्युमत्सेन–बृहत्सेन यांचेकडे त्यांची दृष्टि एकसारखी होतीच. या समयीं आमच्या उभय वीरांनीं आपली मुक्तता करून घेण्याचें मनांत आणिलें असतें तरी त्यांस तसें करण्यास मुळींच अवसर नव्हता.

**गुरु०**—(आपण ' नारदी ' विषयीं बोलत आहोंत असें दर्शविण्यासाठीं शवाकडे दृष्टि करून ) ह्या शोचनीय प्रसंगामुळें माझा संकल्प मला फिरविलाच पाहिजे. याच पाऊलीं मला प्रतिष्ठानाकडे परत गेलें पाहिजे; कारण स्वधर्मत्यागी, दुष्ट, चांडाळ, मालिनी हिचा क्षोभ अनावर होऊन कदाचित् आपले आश्रित जनांवर मोठा प्रसंग गुदरेल. ( किंचित् काल थांबून आपल्या परिजनांकडे पुनः दृष्टि करून ) तुह्मी मार्गस्थ व्हा, आणि हातीं घेतलेला कार्यभाग, मी तुह्माबरोबर असतांना जसा निर्विघ्नपणें शेवटास गेला असता तसाच तुह्मीही पण मोठ्या दक्षतेनें तडीस न्या.

परिजनांनीं गुरुजींच्या शेवटल्या सांकेतिक भाषेचा गुढार्थ आपणांस पूर्णपणें समजला असें नेत्रद्वारें स्वामींस कळवितांना, स्वामिकार्यार्थ अंतःकरणांतील तत्परता पूर्ण दर्शविली. हा अनिष्टसूचक गूढभाषणप्रकार पाहून द्युमत्सेन–बृहत्सेन भयविव्हल झाले.

**द्युम०**—( गुरुवर्य उत्पात अश्वारूढ होण्यास सिद्ध झाले हें पाहून गुरुचरणीं लीन होऊन सजल नेत्रांनीं ) महाराजांनीं दीनजनांवर अनुग्रह करून एकांतीं दोन शब्द बोलण्याची आज्ञा केल्यास महत् उपकार होतील.

**गुरु०**—( तिरस्कारदर्शक व साशंक मुद्रेनें द्युमत्सेनाकडे वळून ) काय बोलावयाचें आहे ?

**द्युम**०—हेंच जर सर्वांसमक्ष ( इतकें बोलून त्यानें आपले नेत्र त्या चार दुष्ट चांडाळांकडे फिरविले ) बोलावयाचें असतें तर महाराजांस विज्ञप्ति करण्याचें प्रयोजनच नव्हतें.

**गुरु**०—( आपल्या परिजनांकडे वळून त्यांस अमळ दूर जाण्यास सांगितलें, व ते सन्निध नाहींत असें पाहून द्युत्मसेन बृहत्सेन यांचेकडे वळून ) हं बोला, काय म्हणणें आहे ?

**द्युम**०—( नेत्रांस पाणी आणून ) गुरुवर्य, या निरपराधी अनाथ जनांस कोणत्या घोर यातना भोगाव्या लागणार आहेत याची कल्पना आह्मांस करतां येत नाहीं. परंतु आपल्या मुखांतून निघालेले ते भीतिप्रद शब्द ऐकून आम्ही जीवित्वाची आशा सोडून मृत्यूस तोंड देण्यास सिद्ध आहोंत. चरणीं इतकीच विनंति आहे कीं, कोणतेंही अमानुष कृत्य करण्यापूर्वी आपण पोक्त विचार करून मग जें इष्ट तें करावें. हा दीनजन स्वसंरक्षणार्थ ही विज्ञप्ति करीत नसून महाराजांच्या भावी हितार्थंच ही योग्य वेळीं सुचना करीत आहे; कारण आमच्या एका केंसास जर आपण ढका लावाल तर आमच्या महाप्रतापी स्वामींचा क्षोभ अनावर होऊन ते आपणास यमसदनाचा मार्ग दाखविल्याखेरीज कधींही स्वस्थ बसणार नाहींत.

**गुरु**०—( संतप्त होऊन द्युमत्सेनाकडे वळून ) सुभटवीर्याबद्दल बोलणें चाललें असेल !!—हं हं ! अशा गोष्टी सांगून का मला भीति वाटणार आहे ? तुमच्या स्वामीस मी पक्कें ओळखितों समजलांत !

**द्युमत्सेन–बृह**०—(साश्चर्य) काय आपण आमचे स्वामींस पक्कें ओळखितां ?

**गुरु०**—( उच्च स्वरानें ) होय. होय. त्याची मी अनृत-भाषणप्रिय, साहसी आणि कपटी अशा लोकांत गणना करितों. राजाधिराज श्रीविक्रमादित्य यांस मीं पाठविलेलें पत्र त्याच्या हातीं कसें लागलें हें एक परमेश्वरास माहीत—तें पत्र हातीं येतांच इष्ट हेतु साध्य करून घेण्यासाठीं कपटरूपानें तो खल मजकडे आला, आणि माझें हृद्गत त्यानें सर्व समजून घेतलें. पुनः प्रतिष्ठाननगरींत भरलेल्या प्रचंड दरबाराचे प्रसंगीं आपण श्रीविक्रमादित्य यांचेकडून आलों आहोंत, असें दर्शविण्याकरितां त्यानें खोटेंच संदेशपत्र तयार केलें होतें. परंतु आमचें महद्भाग्य कीं, त्या प्रसंगीं त्याचें कापट्य दृग्गोचर होऊन सर्वांनीं त्याचा उपहास केला.

**सुभ०**—(रागानें लाल होऊन) असत्य असत्य ! व्यर्थ निंदा !!

**बृह०**—( मध्येंच ) गुरुवर्य, आपणास भ्रम झाला असावा असें दिसतें !

**गुरु०**—( मुखावर क्रोधाचीं चिन्हें दर्शवून ) तुमच्या स्वामीची खरी योग्यता मला पक्की समजली आहे. तुमचा स्वामी जेव्हां प्रतिष्ठानांत आला, तेव्हां देवगिरिदुर्गाधिपति महाराज चण्डवर्म यांस त्यानें त्यांचे पुत्राकडून ( चंद्रसेनाकडून ) एक पत्र आणिलें होतें. त्याच पत्रांत महाराज चंद्रसेन यांनीं पित्यास असें लिहिलें होतें कीं, सुभटवीर्याबरोबर फार दक्षतेनें वागा. त्या दुष्टाची त्यांनीं प्रथम भेटीसच योग्यता जाणिली. तुमचा स्वामी, तो कापट्यपटु खल, कदाचित् तें पत्र फोडील या भीतीनें महाराजांनीं पत्र फार सावधगिरीनें लिहिलें होतें. पुत्राच्या लिहिण्याचा आशय पाहून, चंडवर्म महाराजाचें मन कलुषित झालें. त्यांनीं तत्काल अवंतिन-

गरीस गुप्त हेर पाठवून त्यास अशी आज्ञा केली कीं, 'सुभटवीर्य हा कोण आहे ? याचा राजगृहाशीं कांहीं संबंध आहे कीं नाहीं ? राजसभेंत याची कितपत योग्यता आहे ? इत्यादि सर्व माहिती मिळवून त्वरित परत आलें पाहिजे.' आज्ञेप्रमाणें दूत अवंतिनगरीस गेला, आणि चमत्कार असा कीं, त्या नगरींत त्यानें फक्त तीन प्रहर मुक्काम केला व त्वरित प्रतिष्ठानास परत आला.

सुम०---( मध्येंच ) पुढें काय झालें ?

**गुरु०**---( संतप्त होऊन उच्च स्वरानें ) थांबा, पुढें काय झालें हें तुमचें तुह्मांस नाहीं का कळत ? चण्डवर्म महाराजांच्या आज्ञेप्रमाणें दूतांनीं प्रथम सुभटवीर्य हे कोण आहेत ? असा प्रश्न करितांच 'नृपवर श्रीविक्रमादित्य यांच्या सहोदराशिवाय राजगृहीं सुभटवीर्य हें नांव धारण करणारा अन्य कोणीही नाहीं' हें उत्तर मिळालें. हें ऐकून तो दूत अगदीं खिन्न झाला; परंतु इतक्यानेंही मनाचें समाधान न होऊन त्यानें राजसुमंताची भेट घेतली, व सर्व सरदारांचीं नांवें विचारूं लागला, तों त्यांत सुभटवीर्य हें नांव कोठेंही निघालें नाहीं. मग मनाची पक्की खातरी होऊन तो स्वस्थानीं परत आला. त्या प्रसंगीं त्या एकाक्षानें जर त्यास पाठीशीं घातलें नसतें, तर यापूर्वींच त्यानें आपला देह श्रीमहाकालीस अर्पून अविनाशी निर्मल सुखाचा अनुभव घेतला असता ! ! तुह्मांला माहीत असेलच कीं, तो एके वेळीं या श्रीअंबेच्या निःसीम भक्तांचे हातून निघून गेला. ( विश्वजित महाराजांचे साहाय्यानें सुभटवीर्यानें उत्पात महाराजांचे हातून आपली मुक्तता करून घेतली त्याच प्रसंगाची उत्पातांनीं ही आठवण दिली.)

**द्युम०**—( उत्पाताकडे निश्चल नेत्रांहीं अवलोकन करून ) गुरुमहाराज, आपलें भाषण ऐकून फारच विस्मय वाटत आहे! आमच्या महाराजांचा दरबारीं उपहास झाला, तसेंच आपल्या हातून महाराजांनीं आपली मुक्तता करून घेऊन, मृत्युवेळा टळविली, इत्यादि गोष्टी आह्मां उभयतांसही समजल्या नव्हत्या!! महाराजांनीं हा कालपर्यंत जें जें सांगितलें तें तें सर्व आह्मांस अश्रुत होय!!! असो. या अखिल भरतभूमीवर ज्याचा कीर्तिध्वज फडकत राहिला आहे असा जो आमचा परम सात्विक, दयाळू, दानशूर स्वामी, त्याच्या कीर्तीस कलंक लावण्याचें जें आपण महत्पाप केलें, त्याबद्धल मात्र आह्मांस खेद होत आहे.

**गुरु०**—( मध्येंच ओरडून ) असत्यवादी खलानो—अनृत भाषण मुखाबाहेर काढून त्या दुष्टाचें कपट लपवूं पहातां काय? त्याचा मी असाच उपहास करणार. राजकन्येच्या वसतिस्थानीं तुमचें आगमन हेंच तुमच्या स्वामीच्या विश्वासघाताचें स्पष्ट दर्शक आहे. 'राजकन्येचा वास ज्या स्थलीं आहे तें स्थल मला माहीत झाल्यासही त्याबद्धल अवाक्षरही माझे मुखावाटे निघणार नाहीं,' अशी तुमच्या स्वामीनें मजजवळ आण—भाक घेतली असतांही, त्यानें तुह्मां उभयतांस त्या स्थलीं पाठविलें, याहून दुसरा विश्वासघात तो कोणता?

**द्युम०**—( आकाशपटलाकडे नेत्र करून ) ईश्वरसाक्ष, आमच्या स्वामींनीं त्या स्थलाविषयीं यत्किंचितूही माहिती आह्मांस दिली नाहीं.

**गुरु०**—( द्युमत्सेन—बृहत्सेन यांचेकडे तीर्यक् दृष्टीनें अवलोकन करून ) ही गोष्ट सत्य आहे काय? बरें, तुमच्या स्वामीनें तुह्मांस येथें पाठविलें नाहीं, असें जरी धरून चाललें, तरी त्यावरून तुमचा स्वामी सत्यवादी आहे असें ह्मणतां येत नाहीं,

किंवा त्यावरून त्याचा मी उपहास निरर्थक केला असेंही ह्मणतां येणार नाहीं.

द्युम०--( गुरुचरणीं लीन होऊन ) गुरुमहाराज, अत्यंत गूढ सत्यप्रकार आपणास सांगून आपला भ्रमपटल दूर केल्यास, आपण मनांत योजिलेला दुष्ट हेतु सोडून देऊन, आह्मां उभयतांस जीवदान देण्यास आपण खचित् सिद्ध व्हाल यांत शंका नाहीं. प्राणरक्षणार्थ अंतकाळपर्यंतही मुखाबाहेर काढूं नये अशी गोष्ट आह्मीं आपणास सांगितली असतां, आह्मांवर स्वामींचा अल्पही कोप होणार नाहीं; कारण ते तसेच परम दयाळू आहेत. ते मनाचे कोंवळे असून आश्रितांवर प्रेम ठेवणारे आहेत. आह्मा दीन जनांस ते क्षमा करतील इतकेंच नव्हे, तर ते आमच्या एका केंसासही ढका लावूं देणार नाहींत.

गुरु०—( हें भाषण ऐकून गोंधळून त्यानें साश्चर्य द्युमत्सेनाकडे अवलोकन केलें. भाषणांत मृदुत्व आणून ) इतकें गूढ तें काय!! सांगा पाहूं. ( मध्येंच किंचित् कोप आल्यासारखें दाखवून ) मजशीं फार जपून वागा. माझें सामर्थ्य आपणांस अद्याप समजलें नाहीं. तुमचें वर्तन--

द्युम०--( मध्येंच करद्वय जोडून ) महाराजापाशीं आमचें वर्तन फार लीनतेचें आहे. महाराजांचा अधिकार आह्मांस माहीत आहे. मी जें सांगणार तें फारच गूढ आहे. ती गोष्ट पिशाचकर्णीं देखील जातां कामा नये ( उत्पाताचे कानाशीं लागून ) थोडक्यांतच सुभटवीर्य हे--( द्युमत्सेनानें पुढील शब्द अगदीं खोल स्वरानें उत्पाताचे कर्णीं सांगितले. )

द्युमत्सेनाच्या कानमंत्राचें केवढें सामर्थ्य! उत्पात महाराज यांची मुखश्री तत्काल पालटून जाऊन, ते उत्साहपराङ्मुख झाले. दूरदर्शीपणा आपले ठायीं सदैव जागृत आहे, ह्मणून जो

गर्व वाहिला, तो निरर्थक असें वाटून मनास हुरहुर लागली. ह्या कालपर्यंत ही गोष्ट आपले ध्यानांत आली नाहीं, ह्मणून ते आपले स्वतःची फार निर्भर्त्सना करून घेऊं लागले, व आपल्याशींच ह्मणूं लागले 'हें खरें असेल काय ! ! ! आतां मात्र अज्ञानांधःकारानें भरलेल्या या अंतःकरणांत लक्कन् उजेड झाला खरा.'

**द्युम०**––(उत्पात महाराज नेत्र मिटून समाधि लावून स्वस्थ उभे राहिले हें पाहून ) गुरु महाराजांचा अनुग्रह आह्मां उभयतांवर आतां होणार नां ?

**गरु०**––( त्याचें लक्ष द्युमत्सेनाच्या प्रश्नाकडे मुळींच गेलें नाहीं. त्यांची समाधि लागलीच होती. द्युमत्सेनानें स्फुट केलेला गूढ प्रकार श्रवण करून मन द्विधा झालें. संकल्पित इष्ट हेतु विकल होणार असें वाटून चित्तास उद्विग्नता प्राप्त झाली. निमिषमात्र लोटला नाहीं तोंच, कांहीं स्मरल्यासारखें करून ) राजकन्येची मुक्तता करण्याचें धाष्टर्य आपणच केलें नाहीं का? थांबा तर मग. याचें योग्य बक्षीस आपणांस दिलेंच पाहिजे. ( इतकें बोलून उत्पातांनीं खुणेनें आपल्या परिजनांस सन्निध बोलाविलें ).

तत्क्षणीं ते काळपुरुष द्युमत्सेन–बृहत्सेन यांच्या जवळ आले. गुरुजी अश्वारूढ झाले. जाते समयीं त्यांनीं सर्वांत वयानें पोक सेवक होता त्याचे कानांत शेवटला मंत्र सांगितला, आणि सर्वांस "स्वकर्तव्यतत्परता तुमचे अंतःकरणांत सदैव जागृत असूं द्या" असा आशीर्वाद दिला. हातीं घेतलेला कार्यभाग अर्धवट शेवटास गेला नाहीं तोंच, प्रतिष्टानास परत जाणें भाग पडलें, ह्मणून किंचित् खेद वाटला; परंतु परिजनांवर विश्वसून त्यांनीं त्याबद्दल फारसा विषाद मानिला नाहीं. अशा

रीतीनें सर्व व्यवस्था लावून गुरुवर्य परत प्रतिष्ठानास निघाले, व परिजन द्युमत्सेन–बृहत्सेनासह पुढें मार्गास लागला.

समरांगणीं शत्रूस पराभूत करून वीरमातांच्या उदरीं जन्म घेतल्याचें साफल्य करणारें हें आमचें वीरद्वय, कालचक्राच्या सपाट्यांत सांपडून आज हतवीर्य होत्सातें, शूर पुरुषांस अनुचित जी पराधीनता तिचे दास बनून राहिले तेव्हां दैवगति विचित्र खरी ! ! आजन्म आपल्या स्वामीची एकनिष्ठ सेवा करून, अंतीं स्वामीद्रोहाचें महत्पाप माथीं मारून घेऊन परलोकच्या सुगतीस मुकले! काय हें विपरीत दैव ! ! युद्धसमयीं ज्यांनीं आपल्या बाहुबलानें असंख्य महावीर जर्जर करून, आपले चरण जित शत्रूंच्या अश्रुजलानें क्षालन करून घ्यावेत अशी ज्यांची योग्यता, त्यांचा प्रतापसूर्य अस्तंगत होऊन त्यांनीं आज प्राणदानाची भिक्षा यःकश्चित् राजाश्रितापाशीं मागावी ! काय ही निकृष्टावस्था ! ! ! शरणांगतांचें रक्षण करणाऱ्या दीनवत्सलप्रभूचें स्मरण करून ते मार्गास लागले. प्रतिष्ठानच्या दक्षिण दिशेकडील मार्ग सोडून, ते परत उत्तरदिशेकडे जाऊं लागले. गुरु आज्ञेप्रमाणें नियमित स्थलीं आपणास अस्तमानपर्यंत पोंहोंचलेंच पाहिजे असें जाणून, ते सर्वजण अश्वगति तीव्र करते झाले. या समयीं नभप्रदेशीं मेघ नसल्यानें दिनमणीच्या सहस्रकरांचें तेज असह्य होऊं लागलें. जसजसा रवि आकाशपटलाच्या मध्यभागीं येऊं लागला, तसतसे त्याचे तप्तकिरण परम तापद होऊं लागले. चोंहोंकडे उष्णवायु वाहूं लागून तो प्रांत अंगारमय भासूं लागला. क्षुधेनें जठराग्नि खवळून गेला. मुख निस्तेज झालें. सर्व शरीर तप्त लोहाप्रमाणें तापून गेलें. अंगावरील वस्त्रें घर्मानें चिंब झालीं; परंतु त्या काळपुरुषांची हीच अवस्था झाली काय ? छे! छे! ते प्रति

राक्षसच! त्यांस यापासून यत्किंचितूही विकृति झाली नाहीं. त्यांचें सर्व लक्ष अस्तमानपर्यंत आपण नियमित स्थलीं कसे पोंहोंचतों याकडे लागलें होतें, ह्मणून ते अश्व झपाट्यानें चालवीत होते.

अस्तमानच्या समयास देवगिरिदुर्गाचा उच्च मस्तकदृक्पथांत येऊं लागला. दुर्गावर अति उंच फडकणारा ताम्रध्वज, सूर्यकिरणदीप्ति मेघमंडळांतून डोकावून पहात आहे, असें भासलें. अस्ताचलगामी सूर्यनारायणाच्या संध्या रक्तकांतीनें अत्युच्च वृक्षाग्रांवर एक अनुपम शोभा आणिली होती. अमळ पुढें गेले नाहींत तोंच, ज्यांकडे पाहून शत्रूचें हृदय विदारण होईल, असे मोठमोठे तट दृष्टिगोचर होऊं लागले. एकाएकीं मार्गदर्शकानें आपला अश्व आड रस्त्यानें काढिला, हें पाहून सर्वांनीं त्याचेंच अनुकरण केलें. अल्पकालांतच, दुर्गासभोंवतीं जी विस्तीर्ण आम्रवृक्षराजी होती ह्मणून सांगितलें, त्या राजीचे बाजूनें ते जाऊं लागले. मार्गावर त्यांस एक जीर्ण देवालय लागलें. या स्थलीं येतांच सर्वजण घोड्यावरून खालीं उतरले. अश्वांस वृक्षांशीं बांधून त्या काळपुरुषांपैकीं एकजण किल्याकडे निघाला. सुमारें एक घटका लोटली, आणि तोच पुरुष समवेत एक वृद्ध गृहस्थ घेऊन परत आला. ह्या वृद्ध गृहस्थास पाहतांच द्युमत्सेन-बृहत्सेन यांनीं हा सुमंत होय असें तत्काल ओळखिलें. सुमंतानेंही उभयतांकडे पाहिलें, तेव्हां द्युमत्सेन-बृहत्सेन यांस असें वाटलें कीं, त्यानें आपणास ओळखून आपलें दुःख पाहून कळवळून प्रेमदृष्टीनें आपणाकडे अवलोकन केलें; परंतु हा भ्रम तत्काल दूर झाला. सुमंत त्या काळपुरुषापाशीं कांहीं गूजगोष्ट करीत आहे असें जेव्हां त्यांनीं पाहिलें, तेव्हां मनाचे ठायीं क्षणेक उद्भवलेला आशातंतु नष्ट झाला.

**सुमंत**०---(क्षणभर थांबून द्युमत्सेन-बृहत्सेन यांचेकडे व-ळून ) मजबरोबर पुढील मार्गास लागण्यापूर्वी तुह्मी उभय-तांनीं आपले नेत्र कृष्णवर्ण वस्त्रानें झांकून घेतले पाहिजेत. अशा रीतीने मार्ग क्रमीत असतां, मुखावाटे एक चकारशब्द का-ढल्यास, उभयतांच्या जिव्हा छेदून टाकण्यास ( त्या काळ-पुरुषाकडे बोट करून ) हे लोक यत्किंचित्‌ही मागें पुढें पाहणार नाहींत.

हे कठोर शब्द श्रवण करून सुमंतांनीं वृद्धदशेचा परित्याग करून तारुण्याची भरज्वानी अंगिकारिली कीं काय, असें भा-सलें. सुमंत पुढें चालू झाले असें पाहून, त्या चार पुरुषांनीं द्युमत्सेन-बृहत्सेन यांचे नेत्र झांकून सर्वांगाभोंवती रज्जुवेष्टन केलें. या समयीं त्या उभयतांस फक्त चालतां येण्यापुरतें मो-कळें सोडिलें होतें. ही सर्व व्यवस्था आटोपली असें पाहून, सुमंतांनीं त्या देवालयाचे एके बाजूस एक लहानसें द्वार उघ-डिलें, आणि ती सर्व मंडळी जिना उतरून खालीं जाऊं लागली.

यावज्जन्म ज्यांनीं आपल्या विमल कीर्तीस अपयशाचा डाग कधींही लागूं दिला नाहीं, ज्यांनीं संग्रामसमयीं स्वहस्तें अनंत वीर परलोकास पाठविले, ज्यांनीं स्वपराक्रमानें दिग-तरीं आपली कीर्ति गाजविली, स्वामिसेवा ही ज्यांची कर्त-व्यता, शरणागतांस जीवदान देणें हीच ज्यांची सद्यता, समरांगणीं तलवार गाजवून शत्रूचें पारिपत्य करणें हेंच ज्यांचें ब्रीद,हस्ताचे ठायीं चमकणारें खड्ग हीच ज्यांची अर्धांगी,खलांस शासन करून भरतभूमीच्या लेंकरांस सुख देणें हेंच ज्यांचें व्रत, त्या शूर वीरांची या प्रसंगीं काय अवस्था झाली असेल बरें ! त्यांस हा प्रसंग किती क्लेशदायक झाला असेल बरें ! ! हीं

दीनावस्था त्यांस किती दुःसह झाली असेल बरें ! ! मातापित्यांचें स्मरण होऊन नयनींचा बाष्पपूर अनावर झाला. स्वामिचरण अंतरले ! आप्तबंधुमित्र यांची संगत सुटली ! इहलोकींची अवतारसमाप्तीची वेळा भरत आली ! गेल्या तीन रात्रीं अंतःकरणांत उद्भवलेला हृद्रोग बळावत जाऊन चिताज्वरानें सर्वांगाचा दाह होऊं लागला ! हरहर ! कोण ही शोचनीय अवस्था ! अशा रीतीनें ह्या भुयारांतून मार्ग क्रमीत असतां पदपाताव्यतिरिक्त ध्वनि मुळींच ऐकूं येत नव्हता. या प्रसंगीं मार्गदर्शकाचें काम सुमंतानीं पत्करिलें होतें. त्याचे हस्तांतील मंदप्रकाशित दीपककिरणांनीं आमच्या उभय वीरांस वधस्थानीं पोहोंचविणाऱ्या प्रतिराक्षसांस बरीच मदत केली. क्षणोक्षणीं निरनिराळ्या मानसिक कल्पना अंतःकरणांत उद्भवून त्यांनीं उभयतांस अगदीं विव्हळ करावें, क्षणेक सर्व शरीर कंपायमान व्हावें, क्षणेक श्वासोश्वास बंद व्हावा, क्षणेक प्राणवायु निघून गेला असा भास व्हावा. या सर्व बाह्य चिन्हांनीं अंतर्यामीं होणाऱ्या दुर्निर्वाह घोर यातनांचें चित्र प्रेक्षकांचे दृष्टीस पाडावें. या भूतलपथानें आपणास कोठें नेत आहेत, याची यथार्थ कल्पना उभयतांस यत्किंचितही करतां येईना. अंधदर्शतेही, हा भूतलपथ उंच सखल आहे, हें त्यांनीं तत्काल जाणिलें; परंतु मंडळी कोठेंच थांबत नाहीं हें काय ? दृष्टिपथ कुंठित झाल्यानें विशेष अडचण पडूं लागली. एकाएकीं सर्व मंडळी थांबली. हें स्थल फारच भयाण दिसत होतें. जागा फार विस्तीर्ण असल्यानें दीपतेज फारच मंद दिसूं लागलें. चरणपाताचा प्रतिध्वनि एकसारखा घुमत राहिल्यानें, हें स्थल चोहोंबाजूंनीं पाषाणमय असावें असा तर्क सहजीं होत असे.

या स्थलापासून निघून ती मंडळी पुढें चालूं लागली. सुमंतांनीं मागें वळून पाहिलें आणि खुणेनें द्युमत्सेन-बृहत्सेन यांचे नेत्र मोकळे करण्याविषयीं त्या काळपुरुषांस त्यांनीं आज्ञा केली. आमचें वीरद्वय तत्क्षणीं नेत्रबंधनमुक्त झालें. मंडळी पुढें चाललीच होती. हा भूतलपथप्रवास आरंभून सुमारें अर्ध घटका लोटली नसेल तोंच, ती सर्व मंडळी, ज्या ठिकाणीं तें भयंकर चक्रयंत्र होतें, तेथें आली. द्युमत्सेन-बृहत्सेन यांची दृष्टि त्या अनर्थोत्पादक चक्रयंत्राकडे जातांच ते भयभीत होत्साते निश्चल नेत्रांनीं त्याकडे अवलोकन करूं लागले. प्राणांतसमय खचित सान्निध आला असें वाटून हस्तपादादि अवयव चेतनाविरहित झाले, व ते तत्क्षणींच मटकन् खालीं बसले. मनांतील भीति व्यक्त करून दाखविण्यास जिव्हा जड झाली. सर्व शरीरास कांपरें सुटून नेत्रांवाटे अश्रुधारा वाहूं लागल्या. अंतीं ईशचरण ध्यानीं आणून मोक्षमार्ग सुगम करून घ्यावा ह्मणून मुखानें ईशस्तवन करूं लागले. स्वामींची मूर्ति नेत्रांपुढें आणून साष्टांग नमस्कार घालून अंतकाळीं मनास शांतता यावी ह्मणून नेत्र मिटून धरून स्तब्ध बसले. शिव ! शिव ! ! वाचकहो, द्युमत्सेन-बृहत्सेन यांची ही दीनावस्था पाहून तुमचें कोमल अंतःकरण खचित विदारण होऊन जात असेल. नयनींचा अश्रुजलौघ आंवरतां आंवरत नसेल! परंतु त्या काळपुरुषांचे हृत्पटांवर ही दीनावस्था पाहून अणुरेणु तरी अनुकूल ठसा उमटला काय ! वज्राहूनही ज्यांचें कठोर अंतःकरण, परपीडा हें ज्यांस जन्मतःच बाळकडू पाजलेलें, मानववध हा ज्यांचा उदरपोषणाचा नित्यक्रम, निरपराधी जनांस कंठस्नान घालण्यांत ज्यांची प्रौढि, अपरिमित छल करणें ही ज्यांची कर्तव्य-

जागृता, त्या इहलोकच्या यमकिंकरांच्या अंतःकरणांस द्रव येणें ह्मणजे त्यांची केवढी मानहानि, आणि त्यांचा केवढा अलौकिक! श्रीमहाकालीमाता तुष्ट होण्यापूर्वीच द्युमत्सेन-बृहत्सेन यांचे प्राणोत्क्रमण झालें तर स्वामी कोपायमान होऊन आपणांस महा शासन करितील असें मनांत आणून, त्या निर्दय क्रूर राक्षसांनीं या मृत्युमुखीं पडलेल्या उभय वीरांस ओढीत पुढें चालविलें. जिना उतरून ती मंडळी खालील दालनांत येऊं लागली. हें स्थल फारच विस्तीर्ण होतें. दीप-तेज या ठिकाणीं फारच मंद झालें. मार्ग स्पष्ट दिसेना ह्मणून सुमंतानीं दिवा अंमळ वर उचलून धरिला. अल्प काळांतच ती सर्व मंडळी श्रीअंबिकेच्या भव्य मूर्तिसन्निध येऊन पोंहोंचली. या स्थलीं येतांच श्रीअंबिकेच्या भक्तांनीं "श्रीमहाकालीमाता तुष्ट होवो" असा एक मोठा जयशब्द केला. द्युमत्सेन-बृहत्सेन तर जणूं काय गतप्राण होत्साते भूतलावर अंग टाकून देऊन निचेष्ट पडले. अंतकालच्या यमयातना दुःसह होऊन ग्लानि आली. त्या चांडाळांनीं त्यांचे नेत्रांस उदक लावून थोडें मुखांतही घातलें. अल्प काळांतच ते अंमळ शुद्धीवर आले. त्यांनीं एकवार त्या भव्य मूर्तीकडे अवलोकन केलें. मस्तकाचे ठायीं स्थित असलेला दिव्य मुकुट, कर्णप्रदेशीं शोभणारीं विचित्र कर्णभूषणें, सिंदूर-चर्चित भव्य भाल, ते विशाल आणि आरक्त नेत्र, वदनांतर्गत झालेली भयंकर जिव्हा, उग्र मुखश्री, वक्षःस्थलीं रुळत असलेली रक्तपुष्पमाला, परिधान केलेलें रक्तवस्त्र, अशी ती अंबिकेची अक्राळ-विक्राळ मूर्ति पाहून मनांत एकदम पूज्यभाव उत्पन्न होऊन भीतीचें निरसन जाहलें. त्यांनीं श्रीअंबिकेस साष्टांग प्रणिपात केला. सुमंत दिवाण गंभीर स्वरानें ह्मणाले,

" तुमची इहलोक सोडून जाण्याची वेळा भरत आली, करितां श्रीचे चरण ध्यानीं आणून अंतकालीं पुण्याची जोड पदरीं बांधून मग स्वर्गस्थ व्हा. " हर! हर!! द्युमत्सेन-बृहत्सेन अल्प काळांतच हरिचरणींच्या अविनाशी सुखांत मग्न होणारना!! सुमंताची आज्ञा होतांच द्युमत्सेन-बृहत्सेन सुगति मिळावी ह्मणून श्रीअंबिकेची करुणा भाकूं लागले; परंतु उभयतांचीं मुखें भीतीनें शुष्क पडून जिव्हा जड झाली, कंठ दाटून आला, आणि नेत्र मिटून किंचित्काल ते स्वस्थ बसले. एकाएकीं खोल घंटानाद कर्णीं पडला. कर्णप्रदेशावर तो गंभीररव आदळतांच द्युमत्सेन-बृहत्सेन दचकल्यासारखें करून चोहोंकडे अवलोकन करूं लागले, तों, एक द्वार उघडून तीन पुरुष आपणाकडे येत आहेत असें त्यांस दिसलें. या लोकांनीं कृष्णवस्त्रें धारण केलीं होतीं. हस्तांत तीव्र खड्गें चमकत होतीं. सन्निध येतांच सुमंतांकडे अवलोकन करून ते खोल स्वरानें ह्मणाले, " महाराजांची काय आज्ञा आहे ? " सुमंतांनीं गंभीर स्वरानें प्रत्युत्तर दिलें, " श्रीमहाकालीचा ग्रास श्रीस देणें आहे. " द्युमत्सेन-बृहत्सेन यांनीं या त्रिमूर्तींकडे नीट निरखून पाहिलें. मनांत नाना तरंग उद्भवूं लागले. हे कोणी अंतरिक्षांत वास करणारे यक्षकिन्नर असावेत, किंवा पिशाचस्वामी वेताळ यांचे परिजनांपैकीं कोणी असावेत, किंवा श्री महाकालीचे भक्त जे राक्षस, त्यांचे अग्रगणी असावेत, किंवा प्रत्यक्ष यमकिंकर असावेत, याचा त्यांस यत्किंचित्‌ही तर्क करतां येईना. सुमंत दिवाणास त्यांनीं महाराजांची काय आज्ञा आहे असें जें विचारलें त्यावरून ते मानवयोनींतील नसावेत इतकी मात्र त्यांची पक्की खातरी झाली; कारण त्यांचा स्वर फारच खोल निघाला. सुमंतांनीं

त्या पुरुषत्रयास दिलेलें प्रत्युत्तर श्रवण करून द्युमत्सेन-बृहत्सेन यांस मूर्च्छा येऊन, प्रचंडवातें उच्चवृक्ष जसे उमळून पडावे, त्याप्रमाणें त्यांनीं धाडकन् भूमीवर अंग टाकून दिलें.

## सुमंत आणि वेषधारी पुरुष.

शिव ! शिव ! ! दीर्घ काल लोटला तरी द्युमत्सेन-बृहत्सेन त्या भयंकर मूर्च्छेपासून शुद्धीवर येईनात. बराच काळ लोटल्यावर एकाएकीं त्यांनीं अर्धनेत्र उघडून सभोंवार अवलोकन केलें तों, आपणांस त्या काळपुरुषांनीं सांवरून धरिलें आहे असें त्यांस दिसलें. पूर्वभागीं सुमंत दिवाण वामहस्तांत दिवा धरून खिन्नवदन होत्साते आपणाकडे अवलोकन करीत आहेत असें दृष्टीस पडलें. मग कां द्युमत्सेन-बृहत्सेन यांची त्यास त्यावेळीं करुणा आली, किंवा श्रीस तुष्ट करण्यापूर्वींच त्या उभयतांचा मोक्ष होतो या भीतीनें त्याचें वदन म्लान झालें, काय असेल तें असो ! दक्षिणभागीं या उभयतांस ज्यांनीं या मृत्युद्वारीं आणून सोडिलें ते प्रतिराक्षस यांचेकडे पहात तटस्थ उभे होते. उत्तरभागीं श्रीची भव्यमूर्ति स्वभक्तांचें कौतुक अवलोकन करीत निश्चल उभी होती.! " हे दीनवत्सले जगन्माते अंबिके हेंच का तुझें ब्रीद ! हे जगदोद्धारणी हीच का तुझी दीनवत्सलता ! निरपराधी अनाथ लेकरांचा छल करणें हीच का सकरुणता! हाय! हाय! ! " इतके शेवटचे शब्द मुखावाटे निघत आहेत नाहींत तोंच उभयतांच्या जिव्हा वांकड्या पडल्या. वाचकहो द्युमत्सेन-बृहत्सेन यांच्या या वेळच्या दुःखस्थितीचें यथार्थ चित्र आपल्यापुढें उभें करण्याचा प्रयत्न कितीही केला तरी तो व्यर्थ होय. भाषेचे कोशाचे कोश जरी

पालथे केले तरी यथार्थ वर्णन होणें अवघड! ज्यास सरस्वती देवी प्रसन्न झाली आहे असा एखादा कविमुकुटही गर्व सांडून हात टेंकील, तेथें चित्रकाराच्या कुशलतेचा तरी काय उपयोग!!! निजधामास जाणारी दीपकज्योति मधून मधून ज्याप्रमाणें आपलें उग्रतेज प्रकाशित करिते, त्याप्रमाणें द्युमत्सेन-बृहत्सेन यांचा प्रतापरूपी दीप क्षणोक्षणीं आपलें भयंकर स्वरूप दृग्गोचर करूं लागला. एकाएकीं उभयतां उठून उभे राहिले, आणि एकमेकांस दृढालिंगन देऊन आक्रोश करूं लागले. नयनींचा बाष्पपूर अनावर होऊन पदतलींची भूमि चिंब भिजून गेली. अंतःकरणांतील दुःखाचा भडका वृद्धिंगत होऊं लागून, उष्ण दीर्घ श्वासोश्वास सुरू झाला. प्राणतंतु किंचित् अवशिष्ट राहिला आहे असें दर्शविणारी शरीराची हालचाल हळू हळू बंद होत चालली, व वदनकांति पाषाणवर्ण झाली. नेत्रांचीं बुबुळें खोल गेलीं, व त्यांनीं एकदम "देवा!" अशी मोठ्यानें आरोळी मारिली. शिव! शिव!! यांच्या या वनरुदनाला कोण विचारणार! यांची करुणा कोणास येणार! ही स्थिति पाहून कोणाचें हृदय विदारण होणार! वज्राहूनही ज्याचें कठोर अंतःकरण अशा त्या अंबिकादासांस द्रव येणें ह्मणजे केवढें आश्चर्य!

**द्युम०**—(क्षणेक मनास धीर देऊन) मित्रा, वीरपिंडास अयोग्य असें वर्तन आपले हातून घडत आहे, तर यत्किंचित्‌ही न डगमगतां मोठ्या धारिष्टानें मृत्यूस तोंड देऊन स्वकुल भूषित करणें हेंच आपणास उचित होय.

**बृह०**—मित्रा, समरांगणीं ज्यांस सदैव विजयश्रीनें माळ घातली, यावज्जन्म ज्यांनीं स्वदेशसेवेसाठीं शिरकमलें हातावर घेऊन युद्धसमयीं शत्रूंस पाठ दाखविली नाहीं, वीरमातेच्या

उदरीं जन्म घेऊन स्वकर्तव्यतेस जे कधींही पराङ्मुख झाले नाहींत, एकनिष्ट स्वामीसेवा हें ज्यांनीं हा काल व्रत पाळिलें, आणि धारातीर्थी गमन करणें हाच ज्यांनीं पुरुषार्थ मानिला, त्या आपणांस अशा नीच लोकांनीं बद्ध करून देहांत दंड करावा, याहून हृदय विदीर्ण करणारी अन्य अपकीर्ति कोणती ! ! मित्रा ह्या दीनास्थितींतच आपला मोक्ष होणार ह्मणूनच अत्यंत क्लेश होतात ! ! !

द्युमत्सेनानें सभोंवार अवलोकन केलें. श्रीमहाकालीस बली अर्पण करण्याकरितां जणूंकाय वसुंधरेच्या उदरांतून उत्पन्न झालेले ते तीन राक्षस अवलोकन करितांच, त्यानें आपलें मुख फिरविलें. सर्वांगास पुनरपि घर्म सुटला. हस्तपादादि अवयव लटलट कांपूं लागले. “ मित्रा ” असें म्हणून बृहत्सेनास त्यानें गच्च मिठी मारिली. किंचित्काल शांततेनें राज्य चालविलें. उभयतांचे रडण्याचे हुंदके मोठमोठ्यानें ऐकूं येऊं लागले. त्यांचे सर्वांगास कालकूट सर्पानें वेष्टन केलें आहे कीं काय, असा भास होऊन रक्तवाहिन्या बंद झाल्या. एकाएकीं द्युमत्सेनानें आपली दृष्टि सुमंतांकडे फिरवून दीनवदन होऊन म्हटलें “ महाराजांस दयार्द्र करण्यास कांहीं मार्ग उरला आहे काय ? ” त्या राक्षसत्रयापैकीं एकानें उत्तर केलें, “ दया हा शब्द या ठिकाणीं मुळींच वास करीत नाहीं! ” हे शब्द ऐकून द्युमत्सेन-बृहत्सेन यांचे हृदयांत अवशिष्ट राहिलेला आशातंतु नष्ट झाला. द्युमत्सेनानें बृहत्सेनास पुनरपि गच्च मिठी मारिली आणि ह्मणाला, “ मित्रा येतों बरें आतां ! ” उभयतांचा कंठ दाटून आला. अश्रुपुरास भरतें आलें. बृहत्सेनानें “ मित्रा येतों आतां ” असें ह्मटलें मात्र तों, अंतकाळच्या यातनांच्या प्रखर वन्हिज्वालेनें उभयतांचीं वदनें निस्तेज व भेसूर

दिसूं लागलीं. क्षणेक देहभान नाहींसें झालें. द्युमत्सेनानें अ-स्पष्टवाणीनें ह्मटलें, "मित्रा बृहत्सेना, शांत हो, धीर धर; अनंत-कोटि ब्रह्मांडनायक सर्व अवलोकन करीतच आहे. आपला उभयतांचा निरर्थक छल पाहून तो या दुष्ट लोकांस योग्य शासन केल्याविना कधींही स्वस्थ बसणार नाहीं. बृहत्सेनानें दुःखि-तांतःकरणानें ह्मटलें, " मित्रा द्युमत्सेना, स्वर्गसुखानुभव घेण्या-पूर्वी आपणांस आपल्या महाराजांस शेवटचा निरोप पाठवि-तां येईल काय ? तसेंच आपल्या हृदयमंदिरांत सदैव वा-त्सल्य करणाऱ्या ज्या वसुमति-सुमति, त्यांचेकडे कोणी नि-रोप घेऊन जाईल काय ? द्युमत्सेन मध्येंच ह्मणाला, " मित्रा वसुमति-सुमति यांस आपण इहलोक सोडिला ही वार्ता क-धींही समजणार नाहीं, आणि खरोखरच त्यांस ही गोष्ट न कळली तरच बरें ! ! "

सुमंतांनीं मध्येंच मोठ्या गंभीर स्वरानें ह्मटलें, " निरर्थक वेळ घालविणें इष्ट नव्हे; अंतकाळीं ईशचरण स्मरून या जन्माचें सार्थक करून घ्या. अल्प काळांतच तुह्मी अवि-नाशी सुखांत मग्न व्हाल." द्युमत्सेन-बृहत्सेन यांनीं पुनः एकमेकांस दृढालिंगन दिलें. एकमेकांकडे डोळे भरून पाहि-लें, आणि श्रीअंबिकेस साष्टांग प्रणिपात करून ते श्रीचें ध्यान करूं लागले. द्युमत्सेन-बृहत्सेन यांस यमसदनीं आणून पोहोंचविणाऱ्या त्या नराधमांकडे वळून सुमंत म्हणाले. " मि-त्रांनो, आपण आतां परत जावें. आपण आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजाविलें. ( द्युमत्सेन-बृहत्सेनाकडे दृष्टि फिरवून ) हे उभयतां आह्मा सर्वांच्या स्वाधीन आहेतच. शिवाय श्रीकालीस बली अर्पण करण्याचा तो विधि आप-णासारख्या वीर पुरुषांनीं अवलोकन करणें उक्त नव्हे." सुमं-

त्यांची आज्ञा होतांच ते काळपुरुष ह्मणूं लागले, "महाराजांची आज्ञा शिरसावंद्य आहे. आह्मांस आमचें कर्तव्य अवगत आहे, व आह्मी यापूर्वींच हें स्थल सोडिलें असतें, परंतु या उभयतांच्या (त्या हतभागी वीरद्वयाकडे वळून) प्राणोत्क्रमणाच्या भीतीनें आह्मांस तसें करतां येईना. आतां हे चांगले शुद्धीवर आले आहेत, तेव्हां आज्ञेप्रमाणें आह्मीं गुरुमहाराजांकडे परत जातों." सुमंत दिवाण मध्येंच ह्मणाले "आणि गुरुमहाराजांस नित्याप्रमाणें सर्व वृत्तकथन करा." त्यापैकीं एकानें प्रत्युत्तर केलें, "या उभयतांस महाराजांचे व या चांडाळांचे स्वाधीन करून आह्मीं परत आलों, असें आह्मीं गुरुमहाराजांस निवेदन करूं." हे यमदूत या स्थलीं अनेक वेळां आले असतांही निबिड अंधःकारांतून त्यांस जातां येईना. सुमंतांनीं "चला मजबरोबर" असें म्हणून वामहस्तांत दिवा घेतला आणि त्या स्थलापासून त्या उभयतांसह निघाले.

ते अंमळ पुढें गेलें नाहींत तोंच, चोहोंकडे अंधःकार दिसूं लागला. शांततेनें पुनरपि आपलें राज्य सुरू केलें. द्युमत्सेन-बृहत्सेन यांचे मनांत पुनः विचित्र कल्पना येऊं लागल्या. ते उठून बसले आणि ज्या दिशेकडे सुमंत त्या राक्षसांसह निघून गेले होते त्या दिशेकडे ते अवलोकन करूं लागले. "याहूनही भयंकर प्रसंग आपणांवर कोणता बरें ओढवणार?" असा त्यांनीं स्वतःलाच प्रश्न केला; परंतु उत्तर ह्मणून कांहीं मिळेना. चोहोंकडे निबिड अंधःकार! नेत्र असतांही अंधदशा प्राप्त झालेली! श्वासोश्वासाशिवाय सर्व शांतता! या सर्व गोष्टी अनुकूल असल्यावर मनःकल्पित भीतीचें राज्य फारच क्लेशदायक झालें असें ह्मटल्यास काय हरकत! किंचित् काल ईशस्तुतीनें मनास बसलेलें आकलन सुटून, मन चोहोंकडे भ्र-

मण करूं लागलें. सुमंत व ते काळपुरुष यांचेमधील शेवटचें संभाषण यांस सर्व ऐकूं आल्यानें आपण या समयीं चांडाळां-च्यापुढें मान करून उभे आहोंत, असें त्यांस भासलें. हा वि-चार मनांत येतांच सर्वांगांतलें रक्त जेथल्या तेथें गोठून गेल्या-सारखें झालें. दीर्घ उष्ण श्वास त्यांनीं सोडला आणि शोकविव्हल होत्साते उरःप्रदेशीं नेत्रोदकाचें सिंचन करूं लागले. अंतीं चांडालहस्तें मोक्ष मिळणार याहून नीचतम मरण तें कोणतें !! त्या चांडालत्रयास ज्या वेळीं सुमंत दि-वाणांनीं " तुह्मांस श्रीमहाकालीस बली अर्पण करण्याकरि-तां बोलाविलें, " असें सांगितलें त्या वेळेसच हे चांडाळ आहेत असें द्युमत्सेन-बृहत्सेन यांस नव्हतें का ओळखतां आलें ? होय, ही गोष्ट त्यांचे मनांत आली नाहीं असें नाहीं. मग याच प्रसंगीं त्यांस त्यांची इतकी भीति कां बरें वाटली ? याचें कारण इतकेंच कीं, त्यांचे मनांत प्रथम आलेली कल्पना या वेळीं दृढ झाली. संशयनिवृत्ति होऊन सर्व प्रकार सत्य भासूं लागला. या समयीं अंगावरील वस्त्रें घर्मानें चिंब झालीं. ने-त्रोदकानें सिंचन झालेलें हृदय धडधड उडूं लागलें. सर्वांगावर रोमांच उभे राहिले. नेत्र ताठून जाऊन दृष्टि निश्चल झाली, आणि इहलोकावरून आपणास कोणी उचलून नेत आहे, असा भास झाला.

वाचकहो, मन इतस्ततः भ्रमण करूं लागल्यानें कल्पित भी-तीनें त्यांस अगदीं भ्रमिष्ट करून सोडिलें. क्षणेक असा भास व्हावा कीं, आपणासन्निध उभे असलेले चांडाळ आपल्या जातिबांधवांस बोलावून एकच गर्दी करून सोडीत आहेत, क्षणेक त्या सर्वांनीं आपणास धरण्याकरितां आपले हस्त पुढें केले आहेत, व भूमातेनें अस्पर्श जनांचा स्पर्श न व्हावा ह्मणून

दुभंग होऊन आपल्या लेंकरांस पोटांत घेत आहे, असा भ्रम व्हावा. आपणासभोंवतीं सर्व चांडाळांनीं मोठा घेरा दिला आहे असें वाटून त्यांनीं एकमेकांस घट्ट पोटाशीं आंवळून धरिलें व मोठ्यानें दीर्घालाप करूं लागले. या वेळीं त्यांचे मुखांतून काय शब्द निघत होते हें मुळींच समजेना; कारण भीतीनें जिव्हा कोरडी पडल्यानें अस्पष्ट शब्दोच्चार मात्र कर्णीं पडला. प्राणवायु निघून जाण्यापूर्वी किंचित् कालपावेतों मनुष्य शुद्धीवर येऊन इहलोकच्या अवताराचें स्मरण करतें. नेत्रांपुढें आप्त-इष्ट-जन एकसारखे उभे रहातात, व शरीरांतील अवशिष्ट रक्त नेत्रोदकानें बाहेर पडतें. त्याचप्रमाणें या वेळीं द्युमत्सेन बृहत्सेन यांस झालें. मृत्युवेळा अगदीं भरलीच असें वाटून स्वामिचरण ध्यानीं आणून ते अंतीं आपल्या उष्णनेत्रोदकानें प्रक्षालन केले. "हे स्वामिन्, दीनदासांकडून आपली योग्य सेवा झाली नाहीं. अपरिचित स्थलीं आपणास एकाकीं सोडून निष्ठुर होत्साते आह्मी हरिचरणांची संगत जोडली. इष्ट हेतु सफल होण्यापूर्वीच आह्मीं परलोकचा मार्ग धरिला. आपला शेवटचा निरोपही आह्मांस घेतां आला नाहीं. तें सुप्रसन्नवदन आमच्या दृष्टीस पुनः पडलें नाहीं. धिक्--धिक्! आमचें जिणें!! दैवगतीचा काय विचित्रपणा हा! मातापिता यांचें दर्शन आमचे प्रारब्धीं नाहीं! हे माते, हीं कृतघ्न बालकें वृद्धपणीं आपणास दुःखोदधींत लोटून देण्यास जन्मास आलीं! हरहर! बाल्यावस्थेंतील अलौकिक क्रीडा पाहून, ममतारूप उदकानें पोषित केलेले हे वृक्ष, स्वपराक्रमरूपगंधानें दशदिशा व्याप्त करून, सुरलोकीं वास करणारे पूर्वज यांस संतुष्ट करतील, अशी जी हृदयमंदिरांत सांठवून ठेविलेली दृढ आशा ती निष्फल झालीना! तुमची वृद्धावस्थे-

तील हातची काठी आज मृत्यु बलात्कारें ओढून नेत आहेना! धिःकार असो या मृत्यूला!! बा मृत्यो, यांत तुजला कोणती धन्यता वाटली!!! आमचा वंशवृक्ष आज निजधामास गेलाना! हरहर! काय हा दुःसह प्रसंग! परमेश्वरा, आह्मीं कोणाची करुणा भाकावी! ही अंतःकरण दग्ध करणारी वार्ता श्रवण करून वृद्ध मातापिता खचित प्राणत्याग करतील. केवढा हा दुर्धर प्रसंग!" असे मनांत नानाप्रकारचे विचार चालले आहेत तोंच पाय मोडून गेल्यासारखे होऊन त्यांनीं पुनः एकदां कर्कश व हृदय विदारण करणारी भयंकर किंकाळी फोडली, व भूमीवर देह टाकून दिले.

इतक्यांत त्या निबिड अंधःकारांत अंधुक दीपककिरण दृग्गोचर होऊं लागले. सुमंत त्या काळपुरुषांस पोहोंचवून या वेळीं परत येत होते. द्युमत्सेन-बृहत्सेन यांचा दीर्घालाप श्रवण करून त्यांचे अंगावर रोमांच उभे राहिले. एक क्षणही न घालवितां ते तातडीनें ज्या स्थलीं आमचें दुर्दैवी वीरद्वय बेशुद्ध पडलें होतें, तेथें आले. सन्निध येतांच त्यांनीं "काय? झालें काय?" म्हणून सकंप वाणीनें विचारिलें. अल्प काळांतच द्युमत्सेन-बृहत्सेन पुनः शुद्धीवर आले. त्यांनीं अर्ध नेत्र उघडून चोहोंकडे अवलोकन केलें तों, त्यांचे सन्मुख सुमंत म्लान वदन करून उभे आहेत असें त्यांस दिसलें. दक्षिणभागीं तें चांडालत्रय चेतनाविरहित पाषाणमूर्तीप्रमाणें तटस्थ उभें आहे असें दृष्टीस पडलें. हा कालपावेतों मनांत ज्या नानाविध कल्पना आल्या त्या स्वप्नवत् भासून त्यांस किंचित् हुशारी आली. त्यांनीं उठून बसण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यांच्यानें उठवेना. एकाएकीं अंगांत संचार भरल्यासारखें करून उठून

उभे राहिले, आणि एकमेकांस दृढालिंगन देऊन ते स्फुं-दस्फुंदून रडूं लागले. या समयीं असें भासलें कीं, नेत्रो-दधीस जणूं काय एकदम भरतेंच आलें आहे. द्युमत्सेन ह्म-णाला, " मित्रा खरोखरच प्राणांतसमयींच्या दुःसह यातनांचें प्रखर स्वरूप आतां निस्तेज झालें. " बृहत्सेनानें मोठ्या धा-रिष्टानें प्रत्युत्तर केलें " ईश्वर करो, आणि अंतीं मन असेंच सुप्रसन्न होवो. इहलोकचा सर्व मायामय पसारा असाच मागें सोडून, मग स्वर्गयात्रेस निरिच्छ अंतःकरणानें प्रारंभ करणें हें बरें. "

अरे, पण हें केवढें आश्चर्य ! सुमंत, आंगावर धारण केलेल्या शुभ्रवस्त्रानें आपले नेत्र कां बरें पुशीत आहेत ? त्यांचें हृदय कां बरें धडधड उडत आहे ! कंठ दाटून येऊन त्यांनीं दीर्घश्वास कां बरें सोडिला ! त्यांस असें कां बरें झालें असावें ! त्यांचे ओष्ट कां बरें स्फुरण पावतात ? त्यांचे मनांतून कांहीं बोलावयाचें आहे, पण मुखाबाहेर शब्द निघत नाहीं हें काय ! !

**सुमंत**०—( किंचित् काल मनास विवेकानें आंवरून ध-रून गहिंवर आटोपून आमच्या वीरद्वयाकडे वळून ) बाळानों, नका नका, मृत्यूचें नांव सुद्धां घेऊं नका. ह्या कालपर्यंत तु-ह्मांस परम दुःसह यातना होऊन क्रूरपणानें छल झाला, त्या-बद्दल तो दीन दयालप्रभू मजला क्षमा करो.

इतके शब्द मुखांतून निघत आहेत नाहींत तोंच, पुनः कंठ स-द्गदित होऊन अश्रुजलास भरतें आलें. काय, सुमंत खरोखरच असें ह्मणाले काय ? हे शब्द श्रवणकरून द्युमत्सेन-बृहत्सेन यांस काय बरें वाटलें असेल ? त्यांची काय बरें स्थिति झाली असेल ! या शब्दांवर त्यांनीं भरंवसा टेविला असेल काय ? कीं याहूनही कांहीं अमानुष निर्दयतेनें आप-

ला वध होणें असेल, असें त्यास वाटलें असेल ? प्रखर वन्हीनें जलवृष्टि करावी, किंवा यमराजानें सकरुण होऊन ब्रह्माज्ञा उल्लंघन करून, मृत्युमुखीं पडलेल्यास मुक्त करावें, याप्रमाणेंच हें नव्हे काय ! ! द्युमत्सेन-बृहत्सेन तर आश्चर्यथक्क झाले, व सुमंताकडे कौतुकानें अवलोकन करूं लागले.

हा वेळपावेतों ज्या नेत्रांतून दुःखाश्रु बाहेर येत होते, त्याच नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले ! भीतीनें अंगावर उठलेले रोमांच नष्ट होऊन, आनंदलहरीनें सर्व शरीर रोमांचित झालें ! अंतःकरणावर निराशेनें उभारलेला ध्वज झुगारून देऊन त्या ठिकाणीं आशेनें आपला झेंडा फडकत ठेविला ! अंतःकरणांत प्रज्वलित झालेला दुःखाग्नि सुवार्तारूप जलानें शांत झाला ! चिंतानलानें दग्ध केल्यानें कृश व निस्तेज झालेलें वदन प्रफुल्लित व सतेज दिसूं लागलें. या वेळचा त्यांचा आनंद किती वर्णावा ! ! सुमंत दिवाणांच्या मुखाकडे अवलोकन करावें तर तें यावेळीं म्लान दिसूं लागलें. हा कालपर्यंत मुखावर असलेली उग्रता अदृश्य झाली. आरक्त दिसणारे नेत्र सजल झाले, क्रोधानें वर चढविलेली भ्रुकुटी अभयसूचक होऊन वदनकांति पालटून गेली, व नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

केवढें महदाश्चर्य ! तीं पहा त्या चांडालांनीं आपल्या मुखावरील कृष्णवस्त्रें झुगारून दिलीं. यावेळीं द्युमत्सेन-बृहत्सेन यांस काय बरें दिसलें ? वेषांतर होण्यापूर्वी यांच्या संबंधानें अंतःकरणांत उत्पन्न झालेली भीति वृद्धिंगत झाली कीं, समूळ नष्ट झाली ? आमच्या उभयवीरांनीं त्यांचेकडे दृष्टि फिरविली मात्र तों त्यांची मुखश्री निस्तेज दिसूं लागली, नेत्रांचे ठायीं स्थित झालेले अश्रुबिंदु दीपकप्रकाशानें मौक्तिकां-

प्रमाणें चमकूं लागले. त्यांचे रूपांत इतकें साम्य होतें कीं, त्यांनीं एकाच मातेच्या उदरीं जन्म घेतले असावेत असें वाटे. त्यांनीं द्युमत्सेन–बृहत्सेन यांच्याकडे मोठ्या ममतेनें डोळे भरून पाहिलें.

हा सर्व अघटित प्रकार जादूचा खेळ तर नसेलना ? सुमंत दिवाणांनीं द्युमत्सेन–बृहत्सेन यांस खरोखरच प्राणदान दिलें काय ? व त्यांस मृत्युमुखांतून बाहेर ओढलें काय ? त्या चांडालत्रयानें उग्रवेषविसर्जन करतांच त्यांची मुखश्री खरोखरच म्लान व निस्तेज दिसत होती काय ? त्यांचे नेत्रांतून अश्रु वाहूं लागले यावरून त्यांचें अंतःकरण दयार्द्र होऊन त्यांस द्युमत्सेन–बृहत्सेन यांची करुणा आली काय ? एका क्षणापूर्वीं ज्या हस्तांनीं द्युमत्सेन–बृहत्सेन यांचीं शिरकमलें धडांपासून वेगळीं होणार होतीं तेच हस्त " धीर धरा, भय सांडा " असें सूचित करूं लागले काय ?

होय हें खरें. यांत कापट्याचा लवलेश नाहीं. आमच्या उभयवीरांची एकनिष्ट स्वामिसेवा आज फळास आली. श्रीअंबेची कृपादृष्टि होऊन तिच्या प्रसादें त्यांचें प्राणरक्षण करण्याची प्रेरणा सुमंत व तें चांडालत्रय याचे अंतःकरणांत झाली. सुमतांचा तर अश्रुजलौघ आवरतां आवरेनासा झाला.

**सुमंत**०—( बृहत्सेन–द्युमत्सेनांकडे वळून सजलनेत्रांनीं ) बाळानों, या आह्मी हतभाग्यांनीं तुह्मांस अत्यंत क्लेश दिले. तुमचा परम छल केला. याबद्दल क्षमा करा. ज्यानीं तुह्मां उभयतांस येथें आणून सोडिलें ते राक्षस हा कालपर्यंत येथें उभे असल्यानें त्यांचे समक्ष अशा प्रकारचें कठोर अंतःकरण आह्मास करावें लागलें. हें अघोर कृत्य करण्यास आह्मीं

अत्यंत तत्पर आहोंत असें दर्शविण्यासाठीं असें कृतांतस्व-रूप आह्मांस धरावें लागलें. नको–नको–तें भयंकर कृत्य– अंगावर शहारे येतात. ( एकाएकीं कंठ सद्गदित होऊन त्याच्यानें पुढें बोलवेना )

**द्युमत्सेन**०—( आपण ऐकतों आहों व पाहतों आहों यावर न विश्वसून ) परंतु श्रीमहाकाली–तर मग त्यांत कांहींच सत्यता नाहीं.—ते शब्द उच्चारून दीन जनांस भीतित्रस्त करणें हाच कायतो हेतु ! तसें क्रूर वर्तन हातून मात्र व्हावयाचें नाहीं !—

**सुमंत**०—( मनास आवरून ) हाय ! हाय ! ! बाळानों, तुह्मीं समजतां असाच जर खरा प्रकार असता–या शब्दाचा अर्थ जर खचित इतकाच असता तर आजपर्यंत अनंत हत्या घडल्या नसत्या.–शिव ! शिव ! ! ( एकाएकीं नेत्र मिटून धरिले व ललाटावर घर्मबिंदु उठले. )

**द्युमत्सेन**०—( सुमंतास विशेष दुःख झालें असें वाटून त्यांचे सन्निध जाऊन दीनवदनानें ) महाराजांस या दीन जनाकडून दुःख प्राप्त झालें काय ? आह्मां उभयतांस प्राण दान देऊन महाराजांनीं आह्मावर अगणित उपकार केले आहेत—परंतु आमची आयुर्मर्यादा संपली नाहीं हें सत्य ना ?

**सुमंत**०—( गहिंवरून ) मजकडून तुह्मां उभयतांचे एका केंसासही ढका लागणार नाहीं.

**एक चांडाळ**–( मध्येंच ) सर्व जगाचें मोल जरी आमचे पदरांत घातलें तरी आमच्या हातून आपणास यत्किंचितूही इजा होणार नाहीं हें पक्कें समजा.

प्राणघाताची भीति नाहींशी होतांच द्युमत्सेन-बृहत्सेन गहिं-

वरून एकमेकांस दृढालिंगन देऊन आनंदाश्रु ढाळूं लागले. या वेळचा त्यांचा आनंद गगनीं मावेनासा झाला. त्यांनीं मोठ्या कृतज्ञतेनें सुमंतांस प्रेमालिंगन दिलें व त्यांस आपल्या आनंदाश्रूनें स्नान घातलें. मुखावाटे " आपण कृपाळू होऊन अनाथ लेंकरांचें रक्षण केलें याबद्दल ईश्वर आपणास सुगति देवो " असें ते ह्मणूं लागले. त्या चांडालत्रयासही त्यांनीं घट्ट पोटाशीं धरिलें आणि त्याचे अत्यंत आभार मानूं लागले.

या परमानंदाचा उमाळा निघून गेल्यावर सुमंतांनीं द्युमत्सेन-बृहत्सेनांकडे वळून ह्मटलें, " बाळांनो, चला तर, चला माझ्यामागें. या उदास स्थलीं क्षणभर उभें रहाणें नको. " श्रीअंबिकेच्या मूर्तीपासून ते अंमळ दूर जाऊन उजव्या हातानें थोडें वांकडें वळण घेऊन एका प्रचंड शिलेसन्निध येऊन पोहोंचले. या स्थलीं येतांच सुमंत पुनः उजवीकडे वळले. अंमळ पुढें गेले नाहींत तोंच एक भित लागली व पुढील मार्ग येथें संपला असा भास झाला. एकाएकीं सुमंतानें एक द्वार उघडलें. हें द्वार त्या भितींत इतक्या कुशलतेनें बसविलें होतें कीं, कसाही चतुर पुरुष या स्थलीं आला तरी त्यास तें ओळखतां येऊं नये. येथें द्वार आहे असें माहीत असतांही तें अमुक ठिकाणींच असेल असें एकदम ओळखतां येऊं नये इतकें कौशल्य तेथें खर्च केलें होतें.

## बांधवगण.

द्वार उघडतांच एक मोठें थोरलें दालन लागलें. हें विस्तीर्ण व उंच होतें. या भव्य स्थलीं चोहों बाजूंनीं किल्ल्याचे खंदकाचे बाजूस चतुष्कोणाकृति छिद्रें ठेविलीं होतीं. आंतून या छिद्रांस लांकडाचीं उतरतीं दारें करविलीं होतीं. तीं अशाकरि-

तां कीं, बाहेरचे बाजूनें आंत मोकळी स्वच्छ हवा येत असतां तिच्याबरोबर इतर घाण आंत येऊं नये. अशी व्यवस्था करण्यांत दुसरा असा उद्देश होता कीं, किल्ल्याचे पश्चिम बाजूकडील खंदक या छिद्रांवाटे जरी दिसत असे तरी त्याच खंदकाचे पलीकडचे बाजूनें जाणाऱ्या मनुष्यास हें आंतील स्थळ मुळींच दृष्टीस पडत नसे. स्वच्छ व मोकळी हवा या स्थळीं यावी येवढ्याकरितांच हीं गवाक्षें ठेविलीं असल्यानें या भव्य स्थलीं चोहोंकडे सारखा प्रकाश पडावा ह्मणून तीन झुंबरें लावून ठेविलीं होतीं.

भूमीवर मौल्यवान् गालीचे पसरले होते. ठिकठिकाणीं टेंकण्याला मोठमोठीं लोडें ठेविलीं होतीं. एके बाजूस शेंपन्नास भाले एके ठिकाणीं उभे करून ठेविले होते. दुसरे बाजूस युद्धसमयीं अंगावर धारण करण्याचीं कवचें एके हारीनें लोंबत ठेविलीं होतीं, त्याचेच सन्निध एक एक ढाल व तलवार अडकवून ठेविली होती. ठिकठिकाणीं नानाविध रौप्यपात्रें तांबूलसाहित्यानें भरून ठेविलीं होतीं.

ज्या द्वारानें हे आंत शिरले त्याशिवाय येथें आणखीं आठ द्वारें होतीं. एके बाजूस चार व दुसरे बाजूस चार. द्युमत्सेन-बृहत्सेन या स्थलीं आले त्या वेळीं हीं सर्व द्वारें बंद असल्यानें पलीकडे काय आहे हें त्यांस मुळींच ओळखतां आलें नाहीं. या प्रसंगीं या विस्तीर्ण स्थलीं जरी कोणीही नव्हतें तरी येथें पुष्कळ लोक रहात असावे असा सहजीं तर्क द्युमत्सेन-बृहत्सेन यांनीं केला.

सुमंतांनीं द्युमत्सेन-बृहत्सेन यांस "आपण स्वस्थांतःकरणानें बसा" ह्मणून सांगितलें. तें बंधुत्रय वर जीं आठ दारें सांगितलीं त्यांपैकीं एक दार उघडून आंत गेलें व फलाहा-

राचे पदार्थ घेऊन त्वरित परत आलें. सुमंतास " सर्व सिद्धता आहे " असें खुणेनें सुचवून ते पुनः त्याच द्वारानें परत गेले.

**समंत**—बाळांनों, अल्प तरी फलाहार करा, पाणी प्या व मनास हुषारी आणा, आणि मग तुम्ही आपलें शेषजीवित कोणत्या रीतीनें कंठिलें पाहिजे हें मी तुह्मांस सांगतों.

सुमंताचें हें भाषण ऐकून द्युमत्सेन-बृहत्सेन दचकल्यासारखे झाले. सुमंताचे मनांत काय बरें आहे असा क्षणभर विचार करूं लागले, तोंच कुत्सित तरंगांनीं त्यांस पुनरपि भीतिग्रस्त केलें. आपले प्राण वांचले तरी आपली मुक्तता होत नाहीं अशी त्यांची आतां पक्की खातरी झाली. त्यांनीं अल्पाहार करून उदकप्राशन केलें व पुनः कल्पनातरंगडोहांत यथेच्छ विहार करूं लागले.

**सुमंत**—बाळांनों, दुर्दैवानें जी नीच स्थिति तुह्मांस प्राप्त होणार, तिची कल्पना तुमचे मनांत आली असावी असें मला तुमच्या मुखावरील निराशेच्या चिन्हांवरून दिसत आहे. खरोखरच तुमचे प्राण वांचून तुह्मांस पराधीनता प्राप्त झाली, तुम्ही या ऐहिक सुखास आंचवलां—तो सुदिन येईपर्यंत—तुम्ही या ठिकाणीं वसुंधरेच्या उदरांत शेष जीवित आनंदानें घालविलें पाहिजे.

**द्युमत्सेन.**— ( निराश होऊन ) हर! हर!! ( एकाएकीं आशा उत्पन्न होऊन ) काय तो सुदिन येईपर्यंत! याही स्थितींतून मुक्तता होण्याची आशा आहे तर मग ?

**बृहत्सेन.**—( मध्येंच ) महाराज, ही आमची दीन दशा कधीं हो संपेल ? सांगा, बोला, अशा कठोर शब्दांनीं आह्मांला नका हो ताडन करूं—सांगा तो सुदिन कधीं येईल बरें ?

**सुमंत.**–बाळांनों, काय सांगूं ! श्रीअंबिकेच्या ज्या उन्मत्तदासांच्या बाहुपराक्रमानें हीं अघोर कृत्यें घडत आहेत त्या राक्षसांचा बलगर्व हरण होऊन हें स्वामित्वाचें पारडें जे दिवशीं पालटेल ते दिवशीं, बाळांनों, तुमची आणि तुमच्यासारख्या अनेक हतभागी जनांची मुक्तता होईल.

**बृहत्सेन.**–( मध्येंच निराश होत्साता ) आणि असा सुदीन नच प्राप्त झाला तर ?

**सुमंत.**–(दुःखानें ) हाय ! हाय ! मग बाळांनों, तुह्मीं काळाचे दिवस येथेंच लोटले पाहिजेत.

**बृहत्सेन.**–( जाग्यावरून किंचित् उठून बसल्यासारखें करून ) काय ! यावज्जीव आमचे प्रारब्धीं बंदिशालावास ! हर ! हर ! ! ( दीन वदनानें ) महाराज, आपण इतके निष्ठुर कधींही होणार नाहीं–खचित नाहीं–छे, छे, असें कधीं होणार नाहीं.

**द्युमत्सेन**–महाराज, विचार करा, सदय व्हा, आमची करुणा आपणास येऊं द्या, आमच्या वयाकडे पहा. अशा वेळेस आह्मांस या जगांतून उठवून नेणें किती निर्दयपणाचें आहे याचा विचार करा ! आमचे वृद्ध मातापिता आमच्या वाटेकडे डोळे लावून काळजी करीत बसले असतील; आप्तमित्र आमची केव्हां गांठ पडेल ह्मणून दिवस मोजीत असतील; आमचे स्वामी आमची चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा करीत असतील आणि महाराज अशीं अनेक जिव्हाळ्याचीं माणसें आमचा निजध्यास घेऊन बसलीं असतील. तर अशा आप्तमित्र-इष्टवर्गापासून आह्मांस बलात्कारें ओढून नेणें हा केवढा निष्ठुरपणा ! हें केवढें महत्पाप !

**सुमंत**—( नेत्रांवाटे अश्रु ढाळीत सकंप वाणीनें ) बाळा-

नों, अशा भाषणानें तुह्मीं माझ्या अश्रूंस भरतें आणतां–तुमचे हे शब्द भाल्याप्रमाणें काळजास टोंचतात–परंतु तुमचें शांतवन माझ्यानें होणें नाहीं! विचार करा! अविचारानें मला दोष देऊं नका. कोणत्या भयंकर स्थितींतून मी तुह्मांस वांचविलें याचा तुह्मींच आपले मनास प्रश्न करा–पण तुह्माला काय माहीत–तुह्माला त्याची कल्पनाही करतां येणार नाहीं–तुमच्या किती हाल-अपेष्टा झाल्या असत्या! तुमचा किती निर्दयपणानें छल झाला असता–तुह्मास कशा घोर रीतीनें मृत्यु आला असता–याची तुह्मांस काय माहिती–याची यत्किंचितही जरी तुह्मांस माहिती असती तरी तुह्मी माझे पायांवर मस्तक ठेवून तुह्मास मी जें जीवदान दिलें त्याबद्दल परमेश्वराप्रमाणें माझें पूजन केलें असतें–अंतकाळपर्यंत बंदिवास! मातापिता इत्यादिकांचा वियोग! इहलोकसौख्योपभोगाची निराशा! हीं सर्व, बाळानों, ज्या घोर मृत्यूपासून मी तुमची मुक्तता केली त्यापुढें कांहींच नाहींत! कल्पनाशक्ति विस्तृत करून अंगावर रोमांच उभे राहतील अशीं घोर कृत्यें नेत्रांपुढें उभीं करा! चांडाळांच्या निर्दयपणाच्या पराकाष्ठेच्या शेंकडों गोष्टी ध्यानांत आणा! राक्षस व पिशाच यांच्या क्रूरतेची सीमा झाली तर त्यांचे हातून कोणतीं व किती अनन्वीत अघोर कृत्यें घडतील याची कल्पना करा! तथापि ज्या अत्यंत घोर अंतकाळच्या यातनांपासून मी तुमची मुक्तता केली आहे त्याची अल्पही कल्पना तुह्मांस करतां येणार नाहीं!! सजीवावस्थेंत सर्वांगाची त्वचा वृक्षसालीप्रमाणें सोलून काढतांना होणाऱ्या असह्य वेदना! यज्ञकालच्या पशूप्रमाणें बलात्कारें ओढून नेत असतां सर्व शरीरास होणाऱ्या दुःसह यातना! लोहशूलावर क्रूरपणानें जिवंत चढविलें असतां त्या समयींच्या प्राणांतव्यथा! ज्याच्या जि-

ज्यांमध्ये हालाहल विष आहे अशा भुजंगानें शरीराभोंवतीं वेष्टन करून एकाच ठिकाणीं दंश केल्यानें सर्वांगाचा होणारा अनिर्वाच्य दाह! व मनाची तळमळ! या सर्व परमावधीच्या यातना एकाच मनुष्यानें सहन केल्या असतां त्याची जी स्थिति होईल अशी तुमची कल्पना तुह्मांस सुचवील, त्याहूनही भयंकर रीतीनें तुमचा अंत झाला असता ! ! ! बाळांनों–अशा–अशा मृत्यूंतून मी तुमची मुक्तता केली आहे. श्रीमहाकालीचा भक्ष–नको नको–त्याची कल्पना.

सुमंतांचें वरील भाषण चाललें असतां द्युमत्सेन–बृहत्सेन भयभीत होऊन कांपूं लागले. त्यांचीं मुखें भीतीनें शुष्क झालीं. सर्वांगास घर्म सुटला. नेत्र ताठल्यासारखें झालें व शरीर रक्तहीन झालें.

**द्युमत्सेन.**–( सकंप वाणीनें अडखळत ) महाराज पुरे–पुरे ! या प्रसंगीं अंतःकरणास विलक्षण धडकी बसल्याप्रमाणें झालें आहे ! !

सुमंतानें ज्या अत्यंत भीतिप्रद स्थितीचें चित्र उभें केलें तें एकसारखें नेत्रांपुढें उभें राहिल्यानें बृहत्सेनाचें सर्व धैर्य विगलित होऊन त्यायोगें तो नेत्र गच्च मिटून धरून क्षणेक बेशुद्ध झाल्याप्रमाणें झाला. किंचित् काल लोटल्यावर त्यानें एकदम नेत्र उघडिले आणि सुमंताकडे भयभीत होऊन अवलोकन करूं लागला.

**सुमंत**०—( विव्हल होऊन ) बाळांनों मीं जें हें सांगितलें तें एवढ्याकरतांच कीं, ज्या भयंकर मृत्यूपासून तुमची सुटका झाली, ज्या असह्य यातना तुमच्या वांट्यास आल्या नाहींत, ज्या हालअपेष्टांस तुह्मीं अपरिचित राहिलां, त्याची तुह्मांस थोडी तरी कल्पना व्हावी. मीं जें त्या दुःसह-दुःसह

स्थितीचें अल्प वर्णन केलें त्यानेंच तर तुमची ही दशा झाली आहे, तर बाळांनों तो अमंगळ प्रसंग जर तुमचेवर खरोखरच आला असता तर तुमची काय अवस्था झाली असती ! ! यावत्जन्म कारागृहवास, मातापिता-बंधुवर्ग यांचा दुःसहवियोग, सुष्ट व दुष्ट लोकांनीं भरलेल्या या मायामय इहलोकच्या संसारयात्रेची परिसमाप्ति, हीं सर्व पुरवलीं, परंतु मीं कथन केलेल्या घोर यातना खरोखरच दुःसह होत. मी जें ह्मणतों याची सत्यता तुह्मांस पाहणें असल्यास चला मजबरोबर, ह्मणजे तुमची खातरी होऊन, दुर्दैवानें तुमचे कपाळीं हा जो कारागृहवास आला आहे, त्यांतच सौख्य मानून तुह्मीं अवशिष्ट जीवित आनंदानें घालवाल. चला तर, चला, उठा, ह्मणजे "श्रीमहाकालीचा भक्ष " ह्मणजे काय तें तुह्मांस दाखवितों.

असें ह्मणून सुमंतांनीं दीपकज्योती प्रज्वालित केली व द्युमत्सेन-बृहत्सेन यांस बरोबर घेऊन ते अल्पकाळांतच त्या भयंकर चक्रयंत्रासन्निध येऊन पोंहोंचले.

* * * * * * * *

अर्धघटका लोटली आणि ते त्रिवर्ग पुनः स्वस्थानीं परत आले. या समयीं द्युमत्सेन-बृहत्सेन यांची मुखश्री म्लान व भेसूर दिसूं लागली. ललाटपटावरील घर्मबिंदु कृष्णवर्ण मुखनभीं तारांगणाप्रमाणें चमकूं लागले. वज्रप्रहारासही न डगमगणारा ऊरुप्रदेश अंतःकरणांतील भीतिरूप दधीच्या प्रचंड लाटांनीं क्षणोक्षणीं उचंबळूं लागला. समरांगणीं शत्रूस अवलोकन करून स्फुरण पावणारे बाहु कृश झाले. अंतःकरणांत धडकी बसल्यानें सर्व शरीर कंपित झालें. ओष्टप्रांत स्फुरण पावूं लागला. क्षणोक्षणीं मनांत उद्भवणारे विविधतरंग मुखादर्शांत प्रतिबिंबित होऊं लागले. यामुळें वदनकांति अत्यंत भीति, दुःसह

दुःख, अनिवार शोक इत्यादि विकारांनीं क्षणेक ग्रस्त, क्षणेक विव्हल, क्षणेक निस्तेज दिसूं लागली. सुमंतानी तत्काळ उदक आणून उभतांचे नेत्रांस लाविलें. मस्तकावर सिंचन केलेल्या जलतुषारांनीं आमच्या उभयवीरांस प्रचंड मूर्च्छेपासून त्वरित सावध केलें. बाह्य उपचारांनीं किंचित् हुशारी आल्यानें, आपण काय अवलोकन केलें, आपली स्थिति काय झाली, इत्यादि विचार मनांत येऊं लागले. भीतीनें चंचळ झालेली दृष्टि किंचित्काल स्थिर झाली. मुखावरील शुभ्रकांति नष्ट होऊं लागली. उभयतां खचित भ्रमिष्ट झाले अशी जी अमंगळ कल्पना झाली होती तिचें निरसन होऊं लागलें—सुमंताकडे जों अवलोकन करावें तों त्यांचीही तिच स्थिति. त्यांचे हस्तपादादि अवयव सारखे लटलट कांपत होते. मुखावर प्रेतकळा दिसूं लागली. सर्वांग घर्मानें चिंब झालें, व मुखावाटे एक शब्दही निघेनासा झाला. अशा रीतीनें पुनः अर्धघटका लोटली तरी ते त्रिवर्गही भीतिमुक्त होईनात.

द्युमत्सेनानें एकाएकीं दचकल्यासारखें केलें—सर्वांगावर रोमांच उभे राहिले. अत्यंत भीतिप्रद देखावा अवलोकन करून ज्याप्रमाणें क्षणेक मुर्च्छा येते, त्याप्रमाणें एका घटके पूर्वीं अवलोकन केलेल्या अमानुष गोष्टींचें स्मरण होऊन त्यानें नेत्र गच्च मिटून धरिले.

**द्युम०**—हाय ! हाय ! देवा ! ! मी जागृतावस्थेंत आहें काय ? मला भ्रम तर झाला नाहींना ? माझे नेत्र मला फसवीत तर नाहींतना ? हा सर्व माझ्या कल्पनेचा तर खेळ नसेलना ? मला भूल तर पडली नाहींना ? मीं खरेंच का तें भयंकर कृत्य अवलोकन केलें ? केवढें भयंकर कृत्य ! केवढा निर्दयपणा ! ! जें कृत्य पाहून यक्षकिन्नरांनींही तोंडांत बोट घालावें !! हाय ! हाय!

**बृह०**–( मध्येंच ) मित्रा नव्हे नव्हे हा भ्रम नव्हे! ही भूल नाहीं, हा कल्पनेचा प्रकार नव्हे–मित्रा हा यक्षकिन्नरांचाही खेळ नव्हे.–बाबा हें सर्व कृत्य दुष्ट चांडाळ महाघातकी महानिर्दय अशा खलांचेंचरे ! ! ( एकाएकीं गादिवर न आटोपून सुमंताचे गळ्यास मिठी मारून ) आह्मीं एकनिष्टपणें रात्रंदिवस जरी आपली सेवा केली, सृष्टिनियमाप्रमाणें निर्दय मृत्यूच्या भयंकर जबड्यांत आमची स्वाहा होईपर्यंत आह्मीं आपले आज्ञांकित गुलाम जरी बनून राहिलों, जन्मदात्या मातापितरांहून व आमच्या श्रेष्ट स्वामीहून आपणास अधिक पूज्य मानून जरी आपली आज्ञा सदैव शिरीं धारण केली, हें सर्व आह्मीं केलें तरी आपण आह्मांवर हे जे अगणित उपकार केले आहेत त्यांचे आह्मीं उतराई होणार नाहीं.

**सुम०**–( सुमंतास सप्रेमालिंगन देऊन ) खरोखरच आह्मांस सांप्रत प्राप्त झालेल्या हीन दशेबद्दल खेद मानणें उचित नव्हे–आजपासून आह्मीं या अखिल जगास जरी मृतवत् झालों–आमची इहलोक यात्रा जरी आजच समाप्त झाली–हे देह आजच मातीस मिळाल्याप्रमाणें जरी झालें, आमच्या या कुडींतील प्राणवायु निघून जाईपर्यंत याच उदासस्थलीं कारागृहवास भोगण्याचा दुःसह प्रसंग जरी आह्मावर आला आहे–तरी त्याबद्दल खेद न मानितां, महाराज आपण जें आह्मांस आज जीवदान दिलें, ज्या घोर यातनांपासून आह्मांस वांचविलें, त्याबद्दल आपले सदैव उपकार मानले पाहिजेत. या दीन लेकरांच्या मुखांतून उदासीनतेचे व दुःखाचे उद्गार कधींही निघणार नाहींत.–हें आमचें कोमल अंतःकरण पाषाणाप्रमाणें घट्ट करून याच स्थितींत आह्मीं सदैव सुख मानूं. या हृत्पटावर निराशेनें उभारलेला ध्वज उपटून टाकून त्याठि-

काणीं शांति व समाधान यांची स्थापना करूं. माता, पिता, श्रेष्ठस्वामी, व अशींच दुसरीं आह्मांवर प्रेमकरणारीं माणसें यांची आठवण समूळ पुसून टाकून मायेचा त्याग करूं. ज्यांच्या प्राणांच्या आहुति श्रीमहाकालीस अत्यंत क्रूरपणानें अर्पण झाल्या असत्या, अशा दीन व अनाथ जनांस सदय व उदार अंतःकरणानें जीवदान देऊन, याठिकाणीं अनाथ लोकांचें जें गृह आपण केलें आहे त्या गृहांत संतोष हा साथीदार घेऊन आह्मीं आनंदानें शिरूं.

**बृह०**--महाराज इतकें करूनही जर एखादे वेळीं आमचे मुखावर दुःखाचीं चिन्हें दिसलीं, किंवा गतगोष्टीचें स्मरण होऊन सांप्रत स्थितीबद्धल खेददर्शक शब्द आमचे मुखांतून निघाले, तर त्याबद्धल आपण आह्मांस क्षमा करावी–अशी आमची स्थिति झाल्यास त्याबद्धल आपण मनांत रोष आणूं नका. आह्मीं परलोकसुखांत निमग्न न होतां इहलोकींच भूभार होऊन प्राणधरून आहोंत, व आमच्या या विभूति आमरण अदृश्य आहेत, ही वार्ता जनकजननी व स्वामी यांस कळावी ही जी अंतःकरणांत उचंबळणारी दृढेच्छा, त्याचेच योगानें आमची तशी स्थिति होईल असें समजून त्याबद्धल आह्मांस क्षमा करा.

**सुमंत०**—हाय ! हाय ! बाळानों नका नका, हें अंतःकरण तुमच्या या शब्दांनीं दुभांग होऊन जात आहे ! तुह्मांबद्धल यत्किंचित्‌ही वार्ता परिस्फुट करतां येत नाहीं ह्मणून मीं प्रथमच नाहीं का सांगितलें ! तुह्मांस ही अत्यंत शोचनीय स्थिति प्राप्त झाली याबद्धल तुमच्या इष्टमित्रांस खेद होणें हें योग्य आहे, परंतु उपाय काय ? ही गोष्ट गुप्तच ठेविली पाहिजे. बाळानों शोक आवरा, अंतःकरण वज्राहूनही

कठोर करा, शांततेला वरा, मन घट्ट करून दुर्दैवानें ही जी स्थिति प्राप्त झाली आहे यांतच समाधान माना. मायेला झुगारून द्या. इहलोकचा सर्व पसारा तसाच सोडून, गत गोष्टीची आठवण समूळ विसरा. आजपासून या अखिलजगास तुह्मीं आंचवला. या स्थलीं जे अभागीजन तुह्मांस दिसतील, त्यांच्याशीं स्नेहभावानें रहा. तेच तुमचे आप्तइष्ट असें समजून —

इतक्यांत एकाएकीं एक द्वार खाडकन् उघडलें. द्युमत्सेन-बृहत्सेन भीतीग्रस्त होत्साते कांपूं लागले. सर्वांगावर शुभ्रवस्त्रें धारण केलेली आकृति दृष्टीस पडतांच त्यांचे अंतःकरणांत धडकी बसून आणखी एखादें संकट आपणावर ओढवतें कीं काय, असें त्यांस वाटूं लागलें. ती आकृति ज्या दिशेकडून येत होती त्या दिशेकडे बोट दाखवून सुमंत ह्मणाले. " बाळानों याच बाईनें परोपकार बुद्धीनें आजपर्यंत श्रीमहाकालीस अर्पण करण्याकरितां आणलेल्या शेंकडों लोकांचे प्राण वांचविले आहेत. " हें ऐकून द्युमत्सेन--बृहत्सेन पुनः कंपित होऊन पाहूं लागले. क्षणेक अंतःकरणांत स्थित झालेली धडकी निघून जातांच मनः कल्पित अमंगळ विचार नष्ट झाले. त्या आकृतीकडे त्यांनीं निरखून पाहिलें तों खरोखरच ती स्त्री असून तिच्या मुखावर उदासीनतेचीं चिन्हें दृष्टीस पडलीं. अंतःकरणरुपी होमकुंडांतील चितारूप नळानें तिचें मुख करपून गेल्याप्रमाणें दिसत होतें. दुःसह दुःखोदधीच्या प्रचंड लाटांनीं हृदय धडधड उडत होतें. अनिवार शोकानें अश्रु ढाळून ढाळून नेत्र निस्तेज व जलरहित होऊन गेले होते. सौंदर्य तेज नष्ट होऊन मुखावर प्रेतकळा आली होती.

**शुभ्र०**--बाळानों शोक आवरा, आणि या ठिकाणीं आनं-

दानें राहा-मी आनंदानें राहा ह्मणतें खरी, परंतु यापुढें आपण आमरण आनंदास परकी झालां-व असें होणें साहाजिक आहे-हें मला समजत नाहीं असें नाहीं-परंतु दैव प्रतिकूल झालें-परमेश्वराची अवकृपा झाली-यापुढें कोणाचा उपाय-तुह्मीं इहलोक सोडून जाईपर्यंत-अगर तुमच्या मुक्तेचा दिवस उगवेपर्यंत-बाळानों या स्थलीं तुह्मांस गत गोष्टींचा विसर पाडून तुमचा काल आनंदांत जाईल असें करूं.

तिच्यानें पुढें बोलवेना, कंठ दाटून आला, व नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. द्युमत्सेन-बृहत्सेन गहिंवरून त्यांनीं तिच्या पायावर मस्तक ठेविला, व हा कालपर्यंत धैर्यरूप तटानें अवरोधित केलेला अश्रुजलौघ उचंबळून जाऊन **श्वेतवस्त्रेचे** चरण उष्ण अश्रुजलानें क्षालन झाले. उभयतांचीं सर्व गात्रें शिथिल झालीं.

**सुमंत**०-( शुभ्रवस्त्रेकडे वळून, मोठ्या पूज्यबुद्धीनें व विनयानें ) बाई, अशा समयीं दुःख करणें योग्य नव्हे. असा धीर सोडूं नका-मनाला विवेकानें आवरा-परमेश्वरावर विश्वास ठेवा-प्रतिष्ठान नगरीस ती कुमारिका पोहोंचलीच असेल.-तिनें हातीं घेतलेलें काम निर्विघ्नपणें शेवटास नेणार एक परमेश्वर समर्थ आहे !

**शुभ्र**०--( बृहत्सेन द्युमसेन यांस उठवून सुमंताकडे वळून) जगदंबे त्या अनाथ लेंकरास तूंच साहाय्य कर-तिला यश दे- तुझ्या कृपेची साऊली आह्मांवर सदैव असूंदे- सुमंत, इतके काळाचे दिवस लोटले, दुःसह दुःखानें जीव नकोसा झाला, तरी पण आशेनें कांहीं अद्याप सोडलें नाहीं- या वरून आपले मनोरथ खचित सिद्धीस जाणार- महाकालीस शरण गेलें, तिची करूणा भाकली, सर्व भार तिजवर टाकला, ह्मणजे

आई मातेची कृपा झालीच–पण हाय ! हाय ! काय ही व्यर्थ आशा–छे, छे, याच स्थितींत आमचा सर्वांचा अंत होणार.–

इतक्यांत आठ द्वारें उघडून भयंकर देखावा दृष्टीस पडला. सुमारें शंभर स्त्रिया व तितकेच पुरुष एकामागून एक प्रत्येक द्वारानें येऊं लागले. हा विलक्षण प्रकार पाहून द्युमत्सेन बृहत्सेन मुख उघडून साश्चर्य त्यांचेकडे अवलोकन करूं लागले. इकडे शुभ्रवस्त्रेनें आपला हस्त वर उचलून धरिला, व सुमंत दिवाण पदतलीं दृष्टि देऊन उभे राहिले.

